# ब्र ह्म पु रा ण

आज बरेच महिने ब्रह्मा 'वंडाच्य भ्रांतिप्रद बातम्या येत आहेत

ब्रह्मी प्रजाजनानी हिंदी व्यापाऱ्यावर व मजुरावर क्रूरपणे हल्ले आरंभिले असल्याचे वृत्त सर्वत्र पसरले आहे

तिकडील हजारो हिंदी बायव घरेदारे, मालमत्ता, जमीनजुमला सोडून जीव वाचविण्यासाठी स्वदेशी परत फिरले

सुमारे १०८४ इसमाचा बळी ब्रह्मी बडखोरानी घेतला

एकदर ८००० खडी फौज बटाळीच्या क्षेत्रात जय्यत तयारी ठेविली आहे

बडखोराचा पुढारी सायासेन यास फाशीची शिक्षा फर्माविली. ...

...... .. ..... .... ...

पण बंडाळी अद्यापि कमी होत नाही ती नाहीच ! तेव्हा हा सर्व प्रकार आहे तरी काय, याविषयीची सविस्तर चर्चा ब्र ह्म पु रा णा त आढळेल

ब्रह्मदेश वेगळा करण्याचा घाट कशासाठी आहे, त्यामुळे हिंदी राष्ट्रावर काय आपत्ति ओढवणार, ब्रह्मी प्रजेचे नुकसान कोणतें वगैरे बाबींचा खुलासाही ब्र ह्म पु रा णां त केला आहे

---

चितगांगमध्यें क्रांतिकारकांनी गाजविलेल्या कर्तबगारीचे व 'आर्मेरी रेड'चे वर्णन परिशिष्टांत पहा.

---

ब्रह्मी बंडाळीचें

# ब्रह्मपुराण

बंडाळी व विभागणी या प्रचलित प्रश्नांचे सांगोपांग विवेचन

( दहा चित्रें व नकाशासह )

श्रीपाद रामचंद्र टिकेकर

प्रथमावृत्ति ] किंमत १ रुपाया [ १९३१

ती. नाना, आबा व भाऊ

यांस आदरपूर्वक अर्पण

# ब्रह्मदेश



# चित्रांचा खुलासा

**गौतमबुद्धाचा अजस्र पुतळा**—( पृ. १ ) चात्रान चौंगमधील हा पुतळा. ब्रह्मदेशात सर्व पॅगोडा व चौंग यामध्ये विद्युद्दीपांची खास व्यवस्था असते हे विशेष होय. ह्या पुतळ्यावरहि दिवे लावलेले दिसतात आणि त्यावरूनच पुतळ्याची उची अजमावता येईल.

**श्वे-डेगॉन पॅगोडा, दुसरी बाजू**—( पृ. १७ ) पॅगोडाच्या एका बाजूस असे नक्षीचे एक मंदिर आहे. जिकडेतिकडे बुद्धाचे पुतळे दिसतात. अशा प्रकारचे बाह्यांग ब्रह्मी देवळाचे असते. 'पॅगोडा'चे चित्र म्हणून ओळखण्याची हीच खूण होय.

**ब्रह्मी घरांचा नमुना, 'जल-महाल'**—( पृ. ३२ ) पाण्यावर तरंगत आहेत अशीं दिसणारीं ही घरे म्हणजे खरोखर जलमहालच होत. आगीपासून त्याना भीति कमी. पण पाण्याचा सहवास आपणासारख्याना त्रासदायकच वाटावयाचा पूर्व बंगाल्यांतही असलीं घरे आहेत.

**श्वे-डेगॉन पॅगोडा, सुवर्णमय कळस**—(पृ.४८) रंगूनमधील श्वे-डेगॉन पॅगोडाचा हा मुख्य भाग म्हणण्यास हरकत नाही. हे सर्व कळस सुवर्णमय दिसतात. त्याच्या खाली बुद्धाच्या लहानमोठ्या मूर्ति आहेत. मागे दिसणारा मोठा घेर मुख्य उंच स्तूपाचा असून त्याच्या विस्ताराची कल्पना माणसें उभीं आहेत त्यावरून करावी. तोही सुवर्णाने मढविलेला दिसतो.

**'ब्रह्मदेश विलग करूं नका' म्हणणारांची सभा**—( पृ. ५६ ) रंगून येथे ज्युबिली हॉलमध्ये ता. २८-५-३१ रोजी सभा भरली होती, तेंव्हा वरच्या मजल्यावरून घेतलेला फोटो. थारावडी यू पू भाषण करीत आहेत. हें सर्व एका नाटकाप्रमाणे दिसतें. कारण प्रमुख फुंजी (सायडॉ) व वक्ते हे रंगभूमीवरच असून बाकीची मंडळी रांगेने खुर्चीवर बसली आहेत. फोटो वरून व श्रोत्याच्या मागून घेतल्याने सर्वांचीं डोकींच तेवढीं फोटोंत दिसतात.

**सुधारलेली पण लाकडी घरे**—( पृ. ६४ ) धारावडी येथील पोलिस-लाइन. यात सुधारणा म्हणजे घरावर कौले घातली आहेत. अशी चाळी-वजा घरे ठिकठिकाणी असतात.

**चौगमधील फुंजी, शिक्षक व विद्यार्थी**—( पृ. ८० ) रगूनजवळ चात्रान म्हणून एक खेडे आहे. तेथील बुद्धविहारात शाळाही भरत असे. त्या शाळेत येणारे सर्व विद्यार्थी, तात्पुरते झालेले फुंजी व मुख्य 'भिक्षु' अशा सर्वांचा मिळून घेतलेला फोटो.

**चात्रान चौगमधील वृद्ध फुंजी**—( पृ. ८८ ) सुमारे ९२ वर्षांचा हा वृद्ध फुंजी अद्यापि आपल्या नित्य व्यवसायात गर्क असतो. 'अग गलित पलित मुड दशनविहीन जात तुडम्' अशी स्थिति असली तरी अध्यापनाच्या 'आशापिंडा'तून तो मुक्त झाला नाही.

**बुद्धविहारमधील मोफत शाळा**—(पृ. ९६) ह्या शाळेत अभ्यास कसा चालला आहे आणि विद्यार्थी केस कोणत्या प्रकारे कापतात, हे चित्रावरून कळते.

**सरकारी पोलिसांचे शस्त्रागार,** चितगाग—(पृ. १०४) क्रांतिकारकांनी दोन शस्त्रागारे फोडली व लुटली, त्यांपैकी हे एक. याच्या मागे दिसणारी पोलिस-लाइन. फोटो दूरवरून कोणाला नकळत घ्यावा लागला म्हणून इमारत व आजूबाजूस बसलेले गुरखे स्पष्टपणे दिसत नाहीत.

---

चित्राचे ब्लॉक करून ते छापण्याचे काम मुंबईस श्री. विठ्ठलराव वागळे यांच्या प्रोसेस स्टूडिओ व प्रेसमध्ये झाले आहे.

# अनुक्रमणिका

# ब्रह्मी बंडाळीचें ब्रह्मपुराण

## मं ग ला च र ण

ब्रह्मपुराण म्हटले की, मग त्याची सुरुवात मंगलाचरणापासूनच व्हावयास पाहिजे, आणि बुद्धानुयायी प्रदेशाची माहिती देताना गौतमबुद्धाशिवाय दुसऱ्या कोणाला वंदन करावयाचे?

ब्रह्मदेशात बंड बंड म्हणून जे म्हणतात, ते आज आठ महिने होऊन गेलें तरी थंडावत नाही. यःकश्चित् ब्रह्मी प्रजा ती काय आणि साम्राज्य-सरकारला सातआठ महिने सारखी सतावून सोडते काय, सर्वच विचित्र वाटते. बंडाळी शमविण्यासाठी व्हाइसरॉयाकरवी तीन 'वरवटी' कायदे निघाले, खास त्रिकुटी (ट्रिब्यूनल) कोर्टें स्थापली, छप्पन्न जणाना फाशीची शिक्षा फर्मावली, शेकडो इसमाना काळे पाणी ठोठावले, हजारो प्रजाजनाना डांबून ठेवले, त्यांच्या बायकापोराना अटक केली, ठिक-ठिकाणी लष्करी छावण्या उभारल्या; हिंदुस्थानातून पलटणीवर पलटणी मागवल्या—पण अद्याप बंड आहे तसेंच आहे, काही कमी नाही. ब्रह्मी गव्हर्नरानी खास मजलस भरविली, 'बंडखोराना माफी करतो' असें जाहीर केले, काही धर्मगुरूना मथवून 'शांततेचा प्रसार' करण्याकरिता बंडाच्या आवारात पाठविले—परतु सर्वच गाडा पूर्ववत् चालू आहे. रोज लुटालूट, डाके, हल्ले, दरोडे याची बातमी पहिल्याप्रमाणेच भरपूर येते. इकडे सरकार मात्र रोज पत्रके काढून बंड दबत आल्याची (कोरडी) आश्वासने देते. 'बहुतेक बंडखोर हातीं आले. आता लवकर सामसूम होईल.' अशी 'भरत-वाक्ये' भारतमंत्र्यानी व व्हाइसरॉयानी किती तरी वेळा म्हटलीं. परतु ती भरतवाक्ये न ठरता नवीन बंडाचीं मंगलाचरणेंच ठरलीं! आतापर्यंत सरकारच्या पत्रकावरून हिशेब केला तर असें दिसतें की, सुमारे २७०० बंडखोर सरकारास शरण आले; सुमारे एक हजाराना मृत्युमुखीं पडावे लागले; आणि अदाजे दोन हजार बंडखोर सरकारने कैदेतच ठेवले होते. इतक्याचा हिशेब लागला तरी बंड काबूत आलें, असें छातीठोकपणे कोणीच सांगत नाही. मग हे बंडखोर आहेत तरी किती? त्यांचा पराक्रम कशा प्रकारचा

आहे? आणि सरकारच्या ताब्यात ते का सापडू शकत नाहीत? इत्यादि प्रश्नाची उत्तरें कशीं मिळावयाचीं? खरे पाहू गेले तर सरकारी अधिकाऱ्याच्या कृपेमुळेच ब्रह्मी बडाळींची काहीच खरी बातमी कळत नाही. म्हणजे सरकारला त्यानी किती जेरीस आणले आहे याची यथार्थपणे कबुली सरकार मुळींच देणार नाही. फक्त स्वत.ची बडेजावी, बडखोराची नालस्ती आणि हिंदी जनतेवर हल्ला केल्याच्या विकृत बातम्या सागण्यासाठी सरकारचे प्रसिद्धिखाते आहे हे खरं. परतु अशा एकपक्षीय बातमीवर विश्वास ठेवून कसे चालेल? त्यातील खरा अर्थ तर्कानेच ताडला पाहिजे. आतापर्यंत बडखोरानी सुमारे १२५ गावकामगाराचे (पाटील) बळी घेतले. दोन डिस्ट्रिक्ट पोलिस सुपरिटेंडेट, एक असिस्टट पो. सुपरिटेंडेट व एक इन्स्पेक्टर इतक्या सरकारी अधिकाऱ्याना ठार केले असून, बऱ्याच काळ्यागोऱ्याना जखमीही केले आहे. एकदर १०७४ इसम बडखोराच्या क्रोधास बळी पडले. पैकी फक्त ७४ च हिंदी आहेत. असे असताही ब्रह्मी बडखोर हिंदी जनतेवर सारखा हल्ला करतात, त्याना हिंदीद्वेषाने पछाडले आहे; हिंदी लोकाना ब्रह्मदेशात राहणे धोक्याचे आहे, अशा 'रगीत' बातम्या उठविण्यात सरकारचा हेतु काय असावा, हे पुढील विवेचनावरून स्पष्ट होईलच.

बड सुरू झाल्यापासून एकदर ९८ सस्था सरकारने गैरकायदा ठरविल्या आहेत. त्यातच G. C. B. A. (ग्रँड कौन्सिल ऑफ बर्मीज् असोसिएशन) ही प्रमुख सस्था समाविष्ट आहे. पोलिसावर हल्ला करणे, येनागजाग येथील तेलाच्या खाणीचे नुकसान करण्यासाठी झटणे, इतरत्र असलेल्या तेलाच्या टाक्यावर किंवा नळीवर हल्ला करण्यासाठी टपणे, मद्राले मेल उलथून पाडणे किंवा ब्रह्मी सरकारशी राजनिष्ठ राहणारी स्वतत्र 'शान' सस्थाने, चीन व ब्रह्मदेश याचेमध्ये आहेत त्यात बडाळी माजविणे, असे कितीतरी पराक्रम बडखोरानी केले आहेत. बड डिसेंबर १९३०च्या शेवटच्या आठवड्यात सुरू झालें असले तरी बडखोरांचा पुढारी 'साया सान' हा ऑगस्टच्या पहिल्या आठवड्यात म्हणजे आठव्या महिन्यात सरकारचे हाती लागला आहे असें समजतात. कारण असे कितीतरी पुढारी पकडले व कित्येकाना शिक्षा ठोठावल्या, पण बडाच्या धामधुमींत काडीमात्र फेर पडलेला नाही. बडाचें

क्षेत्र विस्तृत असून ते सलग्न असे नसतांही बंडखोराची ही धामधूम व्यवस्थे-शीर चालली आहे हे सरकारची अपात्रता दर्शविते की बंडखोराची तयारी उत्कृष्ट आहे असे त्यावरून अनुमान काढावयाचे ?

ते ज्याचे त्याने वाटेल तसे करावे. बंडखोराच्या त्रासामुळे हजारो हिंदी मजूर स्वदेशाकडे पळाले, असे बोटीतील उतारूचे आकडे घेऊन काही वर्तमानपत्रानी दर्शविण्याचा प्रयत्न केला आहे. पण साधारणपणे दर वर्षी त्या सुमारास किती प्रवासी जातयेत असतात, याचा त्यानी मुळीच विचार केला नाही. म्हणून एका दृष्टीने ते आकडे विशेष फुगलेले दिसतात. ब्रह्मदेशात व हिंदुस्थानात हिंदी मुशाफराची जा-ये इतकी आहे की, प्रत्येक बोटीत त्याची गर्दी असते. तेव्हा नुसती ब्रह्मदेशाहून येणाऱ्या हिंदी लोकाची संख्या सागून आमच्या इतक्या बाधवाना ब्रह्मदेश सोडावा लागला अशी त्यावर मल्ली-नाथी करणे म्हणजे वस्तुस्थितीचा विपर्यास करण्यासारखेच आहे. ह्यावरून असे म्हणता येत नाही की, ब्रह्मदेशातून कोणी पळून आलेच नाहीत. जी मडळी आली ती का व कशी याचे विवेचन पुढे केलेच आहे. हिंदी बाधवाबद्दल मला आपलेपणा वाटत नाही, असा आरोप मात्र मजवर कोणी करू नये. विनाकारण खऱ्या गोष्टीकडे दुर्लक्ष करून आपणास अनुकूल व ब्रह्मी प्रजेस प्रतिकूल अशी अनुमाने काढणे मला बिलकूल पसत नाही आणि म्हणून मी तसे केले नाही. वस्तुस्थिति जशी आहे तशी वाचकापुढे माडली आहे. तिचा त्यानी पाहिजे तसा उपयोग करावा.

ब्रह्मपुराणाची माडणी सुबोध व्हावी म्हणून प्रथमतः ब्रह्मदेशचा ऐतिहासिक चित्रपट दाखवून नतर बंडाळीच्या प्रश्नाची आर्थिक, राजकीय व सामाजिक कारणमीमासा केली आहे. ब्रह्मदेशविभागणीचे वावटळही सध्या उठलेले आहे. त्याचा विचार टाळणे अशक्य होते. म्हणून बंडाळीच्या कारणमीमासेवरून पुढे लगेच विभागणीच्या वादातील धागेदोरे दाख-विण्याचा प्रयत्न केला आहे. विभागणीविषयी युरोपियन, हिंदी व ब्रह्मी-जनाची मते काय आहेत हे पाहून मग काही मुलाखतीचा विचार केला. आणि शेवटी सर्वच प्रश्नाची साकल्याने चर्चा आटोपून ब्रह्मी समाजस्थितीचें थोडक्यात वर्णन केले असून परिशिष्टात चितगाग येथील शस्त्रागारावरील आक्रमण कसे झालें, याची माहिती सांगितली आहे.

आता मूळ पुराणास प्रारभ करण्यापूर्वी ब्रह्मदेशचे बाबतीत सायमन कमिशनने केलेल्या शिफारशीचा समाचार घ्यावयाचा आहे. ज्या गोष्टी-कडे लक्ष वेधावयास पाहिजे होते त्याकडे मुद्दाम कानाडोळा करून ‘ ब्रह्मदेश वेगळा केलाच पाहिजे ’ अशा तावडतोबीच्या शिफारशी करण्यात सायमन-साहेबाचा स्वार्थी कावा असला पाहिजे, यात शकाच नाही. तसेच लडनमध्ये गोलमेजाच्या ब्रह्मी पोटकमिटीने तडकाफडकी केलेला विभागणीविषयक निर्णय, त्यानतर त्याविषयी माजलेले वादळ आणि शेवटी त्याचा फेरविचार करण्या-साठी ब्रह्मदेश-वर्तुळ-परिषद बोलावण्याचें सरकारी आश्वासन, व त्यानतर पुनः ब्रह्मदेशविभागणीचा प्रश्न विवाद्य नाही हा जाहिरनामा, नोव्हेंबर (१९३१)-मध्ये मडलाकार मेजाभोवती खास ब्रह्मदेशीय मजलस भरविण्याची योजना इ. गोष्टींची सागड घातल्यावर ह्यातील इग्रजी पेच उघडकीस येतील. सायमनसाहेबाच्या म्हणण्याचा मतितार्थ असा:—

१. हिंदुस्थानचे सरक्षण करण्यासाठी वायव्य व ईशान्य सरहद्दीवरील ताबा व देखरेख स्वतत्र (?) हिंदुस्थानच्या हाती न देता सर्वदा साम्राज्य-सरकारच्याच अधिकारात राहिली पाहिजे.

२. ब्रह्मदेशात काही वर्षे मॉटेग्यू-चेम्सफर्ड सुधारणा अमलात आल्या असल्या तरी ब्रह्मदेश व हिंदुस्थान यात पुष्कळ फरक आहे. म्हणून ब्रह्मदेशा-साठी वेगळ्याच राजकीय सुधारणाचा ‘डोस’ पाहिजे.

३. ब्रह्मदेश हिंदुस्थानपासून लवकर विलग केला नाही तर (ब्रह्मी) प्रजेत असतोष फैलावेल.

४. ब्रह्मदेश वेगळा होताच ब्रह्मी जनतेवर कराचा बोजा कमी होईल, अशी अपेक्षा खुद्द ब्रह्मी लोकाचीही नाही.

ह्या सूचनाचा परामर्ष क्रमाक्रमानचे घेऊ. हिंदुस्थानच्या सरक्षणाचा डौल पोकळ आहे. आजपर्यंत आमचे सरक्षण कोणी केले व ते कसे झाले, हे थोड्या विचाराती कळून येणार आहे. सरक्षण करण्याची कला फक्त ब्रिटि-शासच उपजल्यापासून अवगत असते आणि इतर लोकाना ती कला कदापि साधावयाची नाही, ह्या भ्रमात सायमनसाहेब आकठ बुडलेले दिसतात. शिखाचे राज्य पजाबवर कितीतरी वर्षे होते आणि त्यानी वायव्य सरहद्दीचा

बदोबस्त थोडक्या खर्चांत हल्ली ब्रिटिश ठेवतात, त्यापेक्षा चागल्या प्रकारे राखला होता, ही गोष्ट इतिहासांत नमूद आहे. वायव्य सरहद्दीवर ब्रिटिशांचा ताबा आल्यापासून ७२ वर्षांत ७२ हल्ले ब्रिटिशाना सरहद्दीवरील रानटी टोळ्यावर करावे लागले, ही एकच गोष्ट त्यांच्या कार्यक्षमतेची साक्ष देईल. आणि बहुतेक चकमकीत शेकडा ७५ पेक्षा अधिक लढवय्ये हिंदी होते असे आता पुराव्यानिशी सिद्ध करतां येते. अशा छोट्यामोठ्या लढाया शिखांच्या अमदानींत होत नव्हत्या, किंवा साल दरसाल क्रोडो रुपये सरहद्दीवरील टोळ्याना ते वाटीतही नव्हते. ह्यावरून ब्रिटिश सत्ता अधिक चांगली असे कसे म्हणावे?

हिंदुस्थानचे 'सरक्षण' 'सरक्षण' म्हणून भीतिप्रद नावाखाली महागऱ्या ब्रिटिश फौजेचे किंवा जबरदस्त लष्करी खर्चांचे समर्थन करण्याची हिंदुस्थान सरकारला सवयच जडलेली दिसते. गेल्या वर्षी चितगाग येथे झालेले शस्त्रागारावरील आक्रमण व हल्ली चालू असलेले ब्रह्मदेशातील 'बड' या दोन्ही गोष्टी, हिंदुस्थान-सरक्षणाचे कामीं ब्रिटिश अधिकारी पूर्णपणे नालायक आहेत हेच स्पष्टपणे सिद्ध करतात. काहीही कारणे दर्शविता आलीं किंवा आपल्या चुकीचे समर्थन करण्याचे धाष्टर्य अधिकाऱ्याचे अंगी असले तरी नालायकीचा आरोप रतिभर देखील कमी होत नाही. कारण आणीबाणीचे वेळी अथवा कसोटीच्या प्रसगीच जर धैर्य खचले तर इतर समयी दाखविलेल्या धैर्यनिधीचा मुळीच उपयोग नाही हे उघड आहे. रणभूमीवर सैनिकाला शौर्य गाजविता आले नाही तर त्याच्या शौर्याचा इतर ठिकाणी काय उपयोग? चितगांगमध्ये शस्त्रागारांवर हल्ला होत असता एक युरोपियन अधिकारी चोकशीसाठीही पुढे जाऊ शकला नाही किंवा हल्ला करणाराना विरोध करण्याचे सामर्थ्य असलेला एकही हिंदुस्थान-सरक्षणाच्या 'मायेचा पूत' निघाला नाही! ह्यावरून सर्व अधिकारी परचक्रापासून हिंदुस्थानचें सरक्षण करण्यास अयोग्य आहेत, ह्याखेरीज दुसरें कोणते अनुमान निघू शकेल बरे? तीच बाब ब्रह्मी बडाळीची. सात सोडून आठ महिने होऊन गेले; बड आपले पूर्वीपेक्षा काकणभर अधिक जोरांतच दिसतें. अणुमात्र कमी नाही. बडखोराना कोणा त्रयस्थाचें साहाय्य नाही; त्याच्यात लष्करी सघटना नाही, सुधारलेलीं लांब पल्ल्याचीं शस्त्रे त्याचेजवळ नाहीत, द्रव्यबल

त्याना जवळजवळ नाहीच, मनुष्यसाहाय्यही अगदीच थोडके, असे असता कायद्याने निःशस्त्र केलेली बुद्धानुयायी प्रजा, जगात अव्वल दर्जाचे म्हणून नाणावलेल्या, सपन्न, कार्यक्षम अशा सरकारशी इतके दिवस तीक्ष्ण विरोध चालू ठेवते, यात सरकारची अपात्रताच दिसून येते! कारण सरकारला द्रव्य-मनुष्यबलाची वाण मुळीच नाही. आधुनिक यांत्रिक युद्धसामग्रीचा भरपूर पुरवठा त्याचे जवळ आहे. आकाशात सचारणारी विमाने आहेत. इतकेच काय, पण पैसे चारून किवा अन्य मार्गानी प्रजेत आपसात कलहाग्नि भडकावून देण्यात पटाईत असून सुद्धा ब्रिटिश अधिकाऱ्याना ह्या बडाचा उपशम करता आला नाही, ही गोष्ट काय दर्शविते?

इतका विस्तार करून सागितल्याखेरीज ही गोष्ट पटणारी नाही. ब्रिटिश सरकारच्या शौर्यामुळेच हिंदुस्थानात शातता नादत आहे, ही समजूत सपशेल खोटी. ब्रिटिशाचा अधिकार किवा सत्ता हिंदुस्थानात टिकली याचे कारण तिला विरोध करण्याचा किवा न जुमानण्याचा प्रयत्नच मुळी फारसा झालेला नाही. आणि जेव्हा जेव्हा असा प्रयत्न—मग तो सघटित असो अथवा नसो—प्रजेने केला तेव्हा तेव्हा सर्वशक्तिमान् अशा साम्राज्यसत्तेला जबरदस्त धक्का बसला असून खोलवर विचार करणारास यशाचा काटा प्रजेच्या प्रयत्नाकडेच झुकलेला दिसेल. नुसत्या दबदब्यावरच मिरविले जाणारे हे सरक्षणाच्या हत्तीचे धूड म्हणजे शेतात पक्षाना भिवविण्यासाठी उभारलेले बुजगावणेच होय. एकदा त्याचे स्वरूप नीटपणे कळून चुकले की, त्यासबधी भीति मुळीच वाटावयाची नाही, आणि इतके दिवसाचा मूर्खपणा ध्यानात येईल.

दुसरी बाब राजकीय सुधारणाची. ब्रह्मदेशातील प्रजाजन हिंदी लोकापेक्षा अगदी भिन्न आहेत. त्याच्या चालीरीती एक नाहीत, त्याचे आचार वेगवेगळे आहेत, एवढे सागितल्याने ब्रह्मी प्रजेला निराळ्या राजकीय सुधारणा पाहिजेत हे कसे सिद्ध होतें ते मात्र सर जॉन सायमन स्पष्ट करू शकले नाहीत. ब्रह्मदेशाला इ. स. १९१९ च्या 'मॉटफर्ड' सुधारणातून वगळले ही चूक, नतर चार वर्षानी सर फ्रेडरिक व्हाइट याच्या अध्यक्षतेखाली नेमलेल्या कमिटीने दुरुस्त केली. ब्रह्मदेश आणि हिंदुस्थान याना एकच सुधारणाचा कायदा लागू केला. परतु आता सर जॉन नवीनच शकल लढवू पाहत आहेत. मागे दिलेल्या सुधारणा ब्रह्मदेशाला पचल्या नाहीत, हे सिद्ध केल्याविना

किंवा त्यामुळे ब्रह्मदेशाचे नुकसान झाल्याचे माप पदरात घातल्याखेरीज 'ब्रह्मदेशाला वेगळ्या सुधारणाचा हप्ता दिला पाहिजे.' या याच्या शिफारशीस मुळीच किंमत नाही. मग सर जॉन सायमनसारख्या प्रख्यात मुत्सद्याने ती सूचना केलेली असो अथवा तिसरा कोणी एखादा राजकार्यधुरंधर तिचा जनक असो.

ब्रह्मदेश विलग करण्याच्या घिसाडघाई शिफारशींत तर सायमनसाहेब सपशेल घसरले. ब्रह्मी कौन्सिलातील ठरावाचा आधार घेऊन ते म्हणतात की, 'लोकप्रतिनिधींना ब्रह्मदेश तावडतोब वेगळा व्हावा असे वाटते.' पण आतली गोम अशी की, सायमन कमिशन रंगूनमध्ये गेले तेव्हाच हा ठराव कौन्सिलपुढे विचारार्थ निघाला. शिवाय नेहमीच्या ठरावाच्या रूपाने रीतसर नोटीस देऊन तो कधीच जनतेपुढे मतप्रदर्शनार्थ आला नव्हता. सायमनसाहेबाच्या शिकवणीमुळेच काही ' जी हुजूर ' सभासदांनी कौन्सिलात बैठक-तहकुबीची सूचना आणली. ब्रह्मदेश वेगळा व्हावा की नाही याविषयी चर्चा करण्यासाठी ही तहकुबीची सूचना होती. तेव्हा कौन्सिलच्या अध्यक्षांनी, हा विषय विशेष निकडीचा म्हणून ती विचारार्थ घेण्यास संमति दिली आणि थोडासा वादविवाद होऊन ब्रह्मदेश वेगळा व्हावा हा ठराव मंजूर झाला. अर्थातच ह्या बाबीवर एकमत होऊ शकले नाही. परंतु ब्रह्मी प्रजेला हिंदुस्थानचा संबंध तोडूनच टाकावयाचा होता, तर सायमन-सप्तकाचा पाय ब्रह्मी भूमीला लागण्यापूर्वी असा ठराव मांडण्याची बुद्धि त्यांना नव्हती काय? सायमनांचा मुक्काम रंगूनमध्ये फेब्रुआरी १९२९ मध्ये होता आणि १८ फेब्रुआरी १९२९ रोजीच हा जादा तहकुबीचा फार्स ब्रह्मी कौन्सिलमध्ये झाला! ह्या गोष्टी लक्षात घेतल्या पाहिजेत. बरे, ब्रह्मी कौन्सिलमधील सभासदांचे मत तेच ब्रह्मी समाजाचे मत, असे गृहीत धरण्याची तयारी सरकारची आहे असे मानले तर काय काय अनर्थ ओढवतील ते सांगावयास नकोतच! फार दूर कशाला, ब्रह्मी कायदेकौन्सिलात १९२३-२५ ह्या दोन वर्षांत सरकारी विरोधास न जुमानता अगदी साध्या बाबतीतले सहा ठराव मंजूर झाले. सरकारने त्यासंबंधी काहीच केले नाही—त्यांना वाटाण्याच्या अक्षता लावल्या, ही गोष्ट सरकारी दप्तरात अगदी निर्लज्जपणे नमूद आहे. आपणांस अनुकूल अशा वेळीच कौन्सिलातील ठरावास व लोकमतास

महत्त्व देणाऱ्या सायमनसाहेबाच्या असल्या प्रामाणिक मताबद्दल आदर का वाटावा?

हिंदुस्थानाबाहेर ब्रह्मदेश तावडतोब विलग केला नाही तर ब्रह्मदेशांत असंतोष फैलावेल अशी धमकी सर जॉन सायमन देतात. याचा अर्थ असाच की, सरकारच्या मनातून ब्रह्मदेश वेगळा करावयाचा आहे. प्रजेतील असंतोषाची कदर ब्रिटिश सरकार कधीपासून बाळगू लागले, असा प्रश्न विचारण्याचा मोह, हे लगडे कारण पुढे केलेले पाहून होतो. मिठावरील कर असेंब्लीच्या मनाविरुद्ध व्हाइसरॉयानी खास अधिकार उपयोजून वाढविला, तेव्हा प्रजेतील असंतोष ही काय चीज आहे हे आपणास ठाऊकच नाही अशा प्रकारे हिंदुस्थान सरकार वागले. प्रसवप्रवीण लॉर्ड आयर्विन यानी गेल्या वर्षी एकामागोमाग नऊदहा ऑर्डिनन्स काढले तेव्हा लोकातील असंतोषाचा विचार सरकारच्या डोक्यात आला काय? मुबईस अनेक वेळा निरपराधी व निःशस्त्र बायकामुलावर शिपायाकरवी लाठीचा प्रसाद देण्याची मौज पाहणाराना प्रजेत असंतोष उत्पन्न होईल अशी कल्पना जशी काही सुचलीच नसावी! ह्याच प्रकारची एक ना दोन शेकडो उदाहरणे प्रतिवर्षाच्या कारकीर्दीतून काढून देता येतील.

ब्रह्मी लोकमताचा इतका कळवळाच सायमनसाहेबांना आला असेल तर त्यानी एका पक्षाचेच मत ग्राह्य का धरले? अथवा सर्व देशात एकच मत प्रचलित आहे अशी त्याची समजूत आहे की काय? इतरत्र चौकस बुद्धि प्रकट करणारे सर जॉन जेव्हा मुद्दामच मूळ मुद्दे गाळून ब्रह्मदेशविभागणीवर बिलक्षण भर एकसारखा देतात, तेव्हा यात त्याचा काहीतरी स्वार्थ असलाच पाहिजे, यात शका मुळीच उरत नाही. अस्तु. हा कोळसा उगाळावा तितका काळाच असणार. कारण इग्रज बोलूनचालूनच आशिया लुबाडण्यास बसले आहेत, त्याचेवर सद्हेतूचा वृथारोप का म्हणून करावा?

ब्रह्मदेशाचे लग्न हिंदुस्थानशीं लागल्याने कांही बाबतींत प्रजेवर निष्कारण कराचा बोजा पडला आहे, ही गोष्ट आकड्याच्या साहाय्याने पुढे यथानुक्रम सिद्ध करावयाचीच आहे. आणि म्हणून ब्रह्मी प्रजेची विभागणी मागण्यात मुख्य मनीषा कराचा बोजा कमी व्हावा अशीच असावी, यांत नवल नाही. परतु आमचे सायमन-सप्तक पुनः पुनः बजावून काय सांगते ते लक्षात ठेवा.

त्यांचे म्हणणे असे की, कराचा बोजा तर कमी व्हावयाचा नाहीच, पण तशी अपेक्षा खुद्द ब्रह्मी प्रजेची देखील नाही. वस्तुस्थितीचा वाटेल तसा विपर्यास करण्यासाठीच बादशहानी खास सायमनाची नेमणूक केली असती, तर असे लिहिणे त्याना शोभले असते. परतु इग्लड, अमेरिका किवा असल्या गर्भश्रीमत राष्ट्रात करात क्षुल्लक वाढ झाली असता केवढा मोठा गिल्ला माजतो हे लक्षात घेता दरिद्री व शेतकीप्रधान अशा राष्ट्रात, ज्याचा कच्चा माल बहुतेक परदेशी जातो अशाना, करात थोडी सुद्धा वाढ किती जबरपणे जाणवते हे शहाण्याना तरी समजावून सांगण्याचे कारण नाही. राजनैतिक अर्थशास्त्रातील तो एक सर्वमान्य व अविवाद्य असा सिद्धात असता सायमन-साहेब बेधडकपणे वरील विधान दडपून देतात तेव्हा त्याच्या धाष्ट्र्याची कमालच म्हटली पाहिजे. शिवाय ज्या ब्रह्मी कान्सिलचा त्यानी विभागणीचे बाबतीत आधार घेतला आणि त्याला मान दिला, त्याच कौन्सिलात डोईपट्टी (Capitation tax) कर रद्द करण्याबद्दल आठ वेळा ठराव आले होते, इकडे त्यानी दुर्लक्ष का केले? आणि ह्यावरून ब्रह्मदेश वेगळा झाल्यावर कर कमी व्हावे अशी अपेक्षा ब्रह्मी प्रजा करीत नाही, हेच सिद्ध होते काय? बादशहाना बजावून सागितले पाहिजे की, सायमन-सप्तकाने तुम्हास अगदी सपशेल फसविले, तुमची दिशाभूल केली. इतर लोकाचे आचार असे आहेत, त्यांचे विचार तसे आहेत, अमुक भावनाचा पगडा त्याचे मनावर आहे अशी बारीकमाराक वर्णन देणारानी ब्रह्मदेशातील शेतकऱ्यावर कराचा बोजा सर्वात अधिक आहे ही गोष्ट नमूद करण्याचे टाळावे यात खात्रीने गोम आहे. कारण डोईपट्टी रद्द करण्याबद्दलची ब्रह्मी कान्सिलमधील चर्चा ह्या भल्या बहाद्दरानी तर अगदीच डोळ्याआड केली आणि उलट ब्रह्मी प्रजेची कर कमी होतील अशी अपेक्षा मुळीच नसल्याचे ते बेधडक सागतात. प्रस्तुत बडाळीच्या बुडाशी ब्रह्मी प्रजेवर पडलेला कराचा कल्पनातीत बोजा हे एक कारण आहे, ही गोष्ट कोणीही ज्ञाता नाकबूल करीत नसता सायमनाच्या ह्या विधानास कितपत किमत देता येईल, ह्याचा विचारच करावा. याहीपेक्षा अधिक महत्त्वाची बाब म्हणजे ब्रह्मदेशविभागणीचा आर्थिक दृष्ट्या विचार सायमन कमिशनसाठी एका हुषार अधिकृत तज्ज्ञाने केला आहे. त्याच्या विवेचनास सायमन रिपोर्टात स्थळ मिळाले आहे. त्याने स्पष्टच

म्हटले आहे की, 'सुमारे १७६ लक्ष रुपये नवीन कर बसवून ब्रह्मी प्रजेकडून वसूल करावे लागतील.'* हिंदुस्थानच्या हाताला हात लावल्याने विनाकारण नसत्या खर्चाची धोंड आपल्या अंगावर पडते असे वाटून ब्रह्मदेश अलग राहू पाहतो तर हे आर्थिक तज्ज्ञ काय बजावतात ते पहा म्हणजे झाले. अगदी साध्या परिस्थितीत हा कराचा बोजा. मग ब्रह्मदेशात सीलोनप्रमाणे 'बादशाही वसाहत' ( Crown Colony ) प्रस्थापित झाल्यानतर साम्राज्यशाही खर्चाचे तट्टू अधिकाधिक चर्दी मागू लागणारच. ह्या आर्थिक तज्ज्ञानी कित्येक वादग्रस्त मुद्दे गृहीत धरले आहेत. हिंदुस्थानने ब्रह्मदेशासाठी सोसलेल्या झिजेची भरपाई, एकदर राष्ट्रीय कर्जात ब्रह्मदेशाचा भाग वगैरे बाबी नुसत्या तज्ज्ञाच्या मताने सुटणाऱ्या नाहीत. त्यावर पुष्कळच रणे माजतील. त्यातही एका महत्त्वाच्या आतरराष्ट्रीय शिरस्त्याचा भग देखील करावा लागेल. अशी गोष्ट सोईसाठी घडून येणार, असे समजून आर्थिक शास्त्यानी हा हिशेब केला आहे. साम्राज्यातील सवलतीच्या जकातीचे (Imperial Preference) तत्त्व इग्लड व इतर साम्राज्यातील घटक राष्ट्र यातच आतापर्यंत लागू आहे. कानडा व ऑस्ट्रेलिया अथवा हिंदुस्थान अशा साम्राज्यातील घटकानी आपसात ते उपयोजिले नाही आणि आतरराष्ट्रीय शिरस्ता लक्षात घेता तसे उपयोजिता यावयाचे नाही. ब्रह्मदेश हिंदुस्थानापासून वेगळा झाला म्हणजे आयातजकातीचा प्रश्न कसा सोडवावा ही चर्चा करताना ह्या आर्थिक तज्ज्ञानी एक बाब गृहीत धरली आहे. हे दोन्ही देश आपसात जकाती ठरवितील त्या इतर राष्ट्राच्या मानाने सवलतीच्या असावयाच्या असे त्याचे म्हणणे आहे. परतु, हा पक्षपात इग्लडला आपल्या वसाहतीच्या बाबतीत करता आला तरी हिंदुस्थान किंवा ब्रह्मदेशाला परस्परासाठी करता येईल की नाही हा मोठाच वादग्रस्त मुद्दा आहे. पण ह्या सर्वच गोष्टी गृहीत धरून सुचविलेली योजना लोकाना मान्य होईल असे मुळीच नाही. कारण बहुजनसमाज हा होता होईल तो आपणावर पडणारा कराचा बोजा कमी होणार असेल त्या योजनेसच तत्काळ समति देतो. जेणेकरून ब्रह्मी रयतेवर दर डोईमागे निदान वीसबावीस आणे दर वर्षी सरासरीने कर वाढणार आहे, अशा योजनेस आतुरतेने समति

* *Indian Statutory Commission*, **Vol. II, p. 283**

देण्याइतके खुळचट ब्रह्मी पुढारी असतील असे वाटत नाही. पण ते तसे आहेत असे सायमनसाहेब भासवीत आहेत.

हिंदुस्थानात ब्रह्मदेशाचा समावेश झाल्यापासून एकदर राष्ट्रीय म्हणून जे कर्ज हिंदी सरकारच्या माथ्यावर बसले त्यात ब्रह्मदेशाचा हिस्सा असलाच पाहिजे. तसेच ब्रह्मदेशाचा राज्यसंसार परवापर्यंत उधळेगिरीचा होता. तोंड-मिळवणी करण्यासाठी मध्यवर्ति सरकारला साल दरसाल त्यात काही तरी भर घालावी लागे. ह्या सर्व देण्याघेण्याचा विचार, एकत्र कुटुंबातून विभक्त होणाऱ्या ब्रह्मदेशामुळे करावा लागून योग्य प्रमाणात त्यातील बोजा ब्रह्मी प्रजेवर टाकावयास पाहिजे. तिन्ही ब्रह्मी युद्धाचा खर्च कोणी सोसावयाचा हा प्रश्नही पुनः उरतोच. ब्रह्मी प्रदेश खालसा व्हावयाचे, खर्च ( द्रव्य व माणसेदेखील ) हिंदुस्थानचा आणि साम्राज्य वाढून नावलौकिक पसरावयाचा तो मात्र ब्रिटिशांचा! तेव्हा सरळ पहाणारास हा खर्च ब्रिटिशांनीच द्यावा हे रास्त दिसेल. परंतु सायमन कमिशनचे तज्ज्ञ फडणिशी सल्लागार असे तसे नव्हते. त्यांनी इग्लडचा जसा काही या प्रकरणी काडीइतकाही सबंध नाही असे दाखवून म्हटले की, 'ब्रह्मदेशाने हा खर्च सोसावा किंवा नाही हा वादग्रस्त मुद्दा आहे!' इग्लडने ह्या बोजाची जबाबदारी का घेऊ नये? याबद्दल मात्र त्यांनी अवाक्षरही लिहिलें नाही. तिन्ही युद्धाचा खर्च सुमारे १ कोटि ८७ लक्ष पौंड झाला.* ब्रह्मदेशीय बजेटांतील तूट भरून काढण्या-साठी हिंदी सरकारने वेळोवेळी खर्च केलेली रक्कम तींत मिळविली आणि चक्रवाढव्याज आकारल्यास सुमारे ९० कोटि रुपये ब्रह्मदेशाकडून येणे निघेल§ असा सायमन-तज्ज्ञाचा अदाज आहे. पण असे चक्रवाढव्याज आकारले जात नाही, आणि ब्रह्मदेश वेगळा करण्यासाठी चग बांधलेले सरकार ही मागणी मान्यही करीत नाही. तात्त्विक दृष्ट्या हिंदी प्रजेवर ह्या खर्चाचा बोजा पडावयास नको होता, हे दिसून येईल.

सायमन-सुधारणांचा नूर एकदा कळल्यावर त्यांना किती किंमत द्यावी हे कळेल. पण सायमन-समकाच्या शिफारशींच्या बुडाशीं काय आहे हे पाहि-

---

* *Financial Obligations Between Great Britain & India*, **Indian National Congress.**

§ *Indian Statutory Commission*, **Vol. II, p. 281**

त्याने ह्या बादशाही कमिशनचे खरे स्वरूप एकदम प्रकट होईल. सायमनसाहेब म्हणतात, 'ली कमिशनसारख्याच्या सूचना हिंदुस्थानचे बाबतीत लागू करावयाच्या असल्या तरी ब्रह्मदेशात मात्र त्या मुळीच लागू करतां कामा नये.' सिव्हिल सर्व्हिसटात तद्देशीय प्रजाजनाचे प्रमाण मुंगीच्या पावलाने वाढवावे, ही ली कमिशनची साधी सूचना. तीमुळे हिंदुस्थानातील जबाबदार लोकमत असंतुष्टच आहे. पण तसली सुधारणादेखील ब्रह्मदेशाला पचणार नाही, असे हे सायमन 'डॉक्टर' सांगत आहेत, तेव्हा त्याचा डोळा कशावर आहे हे सांगावयास का पाहिजे? कोणीकडून तरी गोऱ्याना मनसोक्त चरण्यास कुरण मिळावे, अशीच त्या सप्तकाची इच्छा, आणि खरोखर त्याची तरतूद करण्यासाठीच ब्रह्मदेशांतले लोकमत, तेथील असंतोष किंवा त्या प्रांताचे हिताहित अशा बाबींचा कळवळा आहे, असें सोंग सायमनसाहेबाना आणावे लागले. असो. अन्यत्र कोठेही सायमन-सूचनांचा समाचार घेण्यास अवसर मिळाला नसता, तो ह्या ब्रह्मपुराणाच्या मंगलाचरणात मिळाला.

ब्रह्मदेशाकडे आमचे लक्ष मुळीच गेले नाही. वायव्य सरहद्दीकडे नेहमी काहीना काही तरी गडबड होते आणि म्हणून नुसती सरहद्द म्हटली की ती अफगाणिस्थानकडील वायव्य सरहद्दच, असा समज सर्वत्र दृढ झालेला दिसतो. परंतु वायव्येइतकेच महत्त्व ईशान्येकडे आहे, हें अद्यापि कोणाच्या लक्षात आलेले दिसत नाही. ब्रह्मदेशाला इतकें जपण्याचे कारण असे की, सुमारे १७०० मैल लांबीची ब्रह्मदेशीय सरहद्द परकीयाच्या प्रदेशाला लागून आहे. चीनच्या सीमेशीं सुमारे हजार मैल, फ्रेंच इंडोचायनाच्या हद्दीबरोबर सुमारे शंभर मैल आणि स्वतंत्र सयामच्या जोडीने जवळजवळ सहाशे मैल अशा रीतीने १७०० मैलाची सरहद्द परराज्याशीं जोडून आहे. तो प्रदेश डोंगराळ असला किंवा त्यातून रहदारी फारशी नसली तरी तिकडून परचक्राची भीति नाही, असे समजून चालणें धोक्याचे होईल. चीनची अलोट लोकसंख्या, बोल्शेव्हिकांची तेथील लुडबूड, फ्रेंचाचा व ब्रिटिशाचा फाटत चाललेला स्नेहसंबंध, इंडोचायनांतील २८००० खडें सैन्य, सयाममधील सक्तीचें लष्करी शिक्षण व म्हणून तेथे युद्धास लायक अशी प्रचंड सेना, अडीचशे विमाने ठेवून सयामने आकाशमार्गाचा केलेला बंदोबस्त, इत्यादि सर्व गोष्टींकडे दुर्लक्ष करतां येत नाही. विशेषतः 'सम्राटाच्या मुकुटातील

दैदीप्यमान हिरा’ सांभाळण्याचे काम असलेल्याना तर ह्यामुळे चिंता अधिकच उत्पन्न होते. चीनमध्ये शांतता नाही, म्हणूनच बरें आहे. तेथील यादवी एकदा का थांबली की, वायव्य सरहद्द बरी पण ईशान्य नको, असे म्हणण्याची पाळी येईल, आणि म्हणून कदाचित् चीनमध्ये अतस्थ कलह पेरण्याचें श्रेयही साम्राज्यहितदक्षाकडेच असल्यास त्यात आश्चर्य वाटण्यासारखे काहीच नाही. अस्तु.

ब्रह्मदेशातील बडाळीची कारणमीमासा करण्यासाठी त्या प्रदेशात अल्पकाळ वास्तव्य घडले त्या अवधीत जे पाहिले व जें समजले तेच ह्या ब्रह्मपुराणात सागितले आहे. तिकडील समाजस्थितीचा अभ्यास अत्यत मनोरजक व उद्बोधक असला तरी तो करावयास पाहिजे तसा करण्यास किंवा इतर महत्त्वाची शहरे पाहण्यास मला अवसर नव्हता. तेथील वातावरण दोन्ही अर्थाने अनुकूल नव्हते. म्हणून ब्रह्मदेशासबधाचे सर्वागीण विवेचन करण्याची माझी पात्रता नाही. बंडाळीची व विभागणीची चर्चा यथाशक्ति व यथामति केली आहे, ती सर्वानाच पटेल असे नाही. हिंदी बाधवाचीच कड घ्यावयास पाहिजे, त्याच्या दोषाकडे डोळेझाक करावयास हवी, अशा प्रकारचे आरोप मजवर येतील, हे मी जाणून आहे. पण वेगळ्या मनोभूमिकेमुळे उद्भवणारा हा मतभेद केव्हाही राहणारच. मिळविलेली माहिती चुकीची किंवा अपुरी असल्यास आणि तिजवरून मी काढिलेली अनुमाने बरोबर नसल्यास टीकाकारानी सडकून टीका करावी. तिजबद्दल मला विषाद न वाटता उलट आनदच होईल. परतु विनाकारण नापसती दर्शविणे अथवा बळेंच कांही तरी दोष काढावयाचे म्हणूनच काढून शिष्टाचा आव आणून परीक्षण करावयाचे ही रीत कोणी अवलबू नये, अशी माझी विनति आहे. त्यामुळे टीकेला व टीकाकाराला देखील किमत उरत नाही. चुकीचे माप पदरांत घालणे किंवा लेखकाची प्रगति होईल अशा सूचना करणे ह्याच बाबींना प्राधान्य देऊन परीक्षण लिहिल्यास सर्वच लेखक त्यांचे ऋणी राहतील हे विनवून सांगावें लागण्याची पाळी येते.

उद्धृत केलेले बहुतेक सर्व आकडे व इतर माहिती सरकारी पुस्तकांतूनच घेतलेली आहे. त्यासाठी मुख्यतः पुढील पुस्तकांचा उपयोग केला :—

1 *Memoranda submitted to the Statutory Commission by the Government of Burma.*
2. *Report of the Burma Provincial Banking Enquiry Committee, 1928-30, Vol. I.*
3. *Report of the Administration of Burma, 1928-29.*
4 *Indian Statutory Commission, Vol. I & II.*
5 *The Burman His Life & Notion–Shway Yoel*

ब्रह्मदेशास जाताना वाटेंत चितगाग येथे उतरून तेथील खटल्याची हकीकत समजावून घेतली. तीच थोडक्यात परिशिष्टात दिली आहे. प्रत्यक्ष ब्रह्मदेशाशी तिचा सबध नसला तरी ती इकडे कोणासच वाचावयास मिळाली नाही. नागपूरच्या 'महाराष्ट्र'त व मुंबईच्या 'प्रभात'मध्ये प्रसिद्ध झालेली ही माझी पत्रे पुस्तकरूपाने वाचकापुढे ठेवण्यास त्या त्या सचालकानी अनुज्ञा दिली, याबद्दल मी त्याचा आभारी आहे.

टिळक रोड,
पुणे, २८।८।३१

श्री. रा. टिकेकर.



गौतमबुद्धाचा अजस्त्र पुतळा–चात्रान.

## अध्याय पहिला

# ऐतिहासिक

ब्रह्मदेशाचा आणि हिंदुस्थानचा अर्थाअर्थी काही संबंध नसता, ‘ ब्रह्म ’ हे ब्राह्मणी नाव त्या देशाला कसें मिळालें हे खरोखरीच एक कोडें आहे. इंग्रजी भाषेत बर्मा ( Burma ) म्हणून म्हणतात तोच उच्चार खरा आहे. कारण आंग्ल-वाग्देवीस काही बोबड्या मुलाप्रमाणे R चा उच्चार स्पष्टपणे करताच येत नाही, असे म्हणावे लागते. ‘ बर्मा ’ यातील रेफ वर्ज्य करून जो उच्चार होईल त्याच नांवाने ‘ ब्रम्हों ’ लोक स्वदेश ओळखतात. मात्र लिहिताना ‘ म्रह्मा ’ असा काही तरी विचित्रच पाठ लिहिण्याचा प्रघात त्यांचेकडे पूर्वापार चालत आलेला आहे. हिंदुस्थानातून ब्रह्मदेशात गेलेले रहिवासी देखील ब्रह्मदेश हा शब्दप्रयोग न करता ‘ र ’कार अगदी नरमपणे उच्चारून ‘ बरमा ’ असेच त्या देशाला संबोधित असतात. यावरून इतकेच अनुमान निघते की, ब्राह्मण्याचा, ब्रह्मदेवाचा किंवा ‘ ब्रह्मज्ञानां ’तील ब्रह्माचा ब्रह्मदेशाशी कोणत्याही प्रकारचा दूरान्वयी संबंध देखील पोहोचत नाही. मग हे नाव त्या प्रांताला कसे मिळाले याविषयी संशोधकांनी शोध लावण्याचा प्रयत्न खुशाल करावा. तशा प्रकारच्या प्रयत्नास पुष्कळ वाव आहे.

ब्राह्मणी शिकवणीचा किंवा वैदिक धर्माचा पगडा ब्रह्मदेशांत आजमितीस असणे संभवनीय नसावे असे वाटते. कारण बौद्धधर्माचाच प्रसार तेथे प्राचीन काळपासून झालेला असणार हे उघड आहे. तत्पूर्वी हिंदु

संस्कृतीचा संपर्क तत्स्थानियास लागलेला असल्यास तो अथवा बुद्धोत्तर कालात कोणी हिंदु धर्मोपदेशक तिकडे गेले असल्यास त्याच्या मताचा प्रभाव, अशा दोन प्रकारानीच आर्यधर्मांचे काही अवशेष मात्र ब्रह्मदेशात आढळणे शक्य आहे. अभ्यासू दृष्टीने प्राचीन काळपासून आजपर्यंतचा इतिहास थोडक्यात अवलोकन केल्यास आपणास पाहिजे ती माहिती मिळेल. व्यापक अर्थाने इतिहासात प्रत्यक्ष इतिहासाव्यतिरिक्त इतर अनेक बाबींचा समावेश होतो हे लक्षात घेतले म्हणजे मी पुढे जी माहिती मांडणार आहे ती अप्रस्तुत नाही असे कळून येईल. कोणत्याही लोकाचा परिचय करून घ्यावयाचा असल्यास त्याचा थोडासा पूर्वेतिहास, त्याच्या चालीरीती व समाजव्यवस्था पाहिली म्हणजे ओळख नीटपणे होण्यास आणि झालेली ओळख टिकण्यास मदत होते. शिवाय कित्येक अज्ञात व आजपर्यंत अगम्य राहिलेल्या गोष्टी ठाऊक होतात. तेव्हा हिंदुस्थानास पूर्वेकडे लागून असलेल्या या ब्रह्मी शेजाऱ्यावर हिंदु संस्कृतीचे व हिंदु धर्मांचे काय काय परिणाम झालेले असावेत हे आपण प्रथम पाहू. कारण ह्यावरूनच काही माहिती मिळण्याचा संभव आहे.

आपण ब्रह्मदेश म्हणून ओळखतो त्या प्रदेशात बौद्धधर्माचा प्रसार असल्याचे वर सांगितलेच. परंतु शुद्ध बुद्धानुयायाप्रमाणे तेथील जनतेचे आचरण दिसत नाही. त्याच्या आचारात कित्येक बाबी अशा आहेत की, त्यात इतर कोणत्या तरी बाह्य रूढींचा परिणाम स्पष्टपणे दिसतो. ब्रह्मी प्रजेत सर्वत्र प्रचलित असलेली नॅट्पूजा पहा. नॅट् म्हणजे एक देवता. मग जलदेवता, वनदेवता, वास्तुदेवता, ग्रामदेवता अशाप्रमाणेच हे निरनिराळे ‘ नॅट् ’ असतात. कारण प्रत्येक वस्तूचे किंवा प्राण्याचे संरक्षण करणारी कोणी तरी एक देवता आहे असे त्याचे म्हणणे आहे. मुख्य असे पाच ‘ नॅट् ’ मानले आहेत. त्यांची नावेः—

१. मेक्का-सो, २. बोम्म-सो, ३. योक्क-सो, ४. आकाथ-सो, ५. थर-सो. ह्यांत ‘ सो ’ ह्याचा अर्थ ‘ देव ’ अथवा ‘ अधिपति ’ असा आहे. ही पंचमहाभूतेच आहेत असे म्हणण्यास फारसा प्रत्यवाय नाही. त्यांच्या मूळ संस्कृत नावावरील ब्रह्मी पोषाख उतरविला म्हणजे ह्या विधानाची सत्यता पटेल. मेघ, भूमि, वृक्ष ( रुक्ख ), आकाश व सरस् अशा संस्कृत शब्दांची

ही विकृत स्वरूपेच होत. ' र ' ऐवजी ' य ' व ' श, ष, स ' बद्दल ' थ ' असा फरक, संस्कृत शब्द ब्रह्मी भाषेत जातात तेव्हा होतो, असा नियम काढता येईल, इतकी उदाहरणे देता येतील. असो. नॅट्पूजेचे प्रकरण पुढेही पाहिले पाहिजे.

वरील पाच मुख्य नॅट् सोडले तर इतर ३७ नॅट् ब्रह्मी पुराणातून अथवा दंतकथांतून निर्दिष्टलेले आहेत. आपल्या इतिहासातील काही महत्त्वाच्या पण शोकमय आयुःक्रमाच्या पुरुषांची नावे नटच्या वरील यादीत काही जणांनी गोवलेली दिसतात. पण त्यातील प्रमुख व राजा म्हणून ' थग्य ' नॅट् आहे. त्याचे वर्णन ' शक्र ' ( देवाधिदेव इन्द्र ) या हिंदु देवतेशी जमते, म्हणून हे ३७ नॅट म्हणजे हिंदूंच्या ३३ देवांची ( देशकालास्थित्यनुसार ) सुधारून वाढविलेली आवृत्ति होय, असे तज्ज्ञांना वाटते.

ही नॅट्-प्रतिमेची पूजा ब्रह्मी प्रजेत कशी रूढ झाली यासबंधी विचार केल्यास ( १ ) निसर्गपूजन, ( २ ) पितृपूजन व ( ३ ) राक्षसपूजन अशा तिन्ही पूजनांचे ते एकत्रित स्वरूप असावे असे वाटते. समाजाच्या प्राथमिक अवस्थेत निसर्गात दृश्य होणाऱ्या सूर्य, वृक्ष, नदी इत्यादि ' शक्ती 'ची भीति वाटून ( अथवा इतर कारणांनी ) त्यांची पूजा करण्याकडे प्रवृत्ति होते तदनंतर मृत्युवश झालेल्या पितराविषयी पूज्यभाव व्यक्त करण्यासाठी किंवा त्यांनी आपणावर प्रकोप करू नये म्हणून त्यांची पूजाअर्चा सुरू होते. आणि अज्ञात अशा ' राक्षस 'शक्तींची उपासना करण्याकडे मन.प्रवृत्ति समाजाच्या बाल्यावस्थेत झुकली तर आश्चर्य नव्हे. परंतु ही त्रिविध पूजा आर्यांचीच असावी व ब्रह्मी प्रजेत नंतरच तिचे अनुकरण झाले असावे असे म्हणतात. खुद्द नॅट् शब्द देखील ' नाथ ' या संस्कृत शब्दापासूनच व्युत्पादिला जातो. अशा रीतीने आर्यांच्या आचारांचा परिणाम बुद्धानुयायी ब्रह्मी प्रजेवर न कळतच बसलेला दिसतो. आजमितीसही त्यांच्या चालीरीतींत तो व्यक्त होत आहे.

आणखीही कित्येक गोष्टी विचारात घेतल्या पाहिजेत. आर्यधर्माचे वर्चस्व ब्रह्मदेशावर पडलेले स्पष्टपणे दिसून येणार नाही हे खरे, पण काही बाबी अशा आहेत की, त्यावरून हिंदु संस्कृतीचा संबंध ब्रह्मदेशाशी आला असावा असा तर्क करण्यास पुष्कळशी जागा आहे. तेवढ्यावरून इतर बऱ्याच

गोष्टीची माहिती होईल. उदाहरणार्थ, हिंदुधर्मशास्त्राप्रमाणे सगोत्र विवाह निषिद्ध आहे. तीच चाल ब्रह्मदेशातील अनेक जातींपैकी कचीन जातीत प्रथमपासून रूढ आहे. राज्यपदारूढ होणाऱ्या

"भावाचे ते लगिन वहिणीशी लावावे"

अशी विचित्र चाल जेथे आहे व सापत्न माता किंवा सावत्र बहीण यांच्याशीं लग्न करणे जेथे निषिद्ध नाही, तेथे सगोत्र विवाहास धर्मशास्त्राप्रमाणे बंदी असावी, ह्यावरून ही चाल हिंदुस्थानातूनच तिकडे गेली असावी असा तर्क करण्यास हरकत कसली? विशेषतः कचीन लोकात तर विधवा भावजयीवर दिराचा हक्क असतो. तो विवाहित असला तरी त्याने द्वितीय कुटुंब म्हणून विधवा भावजयीशी लग्न लावावे, अशी 'धर्माज्ञा' असताना सुद्धा सगोत्र विवाह निषिद्ध असावा हे आश्चर्य होय. मात्र एवढे खरे की, 'गोत्र' असे त्याना ठाऊक नाही. ज्याचे 'कुलनाम' एकच आहे—मग ते कोठल्याही जातीचे असोत—अशाना आपसात विवाहबद्ध होता येत नाही अशी 'शास्त्राज्ञा' आहे.

आज रूढ असलेल्या चालीरीतींची बाब सोडून निरनिराळ्या जातीत प्रचलित असलेल्या दंतकथाकडे लक्ष दिल्यास आणखी महत्त्वाची माहिती मिळते. ब्रह्मदेशीयच पण निरनिराळ्या लोकाच्या अनेक जाती तेथे आहेत आणि त्याच्या मानवोत्पत्तिविषयी वेगवेगळ्या अशा 'पौराणिक' कल्पना सागतात. 'स्वर्गातून पाच पुरुष व चार स्त्रिया पृथ्वीवर आल्या व त्याची संतति म्हणजेच मानववंश,' असे एक जात मानते, तर दुसरीचे म्हणणे असे की, 'सूर्याने अडे घातले आणि एका ब्रह्मी स्त्रीने ते उबविले आणि त्यापासून मनुष्य झाला.' तिसऱ्या जातीची समजूत जराशी वेगळी आहे. ब्रह्मी राजकन्येपासून सर्व ब्रह्मी प्रजा उत्पन्न झाली असली, तरी तिला आपल्या 'प्राणप्रिया'चे दर्शन कधीच झाले नाही. यावरून ती आंधळी होती असे नव्हे, तर अज्ञात व अदृश्य अशाच प्राणप्रियापासून तिला गर्भ राहिला. कचीन लोकाची कल्पना या सर्वाहून वेगळी आहे. 'भाऊबहिणीचे लग्न झाले व त्याच्यापासून आमचे पूर्वज जन्मले,' असे ते म्हणतात. अशा अनेक कल्पनाच्या जालात गुरफटून जाण्याचे कारण नाही. त्याचा अर्थ कसा लावावयाचा अथवा हिंदु-पुराणादि ग्रंथाशी त्याचा

संबंध कसा पोहोचतो एवढेच ज्ञात्यांनी सांगितले म्हणजे काम साधेल. अफगाण पठाणांत दीरभावजयींच्या लग्नाची चाल आहे हे समजल्याने अभ्यासकास ऋग्वेदातील एका ऋचेचा अर्थ कळला. तसेच ह्या ब्रह्मी चालीरीती व कल्पनांवरूनही पुष्कळच कळण्याचा संभव आहे. अनेक जातींच्या भिन्न भिन्न रूपान्तरित नांवांत दनु व दानव ही नावे आहेत. ब्रह्मदेशाच्या वायव्येस 'नाग' लोकांचा प्रदेश व मणिपूर संस्थान आहे. मणिपुरासच 'पाण्डुनृपतिजनक' असा अर्जुन गेला होता. तेथे त्यास तद्देशीय पत्नी लाभून बभ्रुवाहन नामक पुत्रही झाला होता, इत्यादि पौराणिक कथा-भाग लक्षात आणल्यास बरीच माहिती मिळेल व अगम्य राहिलेल्या दाल-नाची दारे उघडतील. पण त्यासाठी पुष्कळच संशोधन करावे लागेल. नुसत्या कल्पनेने धागेदोरे जुळविता येतात. एवढ्यावरूनच कसलेही विधान एकदम करता यावयाचे नाही. मात्र त्याबरोबर हेही लक्षात ठेवले पाहिजे की, असल्या शोधामुळे ब्रह्मदेश आमचाच आहे असा हट्ट घेऊन बसण्याचे कारण नाही.

आसामच्या पूर्वेस असलेला हा ब्रह्मदेश दक्षिणोत्तर सुमारे तेराशे मैल लांब पसरला असून पूर्वपश्चिम रुंदी जास्तीत जास्त सातशे मैल आहे. वायव्येस आसाम, ईशान्येस चीन, नैर्ऋत्येस बंगाली उपसागर व आग्नेयेस सयामचे स्वतंत्र राज्य अशा त्या राज्याच्या चतु:सीमा सांगता येतील. त्या प्रदेशातील 'अमरपुरा' एवढे एकच शहर संस्कृत नाव धारण करून असले तरी इतर कोणत्याही गावाचे नाव संस्कृत नाही. परंतु, प्रोम शहरास **श्रीक्षेत्र**, पेगू शहरास **हंसावती** आणि साडु्व गावास **द्वारवती*** अशी हिंदु पौराणिक नावे होती, असे श्रीमती **सरलादेवी चौधराणी** यांनी ब्रह्मदेशीय हिंदु सभेच्या तृतीय परिषदेच्या अध्यक्षस्थानावरून केलेल्या भाषणात म्हटले आहे. ( रगून-२३-२४ मे, १९३८ ). ह्या विधानास दुसरा आधार सापडला नाही. पण ते काहीही असो, शेजारधर्मामुळे हिंदु आचारविचारांची लाट पलीकडे ब्रह्म-देशात गेली व तेथे बुद्धाचा धर्म सर्वमान्य झाला असतांनाही काही हिंदु

---

* "द्वारवतीत वसे तो यति वार्षिक मास चार पर्यंत" असें त्रिदंडी सन्यासी अर्जुनाचें वर्णन 'सुभद्राहरणा'त आहे, ती द्वारवती ब्रह्मदेशात होती असें समजा-वयाचें कीं काय?

चालीरीती आज देखील त्या प्रदेशात थोड्याफार फरकाने प्रचलित राहिल्या, यावरून सांस्कृतिक हल्ले कसकसे होत असतात आणि त्याचे स्वरूप किती काळपर्यंत टिकू शकते इत्यादि गोष्टी सिद्ध होतील. हिंदुस्थानसारखे प्रचंड राष्ट्र एका बाजूस व दुसरीकडे त्याहून विस्तृत असे चीनचे साम्राज्य, अशा दुहेरी कचाटीत ब्रह्मदेश निसर्गतःच सापडला असल्याने दोन्ही शेजाऱ्यांचे भिन्न भिन्न स्वरूपाचे आघात त्याजवर व्हावे यात आश्चर्य काहीच नाही. भौगोलिक परिस्थितीचा परिणाम सामाजिक व्यवस्थेवर कसा घडून येतो हे कळण्यास ब्रह्मी समाजस्थितीचा अभ्यास करावा लागेल. परंतु हे काम शेवटच्या प्रकरणावर सोपवून हल्लीच्या प्रश्नासच हात घालणे इष्ट आहे.

प्राचीनकालीन इतिहास असा ब्रह्मदेशचे बाबतीत निश्चितीने सांगता येण्यासारखा नाही. मध्य आशियातील काकेशस पर्वताच्या पायथ्यापासून निघालेल्या आर्य टोळयांपैकीच काही ब्रह्मदेशात गेल्या असाव्या असे बहुतेकांना वाटते. त्यांचा मार्ग अर्थातच समुद्रावरचा नसून उत्तरेकडून सरकत सरकतच त्या पूर्वेकडे गेल्या आणि नंतर इरावतीच्या तीरी त्यांनी प्रथम वसति केली असावी. तगाँ ( Tagaung ) येथे त्यांची ‘ राजधानी ’ होती असे म्हणतात. आज तगाँ हे कथा जिल्ह्यात इरावतीच्या पूर्वतीरी एक खेडे आहे. येथून मग त्या टोळींतील लोक भिन्न दिशांकडे पांगले असावे. ह्या प्राचीन इतिहासाचे निरीक्षण करतानाच प्रादेशिक रचनेमुळे काय काय परिणाम घडून आले असावेत हे अनुमानिता येते. मुख्य कपू विभागला जाऊन त्यांचे पक्ष इतरत्र गेले ते देखील दुसऱ्या नदीच्या आश्रयालाच. कारण नदीकिनाऱ्याकिनाऱ्यानेच नवी वस्ती वाढत असते. शिवाय वास्तव्य करण्यास सुपीकतेच्या व समृद्धीच्या दृष्टीने ‘ उतार वयातल्या ’ नदीतीरासारखी किंवा दुआबासारखी सोईची जागा नसते. गंगा-यमुना यांच्यामधील संपन्न देशाचा किंवा पंजाबातील कसदार जमिनीचा परिणाम त्या त्या ठिकाणच्या इतिहासावर कसा झाला आहे हे लक्षात आणले म्हणजे ब्रह्मदेशातही तशाच प्रकारच्या इतिहासाची पुनरावृत्ति झालेली दिसेल समृद्ध देशावर डोळा सर्वांचाच असावयाचा आणि त्यावर मालकी गाजविण्यासाठी आपसातील लढाया व्हावयाच्या. अशाच प्रकारचा इतिहास ब्रह्मदेशच्या बाबतीत झालेला आढळून येईल.

नकाशाकडे दृष्टि फेकताक्षणीच ब्रह्मदेशातील मुख्य भाग म्हणजे दक्षिणेकडील दक्षिणवाहिनी नद्याच्या मुखाकडचाच असावा हे स्पष्ट दिसते. इरावती, चिंड्विन, सिताग व साल्वीन ह्या तेथील मुख्य नद्या होत. त्याचा उगम उत्तरेकडील डोगराळ मुलखात असल्याने तेथे वस्ती तुरळक व विभक्त अशी असल्यास नवल नाही. ब्रह्मदेशाच्या उत्तरेस, ईशान्येस व वायव्येस देखील सर्व प्रदेश गिरिराजीनी व्याप्त असाच असल्याने तेथे फारशी वस्ती नाही. जसजसे दाक्षिणेकडे जावे तसतशी सपन्नता वाढीस लागल्याची चिन्हे दिसतात. अगदी ढोबळ मानाने ब्रह्मदेशचे विभाग तीन पाडता येतील. चितगागला लागून असलेला आराकान प्रात व तसाच पूर्वेकडील तेनासरीमचा निरुद पण लाबट असा पट्टा, हे दोन भाग आणि दोन्हीमधील उरलेला तिसरा. ह्यातच सर्व नद्याची पात्रे असून त्याच्या काठाकाठाने आबादी वाढत गेली आहे. आराकान हा भाग डोगराळ आहे. मध्यतरीचा जो मुख्य भाग म्हटला तो विस्तृत असून त्याचे चार पोटविभाग पाडता येतात: (१) उत्तरेकडील डोंगरी प्रदेश, (२) मध्यविभाग, (३) इरावती दुआब व (४) सिताग-साल्वीन दुआब, अशी त्याना नावे देण्यास हरकत नाही. पैकी डोगराळ मुलूख उत्तरेस असून चिंड्विन व इरावती त्यांतूनच वाहत येतात. आराकान व पूर्वेकडील शान सस्थाने याच्या मधील प्रदेशास मध्यविभाग म्हटले आहे. ब्रह्मदेशचे 'केंद्र' असे काढले तर याच विभागांत ते पडेल. ब्रह्मी लोकाचे खरे घर म्हणजे येथीलच आणि म्हणूनच येथे वारवार लढाया चालू असत. याच्या दक्षिणेकडील इरावतीच्या मुखापर्यंतचा प्रदेश तिसऱ्या विभागात मोडतो. पूर्वी तल्हॉ* लोकाचे ब्रह्मदेशात राज्य होते ते याच ठिकाणी. चवथ्या विभागात उत्तरेकडे थोडे डोगर आहेत, पण बाकीचा प्रदेश नद्यामुळे सुपीक व सपाट आहे.

प्रथमतः उत्तरेकडे आलेल्या ब्रह्मी पूर्वजापैकी काही आराकानकडे गेले व त्यांनी तेथे आपले राज्य स्थापिले. ब्रह्मदेशाच्या मध्यभागचा व आराकान प्रांताचा सबध तुटण्यास मधील आराकान योमा ही डोंगराची राग कारणीभूत होते, म्हणून तेथे विशेष कोणाचे हल्ले न सोसता त्याना अठराव्या शतका-

---

* Talaings—यांसच मॉन व पॅगुआन अशीं नावें आहेत.

पर्यंत राज्य करता आले. मध्यविभागाचे मात्र तसे झाले नाही. तेथे स्थायिक झालेल्या ब्रह्मी लोकाना दक्षिणेकडील तल्हॉ लोकाशी सारखे झगडावे लागले. मध्यविभागाची राजधानी प्रोम शहर असून तल्हॉचे मुख्य शहर **ठटोन** ( Thaton ) हे होते. इ. स. ७४२ च्या सुमारास ठटोनकरानी प्रोम हस्तगत करून त्याचा धुव्वा उडविला. तरी ब्रह्मी राजानी **पगान** येथे नवीन राज्य स्थापले. तल्हॉचा ब्रह्मदेशाशी सबंध फार पूर्वापारचा असल्याने त्याना तो प्रदेश आपल्याच हाती असावा असे वाटे आणि म्हणून त्याचे ब्रह्मी राज्यकर्त्याशी वारवार झगडे होऊन 'ब्रह्मदेशावर मालकी कोणाची' हा प्रश्न रणभूमीवर सुटत असे. ब्रह्मी घराण्याचे वर्चस्व प्रोमच्या पाडावानतर सुमारे पांच शतके अबाधित राहू शकले आणि ह्याच कालात ब्रह्मदेशातील उत्कृष्ट अशी कारागिरी, पॅगोडा ( बुद्धमदिर ) व इतर इमारतीच्या रूपाने प्रकट झाली. इतकी शातता, सुबत्ता व वैभवशालीनता भूतकालातील अथवा भविष्यकालच्या कोणत्याही राज्यकर्त्यास लाधली नाही असे त्या वेळचे वर्णन करितात. **अनाव्रत** हा त्याच्या घराण्यातील पराक्रमी व थोर राजा होऊन गेला. त्याने इ. स. १०४४ पासून १०७७ पर्यंत राज्य केले आणि तेवढ्यातच तल्हॉचा पराभव करून त्याचे राज्य आपल्या अमलाखाली आणले. याच वेळी ठटोनहून त्याने बुद्धधर्माचे ' बी ' आणून आपल्या देशबाधवात त्याचा प्रसार केला. कित्येकाचे असे म्हणणे आहे की, ब्रह्मदेशात उत्तरेकडूनच बौद्धधर्म गेला आणि बौद्धधर्माच्या ' महायान ' शाखेने हे धर्मप्रसाराचे कार्य केले. सिलोनातील ' हीनयान ' शाखेने दक्षिण ब्रह्मदेशातील तल्हॉ लोकावर नवीन धर्माची छाप पाडून त्याच्याकरवी ब्रह्मदेशात गौतमाची शिकवण पसरविली असे काहींचे म्हणणे आहे. यातील खरेखोटे समजावयाचे कसे हे कोडेच पडेल. पण तूर्त हा प्रश्न बाजूसच टेवला पाहिजे.

अनाव्रताचे पश्चात् पगानचे गादीवर १३ व्या शतकापर्यंत ब्रह्मी राजेच आले, पण शेवटचे दोघे कमनशिबी निघाले. **नरथु** हा शत्रूकरवी मारला गेला म्हणून त्याला ' कलाच्या मिन् '*( परकीयांनी पराभूत केलेला राजा ) म्हणत. त्याच्या नतर आलेला **नरातिपाद** हा पुढे ' तयो प्ये मिन् ' ( शत्रूच्या

---

* मिन् = राजा, असा ब्रह्मी भाषेंतला अर्थ आहे.

पुढून पळालेला राजा ) म्हणून ओळखला जाई. कारण ब्रह्मदेशच्या पूर्वेकडील शान व चिनी लोकानी मिळून पगानवर हल्ला करून वरील दोन्ही राजाची अशी दुर्दशा केली व आपली सत्ता त्या प्रदेशावर स्थापिली. मात्र त्यात मध्यवर्ती अधिकार कोणाचाच नसे. ब्रह्मदेशाचे लहान लहान सुभे पाडले जाऊन त्यावर शान व चिनी ' सुभेदार ' राज्य करीत. हा प्रकार १६ व्या शतकापर्यंत चालला. ब्रह्मी राजाचा पुरा नायनाट कधीच झाला नसल्याने ह्या धामधुमीच्या काळात कसेबसे टिकून राहिलेले टाऊंगू ( Toungoo ) येथील घराणे पुढे सरसावले आणि पुनः एकदा ब्रह्मदेशावर ब्रह्मदेशीय राजे अधिकार चालवू लागले. त्याच्यात तबिनश्वेती व बइननॉव ( Bayinnaung ) हे दोन मोठे पराक्रमी राजे झाले. बइननॉवची कारकीर्द इ. स. १५५१ ते १५८१ पर्यंत होती. तल्हॉ राजाच्या मुलखावर देखील सत्ता ह्या नूतनोदित ब्रह्मी घराण्याची असल्याने बडग्बोरीस वाव राहिलाच होता. पण याच सुमारास टोपीवाल्या फिरंग्याचा प्रवेश ब्रह्मी भूमीत झाला आणि येथून ब्रह्मदेशच्या इतिहासास वेगळेच वळण लागलेले दिसते.

टोपीवाल्यात पोर्तुगीजाचा नंबर पहिला होता. त्यानी इ. स. १६१९ मध्ये टाऊंगूच्या राजाकडून ' व्यापारास सवलती ' मागितल्या आणि सिरियम व मर्ताबान ( म्हणजे आज रंगून व मोल्मीन आहे त्याच्या आसपास ) येथे ' वखारी ' स्थापिल्या. डच व इंग्रज मागोमाग आलेच. नीग्रे, बसीन, प्रोम, एवा, इत्यादि ठिकाणी ' वखारी ' व दलालाची दुकाने वाढली. इकडे तल्हॉ लोकाची राज्यपदप्राप्तीसाठी धडपड चालूच होती. इ. स. १७५० च्या सुमारास त्यानी जोराचा प्रयत्न करून एवा हे राजनगर जाळून उद्ध्वस्त केले. त्याच्या जोडीस चीन व मणिपूर या दोन्ही बाजूनी ब्रह्मदेशावर हल्ले होतच होते. परंतु औंगझेया अथवा अलौंपया ( Alaungpaya ) नावाचा ब्रह्मी राजा ह्याच समयी प्रबळ होऊन त्याने तल्हॉचा संपूर्ण पाडाव इ. स. १६६० चे सुमारास केला. इतकेच काय, पण सयाम व मणिपूर अशा विरुद्ध दिशाकडील प्रदेशावर हुकमत चालविण्याची त्याची महत्त्वाकांक्षा होती व ती तृप्त करण्यासाठी त्याने त्या प्रांतांवर स्वारीही केली. पण तो लगेच मृत्युवश झाला. मात्र ब्रह्मी राज्य पुनः ब्रह्मी राजांच्या

तत्राखाली त्याच्या कर्तबगारीनेच आले. शिवाय तल्हॉचा पराभव झाला त्याचे कायमचे स्मारक म्हणूनच की काय, औगझेयाने रगून हे शहर वसविले. रगून हे नाव हुडकून काढण्यातही त्याने तल्हॉचा बीमोड झाला असा आशय आणला. ' यगून ' म्हणजे ' युद्धाची अखेर ' ( ब्रह्मी भाषेत ' य र योरभेदः ' हे सूत्र प्रचलित दिसते, म्हणून रगूनला ' यगून ' म्हणतात ) हा अर्थ असला तरी ब्रह्मी भूमीवरील रक्ताचा सडा काही थाबला नाही किंवा आपलेच पुत्र आपसात भाडून आपल्या माडीवर चिरतनची निद्रा घेत पडलेले पाहण्याचे दुःख ब्रह्मी भूमीच्या कपाळचे चुकले नाही. एका अर्थाने युद्धाचा शेवट झाला खरा, पण तल्हॉशी यापुढे लढाया झाल्या नाहीत, तरी दूरदेशस्थ, परधर्मी लुटारूनी व्यापाराच्या मिषाने ब्रह्मदेशात पाऊल ठेवले व आपणास आश्रय देणारावरच उलटून त्याच्याशी लढाई करण्यास ते सिद्ध झाले, हा विचित्र इतिहास आता पहावयाचा आहे. त्रयस्थानी येऊन ब्रह्मी भूमातेच्या लाडक्या पुत्रास चोरदरोडेखोराप्रमाणे वागविले आणि तिच्या सर्व पुत्राना भिकेला लावून आपण सर्व मुलखाचे मालक होऊन बसले. ही अघटित घटना ब्रह्मदेशदेवतेला पहावयाची होती ! तिच्या पुत्राना म्याडाच्या हातून कपटाने व लबाडीने मरण यावयाचे होते ! अस्तु.

फिरगी व्यापारी व बौद्ध राजे याचे आपसात पटेना. नुसत्या व्यापारावर टोपीकर सतुष्ट होते कोठे ? त्याना ब्रह्मी राजाना टोपी घालून आपल्या मस्तकी मुकुट ठेवण्याची हाव सुटली. म्हणून कसल्या ना कसल्या तरी कुरापती निघत. प्रथम फ्रेचानी कारस्थाने सुरू केली. त्यानी प्रचलित राजाविरुद्ध तल्हॉशी बोलणे सुरू करून ब्रह्मी राजाना सिंहासनावरून उतरविण्याचा घाट घातला. म्हणजे त्याना कोणाविषयी प्रेम होते असा प्रकार नव्हता. पण वाममार्गाने जाण्याची ही फिरग्याची रीतच ! ह्या राजद्रोहाच्या गुन्ह्याबद्दल फ्रेचाना योग्य ती शिक्षा झाली. इग्रजानी हा वेळ पावेतो कोणाचीच बाजू घेतली नाही. दोन्ही शत्रु भाडत असता ब्रिटिशानी फक्त ' व्यापार वाढविण्यासाठी ' अधिक सवलती मागितल्या आणि राजकीय घडामोडीकडे आमचे लक्षच नाही असे दाखविले ! पण पुढे त्यांचेही गुण उघडकीला आले आणि तत्कालीन राजाने त्याना त्याच्या घोर गुन्ह्याबद्दल यथायोग्य प्रायश्चित्त दिले. ह्या सर्व घडामोडी अलौपयाच्या कारकीर्दीत घडल्या.

हा पराक्रमी राजा इ. स. १७६० मध्ये निवर्तला. आणि नोंगद्वाजी गादीवर आला. त्याची मनधरणी करून आणि मागील प्रकार मुकाट्याने विसरून ब्रिटिशानी आपले हातपाय पसरण्यास सुरुवात केली. नोंगद्वाजीनतर एकंदर चार पाच राजे इ. स. १७८१ पर्यंत एवाच्या गादीवर बसले, व इ. स. १७८३ मध्ये एवाची राजधानी अमरपुऱ्यास नेण्यात आली. त्या वेळी बौदोपाया हा राजा होता. ह्या अमदानींत मणिपूर व सयामवर ब्रह्मी झेंडा फडकून आला! आणि ह्या विजयाने उत्साहित झालेले ब्रह्मी लोक आसाम जिंकण्यास उत्सुक झाले होते. हिंदुस्थान सरकारला ब्रह्मदेशाविषयी विशेष काळजी वाटू लागली आणि त्यानी नेहमीची चचुप्रवेशाची पहिली पायरी म्हणून 'आमचा वकील आपल्या दरबारी घ्या,' अशी विनति केली. इ. स. १७९५ मध्ये अमरपुऱ्यास आलेला ब्रिटिश वकील दोन वर्षे राहिला. पण ब्रह्मी राजा मुळीच बधला नाही म्हणून हात हालवीतच त्यास परतावे लागले. बोदोपाया इ. स. १८१९ मध्ये निर्वाणपदी गेल्यावर बाजीडो गादीवर आला. नतर त्याने आसामवर स्वारी केली व तो प्रदेश जिंकला! लगेच ब्रिटिश सरकार खवळले आणि इतके दिवस सुप्त असलेला क्रोधाग्नि भडकला. त्यानी ब्रह्मी सेनानी महाबदुला हा बगालवर हल्ला करण्यात गुतला आहे हे पाहून तेनासरीम प्रात बळकाविला आणि मर्तबान व रगून येथेही ब्रिटिश निशाण रोवले! प्रत्यक्ष लढाई करून जिंकण्याचे सामर्थ्य जसे काही त्याच्या अंगी नव्हतेच. इ. स. १८२५ मध्ये महाबदुला मृत्यु पावला आणि मग ब्रिटिशाना स्फुरण चढले. इ. स. १८२६ मध्ये यांडबो येथे ब्रिटिशानी ब्रह्मी राजाशी तह केला. पहिले ब्रह्मी युद्ध अशा रीतीने दोनअडीच वर्षे चालले आणि त्यामुळे ब्रिटिशाना आसाम, आराकान व तेनासरीम हे तिन्ही प्रात मिळाले, युद्धाप्रीत्यर्थ खडणी म्हणून एक कोट रुपये ब्रह्मी सरकारने कलकत्तेकर कपनीसरकारला द्यावे व परस्पराचे वकील एकमेकानी आपल्या दरबारी ठेवून घ्यावे असे ठरले.

बाजीडो राजाच्या कारकीर्दीत ब्रिटिशाची सरशी होऊन अपमानास्पद अटी ब्रह्मी राजावर लादल्या गेल्या, हे अर्थातच ब्रह्मी प्रजेला आवडले नाही. बाजीडोला हुसकावून त्याचा भाऊ थारावडी गादीवर आला. त्याचें व ब्रिटिशाचे काही केल्या जमेना. ब्रिटिशाची अपेक्षा अशी की, ब्रह्मी

राजाने आपल्या मुठीत रहावे. पण ब्रह्मी राजा त्यांना परधर्मी, उपरे, लुटारू असेच मानीत असे आणि कोणत्याही प्रकारचा पक्षपात न दर्शविता केलेल्या गुन्ह्याबद्दल ब्रिटिशाना तो शिक्षा देई. पुढे इ. स. १८४६ मध्ये थारावडीच्या निधनानतर त्याचा पुत्र पगानमिन सिहासनारूढ झाला. तरी ब्रिटिशाची डाळ काही केल्या शिजेना. बापाचे निःपक्षपातीपणाचेच आचरण पगानमिनाने चालविले. ब्रिटिशाना त्याने काही सवलती दिल्याच नाहीत. ब्रिटिश कप्तानानी खलाशास मारल्याबद्दल त्याना पगानमिनने शिक्षा दिली म्हणून हिंदी गव्हर्नर जनरल डलहौसी यानी ब्रह्मी सरकारकडून नुकसानभरपाई मागितली! ब्रिटिश प्रजाजन म्हणजे जसे काही गुन्हे करणारे नसतातच! नुकसानभरपाईच्या पत्राचे उत्तर आले नाही म्हणून लगेच ५-४-१८५२ रोजी लढाई आरभून एक जाहीरनामा काढून पेग् प्रात ब्रिटिश सत्तेखाली असल्याचे जाहीर केले. ब्रह्मी राजावर देखील काही अटी लादल्या, असे जाहीरनाम्यातच लिहिले. प्रत्यक्ष दरबाराशी लेखी अथवा तोंडी अशी कसलीही कारवाई न चालविता ‘ दडपश्चमे ’च्या धोरणाने आपले घोडे एकसारखे पुढे दामटण्याची ब्रिटिशाची ही निंद्य वृत्ति आशियात सर्वत्रच दिसते. वरील प्रकारचा जाहीरनामा म्हणजे दुसऱ्या ब्रह्मी युद्धाची अखेरच होय. दोन्ही युद्धाचा मिळून एक कोट चाळीस लक्ष पोंड* खर्च मात्र हिंदुस्थानच्या माथ्यावर लादण्यात आला!

ब्रह्मदेशात आराकान, तेनासरीम, मर्ताबान व पेगू इतके प्रांत ब्रिटिश सत्तेखाली आले असल्याने त्याचा मिळून एक इलाखा इ. स. १८६२ मध्ये करण्यात आला व त्यावर चीफ कमिशनरची नेमणूक झाली. हेतु हा की, त्याने हळूहळू इतर प्रदेश घशाखाली घालावा. कारण ब्रिटिशानी ब्रह्मी अज्ञान राजे अधिकारारूढ असताना किंवा ते पैशाच्या अडचणीत असता, त्याना कर्ज दिले असे दाखवून व्यापारासाठी सवलती, हक्क व काही मक्ते मिळवून ठेवले होते. ते निर्धोकपणे यावच्चद्रदिवाकरौ चालावेत अशी त्याची इच्छा. पण अशी उघड लुटालूट कोणता शहाणा राजा चालू देईल? पगानमिनच्या पश्चात् मिडोमिन गादीवर आला असल्याने भोळेपणाने त्याने

---

* *Financial Obligations Between Great Britain and India*— ( **Indian National Congress** ) p. 17

ब्रिटिशाना पुष्कळच जवळ केले. मडालेचा तह करून ब्रिटिशाचा वकील आपल्या दरबारी ठेवून घेतला व त्याच्या बऱ्याच अटी कबूल केल्या. थोडक्यात बोलावयाचे तर तो इग्रज मुत्सद्द्याच्या चागलाच आहारी गेला. पुढे इ. स. १८७८ मध्ये थीबा गादीवर आला व त्याने मात्र इग्रजी कावा नीट ओळखला. ब्रिटिशाची व थीबाची बाचाबाची सुरू झाली. थीबाने युरोपमध्ये एक शिष्टमडळ पाठवून इतर राष्ट्राशी सधाने बाधण्याचे काम सुरू केले. ब्रिटिशाचा वकील मात्र तो ब्रह्मदेशात येऊ देईना. खलित्यावर खलिते हिदुस्थान सरकारकडून रवाना होत. पण थीबाने कशालाच दाद दिली नाही. ब्रह्मदेशातील लाकूड लुटणारी एक ब्रिटिश कपनी आहे. तिच्या अधिकाऱ्यानी कलमाप्रमाणे सरकारची फी बरीच वर्षे भरली नाही म्हणून ब्रह्मी हायकोर्टाने कपनीकडून येणे राहिलेले २३ लक्ष रुपये ताबडतोब वसूल करावे, असा निकाल दिला. पण परकीयाची सपत्ति लुबाडण्यास सोकावलेले हे लाटेगगाजी त्याला कबूल होईनात. 'तुम्ही परराष्ट्राशी सबध ठेवणे हे ठीक नाही. सर्व कारवाई आमच्या मार्फतच झाली पाहिजे.' अशी धमकी हिदी सरकारने थीबास किती वेळा तरी दिली. परतु थीबाने तिकडे लक्षच दिले नाही आणि आपले स्वतत्र बाण्याचे वर्तन चालू ठेवले. शेवटी एकदा ब्रिटिशाकडून निर्वाणीचा खलिता थीबाकडे गेला आणि ता. ११ नोव्हेंबर १८८५ रोजी ब्रह्मदेशावर हल्ला झाला! कोठेही विशेष लढाई न होता किंवा चकमकी न होता १५-२० दिवसातच सर्व ब्रह्मदेशावर लाल रग फासला गेल्याचे नकाशावर दिसू लागले! थीबा राजा कैदी बनला व ब्रिटिशाचा आश्रित म्हणून त्याला मोठ्या लवाजम्यानिशी रत्नागिरीस नेऊन ठेविले! इ. स. १८८६ च्या आरभापासून ब्रह्मदेश हिदुस्थानास जोडला गेला. हिदुस्थानांतील इतर राजवटीप्रमाणेच ब्रह्मी राजसत्ता लुप्त झाली आणि पारतन्त्र्यातील गुलामगिरी व जबरीने लादलेले दारिद्र्य त्याच्या नशिबी आले.

असा हा पूर्वीचा इतिहास आहे. ब्रह्मदेश हिदुस्थानला का जोडला किंवा ह्या सर्व युद्धाचा खर्च हिदी तिजोरीवर का पडला, ह्याचें उत्तर एकच. 'हिदुस्थानच्या सरक्षणाप्रीत्यर्थ'. आजमितीस ब्रह्मदेशचे अधिपति कोणीही असोत. मागील इतिहासावरून हें स्पष्ट होते की, ब्रह्मदेशांत परकी सत्ताधीश-

परधर्मीय राजा—आला असेल तर तो ह्याच वेळी होय. हिंदुस्थानात मोगलाचे किंवा इतर यवनी राजाचे राज्य पूर्वी पुष्कळ वर्षे झाले, तशी गोष्ट ब्रह्मी प्रजेची नव्हती. त्याचे स्वराज्य निर्भेळ होते. आज त्याच्यावर परधर्मी परदेशस्थ राज्यकर्ते आले. उपऱ्या लोकानी त्याना लुबाडण्यास सुरवात केली म्हणून ब्रह्मी प्रजा चिडली आहे. हिंदुस्थानवर राज्य करावयास लागून पन्नास वर्षे होण्याचे सुमारास हिंदुस्थानातही 'बंड' माजले होते, तशापैकीच प्रकार प्रस्तुत काली ब्रह्मदेशातला असावा. त्याची भूमिका नीटपणे समजावी म्हणून हा ऐतिहासिक चित्रपट थोडक्यात काढला आहे. ब्रह्मदेशाचा इतिहास स्वतंत्रपणे लिहिण्यास अधिक जागा लागेल आणि इतिहासलेखनास लागणारी पात्रता प्रस्तुत लेखकास नाही याची त्यास जाणिव आहे. ब्रह्मदेशस्थाचे गाऱ्हाणे तरी काय आहे याची कल्पना येण्यास मात्र हा त्रोटक वृत्तात पुरेसा आहे.

———

अध्याय दुसरा

# आर्थिक

ब्रम्हदेशातील बंडाळीचे खरे कारण 'आर्थिक' आहे, राजकीय हेतु त्या बंडवाल्याच्या मनात नाहीत, असे दर्शविण्याचा हिंदी पत्राचा रोख असतो. याच्या उलट, ब्रिटिश राज्य उलथून पाडण्याचे कट करणारे या बंडात सामील आहेत, असे सिद्ध करण्यास लेखी पुरावा आपणाजवळ आहे, म्हणून सरकार जाहीर करते. तेव्हा यातले खरे कोणते? किंवा नुसते 'आर्थिक,' 'आर्थिक' म्हणजे तरी कसले कारण?—ह्या बाबीचा कळेल अशा रीतीने उलगडा केला पाहिजे. सध्याच्या कल्पनातीत मदीमुळे उद्भवलेला 'आर्थिक' जुलूम ब्रह्मी प्रजेलाच भोगावा लागला असे नव्हे, किंवा तेवढ्याने ह्या बंडाळीस उग्र

स्वरूप प्राप्त होऊन, तो वणवा सातआठ महिने धुमसत रहावा असेही नव्हे. यावरून खरेखुरे कारण वेगळेच असले पाहिजे असे वाटते. ब्रह्मदेशातील प्रजेवर जंगली पद्धतीने मोगलाई कर लादले आहेत, हे सुधारलेल्या ब्रिटिश राज्यपद्धतीचे वैशिष्ट्यच म्हटले पाहिजे! जमीनमहसूल हा तर चोहोकडेच असतो. पण ब्रह्मी प्रजेवर लादलेले तातमेडा व डोईपट्टी हे दोन कर आपणास ठाऊकही नाहीत. नाही म्हणावयास, औरंगजेबाने हिंदूवर बसविलेल्या 'जिजिया' कराची आठवण डोईपट्टीने होईल, इतकेंच! तातमेडा कर वसूल करण्याच्या पद्धतीत गरीब रयतेवर किती जुल्म होत असतील ते असोत, पण तो आकारण्यातही अंदाधुंदीस बरीच वाट ठेवली आहे. शेतकऱ्याच्या दर झोपडीमागे सुमारे दहा रुपयेप्रमाणे तातमेडा आकारला जातो. तो का, किती व कोणी ठरवावयाचा, याला आधुनिक शास्त्रीय पद्धतीचे नियम मुळीच नाहीत. किमानपक्षी 'इतके रुपये तुमच्या खेड्यातून आले पाहिजेत' असे म्हटले की, 'तर्जी' ( ब्रह्मदेशस्थ 'पाटील' ) व तमाडी ( तातमेडा आकारणारे ह्पसर ) करवसुलीची व्यवस्था करितात. गेल्या चार वर्षांतले या तातमेडाचे सरासरीचे उत्पन्न ४३,७४,००० रुपये आहे. शहरगावचे लोक, सरकारी नोकर, धर्मोपदेशक, पतोजी इत्यादि पांढरपेशाकडून हा कर मुळीच वसूल केला जात नाही. त्याना माफी असते.

डोईपट्टीचा प्रकार तर और आहे. विवाहितावर पाच व विधुर किंवा अविवाहित यावर अडीच रुपये अशी दर वर्षाची साधारणपणे आकारणी पडते. ही फक्त पुरुषानाच लागू आहे. सतरा वर्षांच्या मुलापासून तो साठी उलटेपर्यंतच्या म्हाताऱ्यास ही डोईपट्टी सारखीच जाचते. तातमेडाप्रमाणे हिची बाधाही नागरिक, सरकारी नोकर, धर्मोपदेशक व 'तात्या पतोजी' इत्यादि पांढरपेशास मात्र होत नाही. गेल्या चार वर्षांच्या सरासरीने डोई-पट्टी म्हणून दरसाल सुमारे ५७ लक्ष रुपये सरकारी तिजोरीत येतात असें दिसते. याखेरीज आणखीही एक प्रकारचा नवा कर ब्रह्मी प्रजेवर लादण्यात येतो. राहण्यासाठी किंवा शेतीच्या इतर उपयोगाकरिता अडविण्यात आलेल्या जागेचें, दर चौरसफुटाला दीड पै या प्रमाणाने, भाडे आणि दर एकरी तीन रुपये याप्रमाणे मोकळ्या अथवा लागवडीच्या जमिनीचा आकार, डोईपट्टीच्या ऐवजी घेण्याचा प्रघात कित्येक ठिकाणी आहे. जेणेकरून अधिक उत्पन्न

होईल अशी आकारणी सरकारी कामकऱ्यानी करावी व रयतेला पिळून काढावे ह्याच हेतूने अशी योजना केलेली नव्हे काय? म्हणजे जमीनमहसूल, तातमेडा व डोईपट्टी ( व तिचा हा सावत्र भाऊ ) अशा करानीच मिळून सरासरीने ४७४ लक्ष रुपये दरवर्षी सरकारला मिळतात. शिवाय मच्छीमारीच्या धंद्यापासून मालीना सरासरीने सत्तेचाळीस ते अठ्ठेचाळीस लाखाची किफायत सरकार करते. दर जाळ्यामागे कर बसव किंवा मासे पकडण्याच्या जागेवर आकार ठरव, अथवा मच्छीमारी करण्याचे मक्ते दे—अशाच पद्धतीने हा कर घेतला जात असल्याने त्याचे उत्पन्न इतके अधिक आहे. गरीब शेतकरी व रोजमजुरी करून हातावर पोट भरणारानाच हे कर अधिक बाधणार हें उघड आहे.

एकदर ब्रह्मदेशची लोकसंख्या सुमारे एक कोट तीस लाख मानली तर निदान ९० लक्ष इसम ब्रह्मदेशीय म्हणता येतील. त्यातले सर्वच शेतावर राहतात असे नाही. पण सर्व लोकसंख्येपैकी ९० लाख जनानाच उपरिनिर्दिष्ट कर भरावे लागतात, असे म्हणण्यास प्रत्यवाय नाही. सगळ्या करांचें उत्पन्न साधारणपणे असे होते:—

| कर | लक्ष रुपये |
|---|---|
| जमीनमहसूल | ३६८ |
| तातमेडा | ४४ |
| डोईपट्टी | ५७ |
| इतर तसलेच कर | १॥ |
| मच्छीमारीचे मक्ते | ४७ |
| एकूण | ५१७॥ |

नव्वद लक्ष इसमाकडून पाच कोट साडे सतरा लक्ष रुपये वसूल केले जातात म्हणजे प्रत्येकाला अदाजे पावणेसहा रुपये सक्तीने भरावे लागतात! ही सरकारच्या तिजोरीत जाणारी रक्कम झाली. प्रत्यक्ष शेतकऱ्याच्या खिशाला खरोखरी किती चट्टा बसत असावा, हे आकड्यानी कसे सिद्ध करता येईल?

दिल्ली अथवा सिमला येथे बसून, मध्यवर्ति सरकारने लादलेले नवे कर कसे वाढले हे पाहिले, तर ब्रह्मदेशियाच्या आर्थिक हानींची कल्पना येईल.



श्वे डगॉन पॅगोडा—दुसरी बाजू.

१९१६–२१ ह्या पंचवार्षिकात सरासरीने जितका कर मध्यवर्ति सरकारसाठी म्हणून ब्रह्मदेशात वसूल होत असे, ( उदाहरणार्थ, आयात जकात, इन्कम-टॅक्स् वगैरे ) त्यात शेकडा १२८ ची वाढ पुढील सहा वर्षांच्या सरासरीत झाली. म्हणजे पूर्वी ३३६ लक्ष वसूल होत, तेथे नंतर ७६७ लक्ष होऊ लागले! लोकसंख्या अर्थातच त्या मानाने वाढली असती किंवा संपन्न झाली असती तर हा कराचा बोजा इतका जाचला नसता. हिंदुस्थानातील इतर प्रांतात असल्या कराची वाढ ह्याच काळात शेकडा ६४ या प्रमाणात झाली असता ब्रह्मदेशात मात्र ती १२८ प्रमाणे होते. ह्याचा परिणाम तेथील प्रजाजनास भोवला असलाच पाहिजे यात शंका नाही. ब्रह्मदेशीय जनतेच्या पोषाखात नेहमी झकपक दिसणारे तलम रेशमी वस्त्र असते. ते स्वस्त असे परदेशाहून येते. हिंदुस्थानातील एकंदर रेशमावरील आयात जकातीचा एकपंचमांश एकट्या ब्रह्मदेशातील बंदरात मिळाला. तेच प्रमाण काड्याच्या पेट्यावरील जकातीचे आहे. याचे कारण ब्रह्मी लोकांचे चिरूटांचे जबरे व्यसन असावे. ब्रह्मदेशाच्या चौपटीहून अधिक लोकसंख्या असलेल्या हिंदुस्थानात रेशीम व काड्याच्या पेट्या यावरील जकातीचा फक्त प्रत्येकी चारपंचमांशच वसूल होतो व बाकीचा भाग छोट्याशा ब्रह्मदेशातून मिळतो, ही गोष्ट, येथील जनतेवर आर्थिक बोजा किती पडत असेल, हे पटण्यास पुरेशी आहे.

सरकारी कराच्या दृष्टीने पहाताना एकदम डोळ्यात भरणाऱ्या गोष्टींचा हा विचार झाला आता दुसऱ्या एका महत्त्वाच्याच–पण फक्त शेतकरी रयतेला नडणाऱ्या–अडचणीचा विचार केला पाहिजे. हिंदुस्थानाप्रमाणेच ब्रह्मदेश कृषिप्रधान आहे. इतकेच काय पण ती सर्व शेती बहुधा भाताचीच असते! शेतींत रुपयापेकी तेरा आणे जमीन भातखाचरात गुतली जाते. सालीना सुमारे ७० लक्ष टन ( ९४,५०,००० खंडी ) भात ब्रह्मदेशात तयार होते. यावरून भाताच्या पिकाचा व तेथील व्यापारात, लोकांच्या राहणीत यामुळे किती दूरवर परिणाम होत असावा याचा अंदाज करता येईल. परंतु भाताच्या शिताभोवती भुते जमणारच. भाताचे वैपुल्य पाहून दूरवरची भुते गोळा झालीं व ब्रह्मी लोकांच्या तोंडचा घास काढून घेण्यापर्यंत त्यांच्या बुभुक्षित-तेची मजल गेली. अथवा '**हविषा कृष्णवर्त्मेव**' याप्रमाणे भात खाऊन खाऊन त्यांची भूक अधिकाधिकच वाढू लागली, अशातला प्रकार झालेला दिसेल.

इग्रजानी ब्रह्मदेश कसा घशात घातला, याचा इतिहास देण्याचे जरी हें स्थळ नसले, तरी एवढी गोष्ट खरी की, हिंदुस्थानच्या राज्यकारभारी शकटाला ब्रह्मदेश जोडला गेल्यापासूनच ब्रह्मदेशाच्या अलीकडील खऱ्या उन्नतीस ( किंबा नागवणुकीस पाहिजे तर म्हणा ) प्रारभ झाला. गोऱ्या ब्रिटिश व्यापाऱ्याच्या दृष्टीने ब्रह्मदेशाची उन्नति म्हणजे तो कच्च्या मालाचे कोठार बनणे हीच होय. ब्रह्मदेशाने आपला सारा कच्चा माल पडत्या भावाने त्याच्या पदरात टाकून त्याचा महाग पक्का माल आपण मुकाटपणे घेतला म्हणजे या व्यापाऱ्याच्या दृष्टीने त्याची प्रगति सुरू झाली ! व इग्रजाच्या ताब्यात ब्रह्मदेश जाताच या अर्थाने त्याची उन्नति लवकरच सुरू झालीही !

ही उन्नति घडवून आणणाऱ्या मुख्य बाबी घडल्या त्या ह्याः भातशेती करण्यास भरपूर मजूर व त्याना पोटापुरते अन्न देऊन गुलामाप्रमाणे राबवून घेणारे सावकार हिंदुस्थानातून मद्रासेकडील विभागातून ब्रह्मदेशाकडे धावले. सुधारलेल्या व्यापारी भाषेत बोलावयाचे, तर जमिनीची उत्पादनशक्ति वाढविण्यासाठी लागणारे भाडवल व मनुष्यबल घेऊन हे मद्रासी भाडवलवाले ' ब्रह्मदेशाच्याच केवळ हितासाठी ' जलयानांतून देशत्याग करून परकी ठिकाणी धावत गेले असे म्हणता येईल. एकदर विस्ताराच्या मानाने ब्रह्मदेशात लोकवस्ती कमी—म्हणजे पुष्कळच कमी आहे—ही गोष्ट खरी. हिंदुस्थानात दर चौरस मैलास लोकसख्येची सरासरी २२६ पडते, तर ब्रह्मदेशात फक्त ५७ च आहे. प्रातवारीने पाहिले तर बगालचा आकडा ६०८ येतो आणि पजाबचे प्रमाण २०७ आहे. तुलनात्मक दृष्टीने ब्रह्मदेशात किती विरळ लोकसख्या आहे याची, या आकड्यावरून साधारण कल्पना येईल.

हें आकड्याचें क्रिचकट पुराण आणखी थोडे लाबवावे लागणार, त्याला इलाज नाही. भाताच्या लागवडीखाली जमीन अधिकाधिक जाऊ लागली, तसतशी भांडवलाची गरज वाढली, आणि त्याच प्रमाणात परदेशी जाणारा तांदूळही वाढू लागला. ब्रह्मदेशातून तादुळाची निर्गत वाढली आणि भाताखाली अधिक एकर जमीन गुतू लागली ह्या गोष्टी खऱ्या आहेत; व त्याचे परिणाम पुढे काय झाले, हेच आपणांस पहावयाचे आहे. ह्यासाठी पुढील तुलनात्मक बाढीचे आकडे पहा :—

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १८९६–५५ | लक्ष | एकर | भात | जमीन |
| १९१६–१०६ | ,, | ,, | ,, | ,, |
| १९२९–१२१ | ,, | ,, | ,, | ,, |

ही वाढ चटकन् डोळ्यात भरणारी आहे.

ह्यामुळे हिंदुस्थानातून आलेल्या मद्रासी सावकाराचा–ब्रह्मदेशात ते चेट्टी किंवा चेट्टियार म्हणून ओळखले जातात–प्रसार ब्रह्मी खेड्यापाड्यातून सुद्धा झाला आहे. 'सावकार' म्हटला की, तो चेट्टीच असा ब्रह्मी लोकाचा समज दृढ होण्याइतका प्रसार ह्या भांडवल पुरविणाराचा झाला! आजमितीस सुमारे साठ ते सत्तर कोटि भांडवल नुसत्या चेट्टींनी ब्रह्मदेशात गुंतविले आहे, असा सरकारने नेमलेल्या बॅंकिंग इन्कायरी कमिटीचा साधा अंदाज आहे! याखेरीज इतर दुकानदार, भाताचे गिरणीवाले किंवा अन्य प्रकारचे व्यापारी याच्या भांडवलाचा अंदाज वेगळाच असणार. पण नुसत्या भातासाठी चेट्टियाराचे ६० ते ७० कोट रुपये ब्रह्मदेशात गुंतले आहेत ही गोष्ट काय दर्शविते?

'शेतीसाठी भांडवल पुरविणारे सावकार' म्हणजे शेतकऱ्याच्या जमिनी आपल्या नावावर करून घेण्याचे कारखानेच होत. शेतीचा धनी असलेला शेतकरी काही निमित्ताने सावकाराकडून कर्ज घेतो, त्याबद्दल तारण म्हणून जमीन लिहून देतो आणि फेड झाली नाही म्हणजे सावकाराच्या जमिनी खंडाने करावयास घेतो, आणि नंतर मग नुसता मजुरी मिळविणारा नागऱ्या बनतो. हा अनुभव हिंदुस्थानातच काय, पण इतर सर्व देशातला आहे. शेतकऱ्याला कर्ज द्यावयाचे, त्याच्या जमिनी गहाण ठेवून घ्यावयाच्या व नंतर कर्जफेडीसाठी जमिनीवर आपली मालकी प्रस्थापित करावयाची, हा सावकाराचा कायदेशीर शिरस्ता सर्वांस ठाऊक आहे. अशा प्रकारे सावकाराकडे जमिनी कशा जाऊ लागल्या, याचे गमक गहाणखताची जी झपाट्याने वाढ होत गेली तीत दिसते.

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| १९२० | साली | ४३१०० | गहाणखतें | रजिष्टर | झालीं. |
| १९२४ | ,, | ६१२०० | ,, | ,, | ,, |
| १९२८ | ,, | ६३५०० | ,, | ,, | ,, |

गहाणखताची ही वाढ शेतकऱ्याच्या हलाखीचें व त्याच्यावर पडणाऱ्या

सावकारी आश्रयाच्या सावलीचे वाढते प्रमाण दर्शविते. गहाणखताची रक्कम पाहिली म्हणजे विशेषेकरून शेतकऱ्याची दरिद्रावस्था व असहाय्यता लक्षात येते. वरील तीन वर्षांची गहाणाची रक्कम अनुक्रमे—

| | |
|---|---|
| ४ कोट ३७ लक्ष | रुपये आहे. |
| ८ ,, ८३ ,, | |
| ९ ,, ४८ ,, | |

केवळ जमिनीची किंमत वाढती असल्यानेच हे आकडे फुगले आहेत असे खास म्हणता यावयाचे नाही.

या आकड्यांनी दर्शविलेल्या स्थितीस प्रत्यक्ष ज्ञानाची पुस्ती जोडली म्हणजे ब्रह्मदेशातील लोकांची आर्थिक दृष्टीने आज कशी दैना उडाली आहे, याची जाणीव होईल. खुद्द रंगून शहर हे परकी वाटतच नाही. तेथे हिंदी भाषा सर्रास चालते. हिंदी व्यापाऱ्यांची दुकाने, हिंदी कारखानदारांचे कारखाने, नोकरी करणाऱ्या हिंदी लोकांची तात्पुरती घरे, पैसेवाल्या हिंदी धनिकांच्या मोठमोठ्या हवेल्या व चाळी, ‘ रिक्षा ’ ( ही माणसाने ओढून न्यावयाची दुचाकी गाडी असते ) ओढणारे हिंदी ‘ कूली ’, प्रत्येक ऑफिसात चपरासी, पट्टेवाला किंवा ‘ दर्वान ’ म्हणून राहिलेला हिंदी जवान, अशांचा मनस्वी भरणा रंगूनमध्ये आहे ! पांढरपेशा ‘ बाबू ’ लोकांचा कचेरीत प्रवेश झाला तर एक वेळ चालले असते. पण, ‘ कूली ’चे काम करणारे सुद्धा जर हिंदुस्थानातून ब्रह्मदेशात जाऊ लागले, तर तेथील बेकार ब्रह्मी प्रजाजनांनी काय करावे ? आणि पोटाला अन्न तरी मग कोणत्या उपायांनी मिळवावे ? सावकारी, शेती, दुकानदारी, नोकरी, हमाली या सर्वच पेशांत हिंदी जनतेचे प्राबल्य दिसून आले, तर बिचाऱ्या ब्रह्मदेशीय बेकारांनी दोष तरी कोणाला द्यावा ? अशा स्थितीत हिंदी लोकांनीच आपल्या तोंडचा घास काढून नेला, त्यांनीच आमच्या जमिनी बळकावल्या, सर्व नोकरीच्या जागा तेच पटकावून बसले, आम्हाला व्यापारातही डोके वर काढण्यास अवसर त्यांनी ठेवला नाही, अशी समजूत ब्रह्मदेशियांची झाली तर त्यात गैर काय आहे ?

ह्या वेळ पावेतो हिंदी सरकारकडून प्रत्यक्षपणे ब्रह्मी रयतेला जाचणाऱ्या कराची व तेथे स्थापित झालेल्या हिंदुस्थानातील नागरिकांमुळे होणाऱ्या

ब्रह्मी प्रजेच्या बेसुमार कुचंबणेचीच थोडक्यांत चर्चा झाली. इंग्रजी व्यापाऱ्यानी ब्रह्मदेश धुवून नेण्याचा प्रयत्न आज किती तरी वर्षे चालविला आहे, त्याचा उल्लेख ह्यात केला नाही. तसेंच अबकारी, जंगल, कोर्ट फी वगैरे सरकारच्या शोषक खात्याचाही निर्देश टाळला आहे. तथापि ब्रह्मदेशस्थाची आर्थिक हलाखी कशी झाली आहे ह्याची अल्प तरी कल्पना येण्यास एवढें विवेचन पुरे आहे.

---

## अध्याय तिसरा

# राजकीय

'राजाच्या अपराधाविना प्रजेमध्ये अकाली मृत्यु देखील होत नाही,' अशी आपली प्राचीन आर्य लोकाची समजूत बरेच दिवसापर्यंत होती. प्रजेवर कोसळणाऱ्या अरिष्टाची, आपत्तीची व त्याबरोबरच प्रजाजनाच्या उत्कर्षाचीही जबाबदारी मुकुटभारभृतावर असते, हेच ह्या समजुतीतील मूळ तत्त्व होय. पण नोकरशाहीच्या अमदानीत तो नूर पालटला. इंग्रज राज्यकर्ते आगगाड्या केल्या त्याचे श्रेय घेतात, देशात एकछत्री राज्य व सर्वत्र शातता प्रस्थापित केली, त्याचेही श्रेय 'टोपीकर' आपणाकडेच घेतात; निर्यात व्यापार वाढविला, शाळा-कॉलेजे उघडली, उद्योगधदे चालू केले इत्यादि सर्व बाबींच्या श्रेयाचा वाटाही त्याना पाहिजे असतो. मात्र, जनतेचें वाढते दारिद्र्य, बोकाळलेली बेकारी, बेसुमार बालमृत्यु, अज्ञानाचा पगडा इत्यादिकाची गोष्ट निघाली की, मग समाजातील घातुक रूढी, धार्मिक भावना वगैरेची सबब पुढे करून प्रचलित राज्यकर्ते स्वतःवरील जबाबदारी बेशरमपणे टाळून प्रजाजनावरच दोषाचे खापर फोडण्यास तयार होतात.

ही राज्यकर्त्यांची भावना कशीही असो, अथवा आधुनिक कालच्या नवीन विचारसरणीप्रमाणे प्रजेच्या मनांतील राजाविषयीच्या कल्पना कशाही

बदलोत, अडाणी जनतेची पक्की समजूत अशी आहे की, राज्यकारभारातील दोषामुळेच आपणावर सर्व सकटे कोसळतात. आपणास होणाऱ्या फायद्याचे श्रेय खेडवळ कोणास देतात, ते सागता येणे कठीण. परतु. प्रजेचे पीडन होऊ लागले की, त्याचे सर्व खापर राजसत्तेच्या मस्तकावरच फोडावयाचे, ही त्याची साधी, सरळ रीत असते. मग ती कदाचित् चुकीचीही असू शकेल. ब्रह्मदेशातील असतुष्ट प्रजाजनानी आपल्या हलाखीची जबाबदारी प्रचलित राज्यकर्त्यावरच टाकली असून, या असतोषातूनच सध्याच्या बडाचा उद्भव झाला आहे असे म्हणता येते.

ब्रह्मी शेतकऱ्याची नागवणूक नोकरशाहीकरवी कशी होत असते, याचे ढोबळ दिग्दर्शन मागील लेखात केले. त्याच्या मनातून जुन्या ब्रह्मी राजघराण्याविषयीचा आदरभाव अद्याप नष्ट झाला नाही. कारण, ब्रह्मदेशीयाचा मडाले येथे रहाणारा मूर्धाभिषिक्त राजा थीबा हा त्याच्या आठवणीत अद्याप कायमच आहे. शिवाय, थीबा म्हणजे सूर्यवशीय भूपति, त्याची सत्ता ‘ साता ’ समुद्रापलीकडेही आहे तो जबुद्वीपाचा देखील स्वामी आहे, तो धर्माचा आधार आहे, प्रत्यक्ष विष्णूचा तो अश आहे, इत्यादि पौराणिक कल्पना आजमितीसही खेडवळाच्या मनात खेळत आहेत. अशा आपल्या पूज्य राजाला ‘ उपऱ्या ’ लोकानी पकडून चोरासारखे कैदेत डाबून ठेवले, याबद्दल त्याना साहजिकच पराकाष्ठेचे दुःख होऊन, त्याच्या भावना कायमच्या दुखविल्या गेल्या असल्यास त्यात आश्चर्य नाही.

अर्थात् आपल्या स्वातत्र्याचे अपहारक म्हणूनच ते इग्रज राज्यकर्त्यास ओळखतात. थीबा राजाला पदच्युत करून त्याला कैदेत टाकण्याचा प्रसग ब्रह्मी प्रजा कशी विसरेल? इ. स. १८८६ मध्ये ब्रिटिशाची सत्ता सर्व ब्रह्मदेशावर झाली असली, तरी १८५२ पासून हळूहळू एक एक प्रांत बळकावण्याचे इग्रजी धोरण ब्रह्मी जनतेला कळले नव्हते असे नाही. फक्त त्यानी आपल्या मनातील व्यक्त केलेला रोष निरुपयोगी ठरला एवढेच! मधूनमधून ही राज्यपद्धति आपणास नको, या भावनेने थारावडी व आसपासचे प्रांत यात बडेही झाली. ब्रह्मदेशात बडाळी ही काही नवी चीज नाही. खून, लुटालूट, जाळपोळ, मारामारी, दरवडे ह्या गोष्टी तिकडील जनतेच्या आगवळणीच पडलेल्या दिसतात! हिंदुस्थानांतील गुन्ह्यांचे प्रमाण

पाहिले, तर ते असे आढळते की, १० लक्ष लोकांपैकी दर वर्षी ६२६ जणांना कारागृहात जावे लागते. परतु ब्रह्मदेशात तेंच प्रमाण १६४० आहे; म्हणजे १० लक्ष ब्रह्मी प्रजाजनांपैकी १६४० इसम दर वर्षी कैदेत टाकले जातात. याचा अर्थ ते गुन्हे करतात हाच होतो. ब्रह्मी न्यायालयातील न्यायदानात व हिंदुस्थानातील न्यायदानांत फरक असतो, असे म्हणतां यावयाचे नाही. थारावडी जिल्ह्याची कीर्ति तर फारच मोठी आहे. तेथे दर वर्षी खून पुष्कळ होतात. तेथील शिरगणति ५ लाखांहून कमी असतांही १९२७ मध्ये त्या जिल्ह्यात ८५ खून आणि पेगू जिल्ह्यांत (लोकसंख्या ४,४६,६२८) ५४ खून झाले. तथापि यावरून त्या लोकांचे नैतिक वर्तनच सर्वस्वी दोषास्पद आहे, असा तर्क मात्र मुळीच काढता येत नाही. मनुष्य अनन्वित कृत्ये करावयाला प्रवृत्त होतो तो बहुधा परिस्थितीने त्याला भाग पाडल्यामुळेच होय. सुखासुखी अथवा गमतीखातर खून करणारे मनुष्यप्राणी अर्वाचीन इतिहासात तरी सापडत नाहीत. आपणास सोडून गेलेल्या राज्यलक्ष्मीला परत आणण्यासाठी जनता – मग ती कितीही अडाणी असो – प्रयत्न केल्यावाचून रहात नाही. आपले नष्ट झालेले स्वत्व किंवा स्वराज्य परत मिळविण्यासाठी धडपड करणे, हा मनुष्यस्वभावच आहे; व ब्रह्मदेशातील सध्याच्या बडाळीत हा मानवी स्वभाव प्रगट झाला आहे, असे म्हटले तर ते चूक होणार नाही.

राजकीय चळवळींत ब्रह्मी धर्मगुरूंचे प्राधान्य असते, ही गोष्ट धर्म्य का अधर्म्य, हा प्रश्न तूर्त बाजूला ठेवून, तिजपासून काय काय परिणाम होतात, एवढेच पाहिले पाहिजे. सर्व ब्रह्मदेशात मिळून सुमारें ८०,००० धर्मगुरु असावेत. त्यांपैकी ६०,००० राजकीय चळवळीत उघडपणे भाग घेतात. फुंजींचें म्हणजे धर्मोपदेशकाचे समाजातील स्थान उच्चच असावयाचे. त्यांतूनही, पारमार्थिक लाभाच्या गोष्टी बोलण्याचे न सोडतां, बहुजनसमाजास सहज आकलन करिता येणाऱ्या अशा ऐहिक हिताहिताच्या बाबीचासुद्धा ते जेव्हां विचार करू लागतात, तेव्हां त्यांची लोकप्रियता अधिकच वाढते.

शिवाय पीतवस्त्र परिधान करणे–फुंजींनी पिवळेच वस्त्र वापरलें पाहिजे, असा नियम आहे – म्हणजे ऐहिक मर्त्य राजांच्या कायद्यापासून अलिप्त राहण्याचा हक्क प्राप्त करून घेणेंच होय, असे धर्मभोळ्या ब्रह्मीजनांना वाटतें.

फुजीवर कसल्याही प्रकारचा आरोप येऊ शकत नाही किंवा त्याना कैदेंत डांबतां येत नाही, ही ब्रह्मी जनतेची पूर्वापर दृढ समजूत. ती फक्त इंग्रजी अमलाखालीच ढासळण्याचा योग आला. पण, जेव्हा जेव्हा एखाद्या फुजीला पकडण्यात येई अथवा शिक्षा ठोठावली जाई, तेव्हा तेव्हा उडणारी खळबळ व लोकात पसरणारी प्रक्षुब्धता पाहून सरकारी अधिकाऱ्याना सुद्धा धाक वाटे! सरकार धर्मोपदेशकाना सुद्धा इतर गुन्हेगाराप्रमाणे कैदेत टाकते, ह्यामुळे अडाणी जनता जर राजकर्त्यांवर रुष्ट झाली, तर काय नवल?

सरकारविरुद्ध चळवळ करण्याचे व्यसन ब्रह्मी फुजीना अगदी अलीकडेच जडलेले दिसते. हिंदुस्थानला मॉटेग्युसाहेबानी दिलेल्या सुधारणा ब्रह्मदेशाला लागू केल्या नव्हत्या. कारण, ब्रह्मदेश हा फार उशिरा ब्रिटिश अमलाखाली आलेला आणि निदान शभर वर्षे तरी उमेदवारीत काढल्याविना नवीन सुधारणा करण्यास तो प्रदेश लायक नसतो, हे राज्यकर्त्यांचे जणू व्यवहार-सूत्रच! परतु, ब्रह्मी प्रजेला अशा सापत्न भावाने—पंक्तिप्रपचाने—वागविण्याचा अपमान साहजिकच दुःसह वाटला, आणि म्हणून ब्रह्मी जनतेने एकवटून जोराची चळवळ केली. याच वेळी फुजीची सेना राजकीय आखाड्यात उतरली असे म्हणतां येईल.

त्यालाही असेच एक कारण झाले. ब्रह्मदेशाला राजकीय सुधारणाचा हप्ता कोणता द्यावा, याविषयी तत्कालीन ले. गव्हर्नर यानी आपल्या शिफारशी वरिष्ठ सरकारकडे पाठविल्या. मॉटेग्यु सुधारणा ब्रह्मी जनतेस पचण्यासारख्या नाहीत, असे त्याचे मत होते. इतकेच नव्हे, तर चालू असलेल्या राज्यपद्धतीच्या मानाने पिछेहाटीच्याच सूचना स्थानिक सरकारने केलेल्या पाहून ब्रह्मी जनता विशेष खवळली. वरिष्ठ सरकारने त्या सुधारणा (!) मानल्या नाहीत ही गोष्ट अलाहिदा. पण त्यामुळे जनतेचा अपमान झाला व सरकारविरुद्ध संघटित चळवळीस आरभ ह्या वेळेपासूनच झाला, असे म्हणण्यास प्रत्यवाय नाही. ब्रह्मी पुढाऱ्यानी लोकमान्याच्या ‘ होमरूल ’ची मागणी केली व पुढे ह्या मागणीस महत्त्व येण्यासाठी महात्माजींच्या असहयोगाचा स्वीकार केला. मात्र अहिंसेचे व्रत त्याना अद्याप कळलेले दिसत नाही!

ब्रह्मदेशीय इंग्रज सत्ताधीशांना म. गांधींच्या असहयोगाचा तडाखा पहिल्याने भोवला तो नव्या मॉटेग्यू कायद्यान्वये होणाऱ्या मध्यवर्ति असेंब्लीच्या

निवडणुकीवर बहिष्कार घालण्याचा. नतर रगून युनिव्हर्सिटीच्या उद्घाटन-समारभापासून शिक्षणसस्थावर बहिष्कार घालण्यास जी सुरुवात झाली, ती १९२४ पर्यंत जोरात होती. त्या मध्यतरीच्या काळात बादशहाचे बेटे ( प्रिन्स ऑफ वेल्स ) रगून येथे येऊन गेले. त्याच्या स्वागतावर पडलेला कडक बहिष्कार इतका तीव्र होता की, बहिष्कारवाद्याना शासन करण्यासाठी स्थानिक सरकारला 'बर्मा अँटी-बॉयकॉट ॲक्ट' या नावाचा एक कायदा १९२२ मध्ये पास करून घ्यावा लागला! पण ही चळवळ व्यर्थ गेली नाही. कारण, 'स्पेशल बर्मा रिफॉर्म्स कमिटी' नेमून, 'मॉडफर्ड' सुधारणा ब्रह्मदेशासही लागू करण्यास त्याची समति मिळविण्याशिवाय दुसरे गत्यतरच सरकारला उरले नाही.

फुजींनी राजकारणात भाग घेऊन, ठिकठिकाणी गुप्त सस्था काढल्या; यग मेन्स बुद्धिस्ट असोसिएशन्स निघाल्या, 'सघ-समिती' स्थापण्यात आल्या आणि ह्या सर्व सस्थात फुजींचे प्राबल्य दिसे. फुजींनी चालविलेल्या चळवळीचे दृश्य फल १९२४ मध्ये दिसून आले. 'डोईपट्टी व घरपट्टी (तात-मेडा ) कर देऊ नका' म्हणूनच त्यानी उपदेश केला, व काही जिल्ह्यातील शेतकऱ्यानी त्याच्या सोयीनुसार बर्तन केले देखील! करबदीची चळवळ आपणाकडे नवी असली, तरी ब्रह्मी जनतेने त्या हत्याराचा उपयोग १९२४ साली केला होता, हे लक्षात ठेवण्यासारखे आहे.

फुंजींना करबदीची चळवळ सुरू करताच, त्याच्यावर 'राजद्रोह' व तसलेच इतर आरोप ठेवून त्याना सरकारने कारावासात टाकले. क्रिमिनल लॉ अमेडमेट ॲक्टाखाली गुप्त सस्था गैरकायदा ठरविल्या. तेव्हा फुजींना कैदेत टाकणाऱ्या सरकारचा हेतु बौद्धधर्मावर आघात करण्याचा आहे, असेच जनतेला वाटू लागले. अर्थातच ते अधिक खवळले. असतोषाचा पारा चढू लागला. राजसत्तेविरुद्ध चळवळ केल्यास 'होमरूल' मिळेल आणि मग डोईपट्टी किंवा घरपट्टीसारखे घातुक कर लगेच माफ होतील अशी लोकांची समजूत झाली. ठिकठिकाणी लोकाची व सरकारी पोलिसाची झटापट होऊन मारामारीपर्यंत पाळी येई. मॅजिस्ट्रेटने मिरवणुकीस बदी करावी, लोकानी फुजीच्या नेतृत्वाखाली ती मोडावी. नतर पोलिसाशी मारामारी व्हावी, हे प्रकार चालूच होते.

मडालेचा १९२४ सालचा दंगा ह्या वेळच्या चळवळीत विशेष महत्त्वाचा होता. त्यांत दोन पोलिस, एक फुजी व एक मुलगा असे चवघेजण तात्काळ ठार झाले व जखमी झालेल्याची संख्या तर अधिकच होती. धर्मगुरूंचे पुढारी यु उत्तम म्हणून एक फुजी होते ( ते अद्यापही आहेतच ). त्याना रंगून येथे ऑक्टोबर १९२४ मध्ये राजद्रोही भाषणे केल्याबद्दल शिक्षा ठोठावण्यात आली. त्याच्या एका अनुयायाचीही तीच गत झाली. पण त्यामुळे लोकक्षोभ त्या वेळी किती वाढला, मॅजिस्ट्रेटचा हुकूम मोडून सभा किती भरविल्या गेल्या व युरोपियन रहिवाशाना ते दिवस किती धाकधुकीचे गेले, याची यथार्थ कल्पना रंगून पोलीसच देऊ शकतील! पुढे ब्रह्मी सरकारने या संस्थामध्ये मतभेदाचे बीज पेरून, त्याची जूट युक्तीने मोडली, इत्यादि कथाभागाशी आपणास तूर्त कर्तव्य नाही राजकीय चळवळीत ब्रह्मी जनतेने भाग कसा घेतला आणि फुजींनी तिला कसले वळण लावले, हे पहाण्यापुरतेच राजकीय परिस्थितीचे धावते निरीक्षण केले आहे.

यु उत्तमाचा उल्लेख वर केलाच आहे. सरकारच्या दूर दृष्टीच्या व लांब कानाच्या चार खात्याने अशी माहिती मिळविली आहे की, हे श्री. उत्तम म्हणजे फारच भयंकर इसम आहेत. सरकारच्या मते त्यानी फ्रान्स देशाशी संगनमत बांधून १०,००० सैन्य व चार विमाने याचे साहाय्य मिळविले आहे. 'ते सर्व आपल्या मदतीस यावयाचे असल्याने ब्रह्मी शेतकऱ्यानी बंड करावे, अत्याचार करण्यास मागेपुढे पाहू नये.' अशा आशयाची शिकवण उत्तमानी लोकात प्रसृत केली होती. आणि असंतुष्ट प्रजेमध्ये अशा शिकवणीचा प्रसार जोराने झाला. डोईपट्टी, घरपट्टी ( तातमेडा ) याची माफी मिळावी म्हणूनच ह्या चळवळीस बहुजनसमाजाचा पाठिंबा मिळाला.

कारण, हेच कर विशेषतः प्रजाजनाना जाचत. याचे प्रत्यंतर ब्रह्मदेशीय कायदेकौन्सिलमध्ये, ह्या करावर झालेल्या चर्चेत आढळून येईल. तातमेडा किंवा डोईपट्टी हे कर अजिबाद रद्द करावे, म्हणून ठराव देखील कायदेकौन्सिलात आले होते. मार्च १९२५ ते सप्टेंबर १९२६ पर्यंतच्या कायदेकौन्सिलात आठ वेळा असल्या अन्याय्य कराविषयी चर्चा प्रत्यक्ष ठराव निघून झाली; आणि केवळ सरकारी पोळी खाणारानीच टाळी दिली म्हणून ते नामंजूर झाले! सरकारपक्ष अथवा त्यांच्या कंपूतील लोक तटस्थ असते, तर

है ठराव केव्हाच मजूर झाले असते. परतु लोकमत दर्शविणारे हे सरकारी बगलबच्चे नेहमी लोकमताविरुद्ध वागतात, हा अनुभव आमच्याप्रमाणेच ब्रह्मी लोकानाही येऊन चुकला.

लोकमत नोकरशाहीविरुद्ध कसे बनत चालले होते, याचे दुसरे एक प्रत्यतर म्हणजे सप्टेंबर १९२५ मध्ये लोकपक्षीयानी कौन्सिलात राजबद्यांच्या मुक्ततेसबधी आणलेला ठराव होय. नवीन ॲटी-बॉयकॉट कायद्यान्वयेही काही देशभक्त तुरुगात पडले होतेच. त्या सर्वांना मुक्त करावे, अशा आशयाचा ठराव चर्चेला निघाला, तेव्हा सरकारतर्फे, एकदर ३६ जणच डाबले गेले असल्याचे सांगण्यात आले. पण तेवढ्यानाही सोडण्याइतके थोर अतःकरण सरकारचे नव्हते. राजबद्याच्या मुक्ततेची मागणी ब्रह्मी लोक मधूनमधून करतातच. कारण जुन्या राजवटीत कोठल्याही मोठ्या समारंभाचे वेळी कैद्याची सुटका होत असे, हा शिरस्ता त्याना ठाऊक होता. पण, नोकरशाहीची वहिवाट अगदी वेगळी असते, हे समजण्यास त्याना बराच काळ लागला. हल्लीच्या बडात सुद्धा बडखोरानी व लोकानीही राजबद्याच्या मुक्ततेची मागणी केली आहेच प्रचलित बडाळीस राजकीय स्वरूप आहे की नाही, याचा जबाब दोन्ही प्रकारे दिला जातो. पण सरकारविरुद्ध प्रत्येक लढ्यास, तसे म्हटले तर, राजकीय स्वरूप देता येईल. प्रचलित राजसत्तेने लादलेले जुलमी व अन्यायी कर आम्हास जाचनात असे सागण्यासाठी व ते काढून टाका असे बजावण्याकरिता हे बड झालेले आहे, हे उघड दिसते. परतु आर्थिक बाबीतूनच त्याचा विकास पुढे राजकीय प्रश्नात झाला असून, हिंदी द्वेषाचाही वास त्याला येत आहे व त्याची कारणे वेगळी आहेत. ब्रह्मदेशविभागणीच्या बाबतीत त्याचा विचार होईल. लोकाच्या काय आकांक्षा आहेत, राजाविषयी त्याना काय वाटते आणि आजपर्यंत त्यांच्या मनात कसकशी स्थित्यतरे होत गेली याचा हा बेळपावेतो विचार झाल्यानतर पुढील लेखांत सामाजिक कारणामुळेच या असतोषाला जोर कसा आला ते पाहू.

---

## अध्याय चवथा

# सामाजिक

ब्रह्मदेश हा आमचाच आहे, अशी कित्येक हिंदी जनाची समजूत दृढ झालेली दिसते. ‘ ब्रह्म ’ हे नाव अगदी संस्कृत वाटते. जगाच्या आरंभीच नाभिकमलापासून उत्पन्न झालेल्या चतुर्मुख वेदाभ्यासजड पुराणपुरुषाचा व ब्रह्मदेशाचा निकटचा संबंध असावा, निदान ब्राह्मणाचा तरी तेथे विशेष पगडा असेल, अशा काहीशा अंधुक कल्पना ब्रह्मदेशाचे नाव घेताच हिंदी सुशिक्षिताच्या मनात येतात. आणि ब्रह्मदेशाविषयी एक प्रकारचा आपलेपणा वाटतो. शिवाय, रत्नागिरीत जन्मलेल्या भरतभूमीमधील अनभिषिक्त सम्राटाला काही काळ ‘ काळे पाणी ’ उपभोगण्यास ब्रह्मदेशातील पूर्वीच्या राजाच्या राजधानीस—मंडालेस—पाठविण्यात आले होते. तसेच मंडालेच्या सुवर्णमुकुटधारी थीबा राजासही त्याच राजसत्तेने अनभिषिक्त राजाच्या जन्मभूमीत—रत्नागिरीस—हवा खाण्यास कोंडून ठेवले होते. हा योगायोग निर्हेतुक असला, तरी त्यामुळे ब्रह्मी प्रदेशाविषयी आत्मीयभाव आमच्या जनतेत उत्पन्न झाला आहे.

परंतु असा बादरायण संबंध जोडला किंवा ब्रह्मी लढायाचा सर्व खर्च हिंदी कर भरणारानीच दिला असे म्हटले, तरी ब्रह्मी लोक हिंदी जनतेच्या कितपत जवळ येऊ शकतील, ही शंकाच आहे. कारण, हिंदी प्रजा बहुतेक आर्यवंशीय तर ब्रह्मी हे मंगोलियन गटापैकी आहेत. हिंदी भाषा इंडो-इराणी शाखेतल्या, तर ब्रह्मी भाषा ‘तिबेटी-चिनी’ संघातील. ब्रह्मी लोकाचा सरास बौद्धधर्म हिंदुस्थानात फक्त नावानेच ठाऊक आहे म्हटले तर वस्तुस्थितीचा विपर्यास होणार नाही. ब्रह्मी लोकांचा पोषाख, त्याची राहणी, त्याचे आचार, त्यांच्या आकांक्षा, पाहिल्या तर हिंदी प्रजाजनांत व त्याच्यात सर्वत्र ‘ विरोधाचेच साम्य ’ आढळेल. सूक्ष्मदर्शक दुर्बीण घेऊन बसणारास ‘ शिव शिव हरे ’ व ‘हिप् हिप् हुरे ’ एक वाटतील. ‘ सुमार्कंडेय ’ म्हणून

'समरकद'चे पूर्वीचे नाव तो सागेल, किंवा भगदत्ताने वसविले म्हणून 'बगदाद' अशी व्युत्पत्ति देखील देता येईल.

परतु हे दुरान्वय खरे नव्हत. कदाहार म्हणजे आमच्या पुराणातील गाधारीचे माहेर, म्हणून 'तेथील अमीर मला करा' ही एखाद्या भाविक पण प्रगतिप्रिय पुराणिकाची आकाक्षा जितकी न्याय्य व रास्त असेल, तितक्याच योग्यतेचा सशोधकानी ब्रह्मदेशाचा व हिंदुस्थानचा जोडलेला सबध होईल. कारण आजमितीस दोन्ही देश एकछत्री अमलाखाली आहेत. ते केवळ चुकीने किंवा यदृच्छेनेच म्हणा. पजाब्यात व मद्राशात वेषाचे, भाषेचे किंवा सामाजिक चालीरीतीचे कसलेही साम्य नसताना त्याना एकछत्राखाली यावे लागले याचे कारण राजकीय आहे हे सर्वांना ठाऊक आहेच. तशीच गोष्ट ब्रह्मदेशाची नाही. तो प्रथमपासून अगदी विलग राहिला असून, अलीकडेच ते ईशान्य सरहद्दीवरील राष्ट्र असल्यामुळे, हिंदुस्थानच्या सुरक्षिततेसाठी व इग्लडच्या कल्याणाकरिता 'हिंदी साम्राज्या'चा तो एक घटक झाला आहे. असो.

प्रचलित बडाळी ही प्रजेतील असतोषामुळे फैलावली आहे, हे उघडच दिसते. कारण, बहुतेक बडाच्या बुडाशी बडखोराचा असतोष, कोडलेल्या वाफेप्रमाणे, बाहेर पडण्याची धडपड करीत असलेला ज्ञानचक्षूना दिसतो. सामाजिक चालीरीतीमुळे ब्रह्मदेशात असतोष माजण्यासारखी परिस्थिति होती. रोगाचे निदान करिताना अमुक एका कारणाने हा रोग त्या वेळी जडला, हे प्रत्यक्ष धन्वतरीलाही सागता येणे कठीण. अनेक वेळची मिळून झालेली अनेक कारणे एकवटली की, त्याची परिस्फुटता रोग्याच्या आजारीपणाने होते, तशीच गोष्ट बडाळीचीही असते. केवळ राजकीय कारणानीच हे बड सुरू झाले किंवा नुसत्या आर्थिक अडचणीमुळेच ब्रह्मी लोक वैतागले अथवा शुद्ध हिंदी द्वेषाचा समध त्याचे मानगुटीस बसला आहे, असे मुळीच म्हणतां येत नाही. अनेक बाजूनी विचार करावयाचा व ही परिस्थिति बडास अनुकूल होती की नव्हती, हे आपणच ठरवावयाचे अशी अभ्यासभूमिका आपली आहे, म्हणून ब्रह्मी समाजस्थितीत बडाळीस उत्तेजन देणाऱ्या कोणत्या बाबी असाव्या याचे सूक्ष्म निरीक्षण करावयाचे आहे.

ब्रह्मी समाजात जातिभेद नाही, वर्णभेदाचा सपर्क नाही, उच्चनीच हा भेदभाव ते मानीत नाहीत, त्यांच्यामध्ये 'सावकारी' अथवा 'सराफी' वृत्ति

मुळीच नसून, उलट सार्वजनिक कार्याकडे द्रव्य खर्च करण्याची हौस दाडगी असते. पोराबाळासाठीच सर्व इस्टेट राखून ठेवावी, ही कौटुंबिक भावना फारच थोड्याची! बहुतेक आपापली मिळकत धार्मिक अथवा इतर सार्वजनिक कार्याला देऊन टाकतात. समाजात 'बायकाचे बड' सर्वत्रच माजलेले दिसते. किरकोळ बाजारहाट सर्व ब्रह्मी स्त्रियाच्याच हाती आहे. विकणाऱ्या व विकत घेणाऱ्या अशा दोघीही स्त्रियाच असतात. ब्रह्मी स्त्रियाना निवडणुकीचे वेळी मतदानाचा हक्क आहे. त्याची मिळकत विवाहोत्तरही वेगळी राहू शकते. कायद्याने त्या स्वतंत्र आहेत. घटस्फोटाची परवानगी देखील त्याना आहे. सर्व चळवळीत पुरुषाच्या खाद्याला खादा लावून, समान हक्काने त्याना वावरता येते. त्याची राहणी—अगदी गरिबाची देखील—आपल्याकडील मध्यमवर्गाच्या जोडीची असते ....... . अशा प्रकारची ही समाजरचना ऐकून काही कवींना तर 'भूवरी स्वर्ग अवतरला' असे वाटेल आणि अलीकडील विचाराचा बदलता ओघ पाहिला तर, ब्रह्मदेशीय समाजरचनाही बहुतेकाना आवडेल. विशेषतः स्त्रियाच्या हक्कात कायदेशीर सुधारणा व्हावी म्हणून खऱ्या कळकळीने प्रयत्न करणारास उत्कृष्ट उदाहरण असे हे दाखविता येईल.

परतु प्रत्येक व्यवस्थेत काहीना काही तरी दोष हे असावयाचेच. ब्रह्मदेशात कसलेच समाजनिर्बंध नसल्याने त्या देशाचा फायदा झाला असेल, तद्वतच तोट्याचाही थोडासा भाग त्याच्या वाट्यास आला असलाच पाहिजे. हिंदुस्थानापासून तो प्रदेश जवळ, तेथे सुबत्ता अधिक, परकीयास विरोध करण्याची वृत्ति ब्रह्मी जनतेची नाही, उलट परधर्मीयाशी मोकळेपणाने रोटीबेटीव्यवहार करण्याचीच त्याची पद्धत, यामुळे पुष्कळच हिंदी लोक तिकडे गेले. द्रव्यार्जनासाठी प्रवाहपतित म्हणून बहुतेक ब्रह्मदेशस्थ झाले असल्याने त्याचे सर्व लक्ष हिंदुस्थानकडेच गुतून राही. 'आपली नौकरी सपली की, आपण स्वदेशी जाणार,' अशी भावना सदैव ज्याच्या मनात आहे, ते परदेशांत, धर्मशाळेत रहाणाऱ्या उपऱ्याप्रमाणे राहिले तर त्यात दोघाचाही तोटाच आहे. जितके हिंदी पुरुष साल दरसाल ब्रह्मदेशात येतात तितक्याच—किंबहुना त्याच्या निमपट स्त्रिया जरी ब्रह्मदेशात आल्या असत्या, तर ब्रह्मी लोकांचा व हिंदी जनांचा विरोध इतका वाढला नसता. ब्रह्मदेशात एकदर

६,५३,९८० पुरुष व २,३३,०९७ स्त्रिया अशी हिंदी जनाची गणना आहे. आणि स्त्रिया बहुतेक शहरांतच रहाणाऱ्या आहेत. खुद्द रगूनमध्ये ह्यापैकी जवळ जवळ निम्मी मडळी राहते. रगूनमधील हर प्रकारची दुकाने व खाद्यागारे चालविणे, हमाली, ' बाबू ' काम ( कारकुनी, खर्डेघाशी ), वाहनाची वाहतूक इत्यादि सर्व कामे करण्यास हिंदी मनुष्यच लागतो. चपराशी अथवा भालदार हे हिंदीच असले पाहिजेत, असा नियम दिसतो! लष्कर तर बहुतेक सर्वच हिंदी ठेवले आहे. पोलिसाचे कामही हिंदी लोकाचेच. असा जिकडेतिकडे हिंदी मनुष्य चटकन् डोळ्यात भरतो. एक तर त्याचा वर्ण काळासावळा, याचा वेगळा व भाषा निराळी. ब्रह्मी जनता ही सर्वसाधारण गौरवर्णीयच म्हणता येईल, किवा ठराविक काव्यमय भाषेतील केनकीवर्ण म्हणून जो म्हणतात तो ब्रह्मी स्त्रीपुरुषाचा आणि आम्हा हिंदी जनाचा पडला ' गोदूम ' वर्ण. हे दोन्ही रग एकमेकाच्या तुलनेत एकदम उठून दिसतात. शेतावर काम करणारे काही मजूर हिंदी व भाडवल पुरविणारे चेट्टी देखील हिंदीच. म्हणून कोठेही गेल्याबरोबर हिंदी मनुष्य दृष्टीस पडतो. आणि ' हा येथे कशाला ? ' असा प्रश्न ज्याच्या तोंडचा घास निघाला किवा ज्याची लूट बद पडण्याचा सभव, अशाच्या तोंडी नेहमी साहजिकच ऐकू येतो! विशेषतः ब्रह्मदेश म्हणजे गोऱ्यासाठी राखीव कुरण असावे असे ज्या गोऱ्या बाळाना वाटते, त्याना हिंदी लोकाची ब्रह्मदेशातील ही वाढ भयप्रद वाटली, म्हणूनच त्यानी ' हिंदी लोक ब्रह्मदेशात वाढू लागले ' अशी ओरड चालविली. 'Europeans first raised the cry that the Indian is rapidly replacing the Burman' अशी कबुली खुद्द सरकारचीच आहे. युरोपियनाच्या डोळ्यात हिंदी लोकाची वाढ का सलली व त्यानीच प्रथम ही ओरड का केली, हें आता आफ्रिकेच्या उदाहरणावरून स्पष्ट असता वेगळे सागण्याची आवश्यकता उरते कोठे? यांत भर टाकली गव्हर्नरानी. रगून युनिव्हर्सिटीतील विद्यार्थ्याना उद्देशून भाषण करण्याचे निमित्त काढून त्यानी ब्रह्मी प्रजाजनाना ' मथरेचा मत्र ' दिला. " पहा हो, हिंदी व चिनी राष्ट्राचे दोन्ही बाजूनी आक्रमण होत असता ब्रह्मदेशीय सस्कृति किंवा राष्ट्रीय बाणा शुद्ध कसा राहणार अशी मला भीति वाटते." यातील अतस्थ हेतु काय होता हे सांगावयास पाहिजे असें नाहीं.

परंतु, एकंदर लोकसंख्येंत हिंदी जनतेचे प्रमाण तर फारच थोडे दिसतें. शेकडा सात या प्रमाणात हिंदी जनता ब्रह्मी लोकात मिसळली आहे. म्हणजे ब्रह्मी तादळात हे खडेच समजावेत! आणि खरोखर खड्याप्रमाणेच ते तेथील लोकाना वाटतातही व त्याना उचलून टाकण्याचे प्रयत्नही चालू आहेत. पण हिंदी जनतेचा त्यात काही दोष आहे की नाही हे आपण पाहू. हिंदी जनतेत पंजाबी, शीख, मलबारी, मोपले, मद्रासी, गुजराथी, भाटिये, बोहरी वगैरे अनेकप्रांतीय अनेक जाती आल्या. त्यानी ब्रह्मदेशात जाऊन तेथील स्त्रियाशी लग्ने केली आणि सर्व संसार थाटून मुलेबाळे झाल्यावर भरपूर द्रव्य साचले, म्हणजे उतारवयात स्वदेशी घालविण्यास ते निघून येत. मात्र हिंदी वसाहतवाले ब्रह्मी बायकोस किंवा तिच्यापासून झालेल्या अपत्यास घेऊन जात नसत. त्याना ब्रह्मदेशातच रहावे लागे. पुनर्विवाहाची सबब ब्रह्मी समाजात असली किंवा 'दासीपुत्रा'सारखा वेगळा अपमानास्पद वर्ग अशा संततीसाठी नसला, तरी एकंदर समाजाला अशी मुलं व अशा माता त्रासदायकच होतात. मुसलमानाच्या बाबतीत मात्र मिश्र दांपत्यापासून झालेला एक वेगळाच वर्ग निर्माण केलेला दिसतो. ब्रह्मी माता व मुसलमान पिता अशा मिश्र जोडप्यापासून झालेल्या संततीस 'जेरबादी' म्हणतात आणि त्याची वस्ती देखील वेगळी मानण्याचा प्रघात आहे. खानेसुमारीच्या पत्रकात जेरबाद्याना स्वतंत्र स्थान देण्यात येते. यावरून त्याची संख्या अजमावता येईल.

एवढ्यावरच ही अनर्थपरंपरा थांबली नाही. हिंदी मजूर, चपराशी, पट्टेवाले किंवा असेच हलकी कामे करणारे लोक फारच कंजुषीने राहत. फुटाण्याची फक्की किंवा चुरमुऱ्याची मूठ त्याच्या आहाराला पुरत असे. रहाण्यासाठीही त्याना विशेष सुखसोईंनी जागा लागत नसे. वस्त्राच्या बाबतींत तर त्याच्यासारखा काटकसरी म्हणजे आफ्रिकेतील वल्कलधारी झुलूच म्हटला पाहिजे. अशा अल्पसंतुष्ट लोकासारखे राहता येणे ब्रह्मी प्रजेला शक्य नाही. त्याची रेशमी लुंगी व इंजी (ही ब्रह्मी वस्त्रे होत. लुंगी कमरेस गुंडाळून नेसतात व इंजी अंगात घालतात) ही सहसा सुटावयाची नाहीत. ब्रह्मी वनिताचे केशभूषा रचण्याचे व त्यात मोहक फुले घालून मिरविण्याचें 'व्यसन' कमी व्हावयाचे नाही, किंवा रोज शेवया खाण्याची किंवा मोठमोठे चिरूट ओढण्याची रीत बदलावयाची नाही. अशा जवळ जवळ विरोधी आवडी-



ब्रम्ही घराचा नमुना “जल—महाल”

निवडीची व भिन्न राहणीची माणसे सर्कशीतील रिंगमास्तरच्या शिकवणी-मुळे काही काळ एकत्र आली, तरी त्याचेमध्ये तीव्र भेद माजणार हे उघड आहे आणि तसा तो माजलाही.

अल्पसंतुष्ट स्वभावामुळे हिंदी कामगार थोड्या मजुरीवर पोट भरतात, पण तितक्या मजुरीत ब्रह्मी माणसाचा बरखर्चेही निघत नाही. हिंदी मजु-रास बरखर्चच नसतो असे म्हणता येईल. अशा परस्परस्पर्धेमुळे एकत्र राह-णाऱ्या समाजात वैमनस्य का व कितपत माजते, हे सहज कळण्यासारखे आहे. रंगूनमधील रिक्षावाल्याची मजुरी ही त्या विधानास पुष्टि देणारी एक गोष्ट आहे. आणि दुसरी गोष्ट म्हणजे चपराशाचे काम करणारे 'दर्वान' त्याच कचेरीतील ब्रह्मी कारकुनास व्याजाने कर्ज देतात ही होय. दर्वानाचा पगार १५–२०–२५ असाच काही तरी असावयाचा. तो पन्नास असें धरून चालले, तरी ७५–८० रुपये मिळविणारास कर्जाऊ रकमा देण्या-इतकी शिल्लक दर्वानाजवळ राहते. याचा अर्थ असा होतो की, त्याच्या गरजा अगदीच थोड्या आहेत. अशा प्रकारे स्वत.च्या पोटाला चिमटा घेऊन किंवा खाण्याचे प्रमाण हलके व थोडे ठेवून हिंदी कामगारानी ब्रह्मी मजुराच्या पोटावर पाय आणिला अशी कोणाची समजूत झाली तर ती चुकीची म्हणता येईल काय? असो.

ब्रह्मी समाजात फुंजीचे वजन किती असते याचा उल्लेख मागील लेखात केलाच आहे धर्मगुरूना देवभोळ्या समाजात मान मिळतो, यात आश्चर्य नाही. पण स्वर्गपाताळाच्या किंवा निर्वाणाच्या गोष्टी बोलण्याऐवजी धर्मोप-देशक प्रापंचिक व्यवहाराविषयी उपदेश करतात, तेव्हा जनतेचे नेतृत्व त्याचे-कडे हक्काने येते. राजकीय चळवळीत पडणारे हे बुद्धभिक्षु पाहिले म्हणजे बदलत्या कालौघाप्रमाणे आपले कर्तव्य ओळखून समाजातील उणीव भरून काढल्याबद्दल त्याचे कौतुक करावेसे वाटते. ह्याच वेळी आपणाकडील हल्ली स्वकर्तव्यपराङ्मुखतेमुळे स्थानभ्रष्ट झालेल्या 'सर्वश्रेष्ठ' अशा एका वर्गाचे स्मरण होते. बुद्धभिक्षु अगदी नवमताचे पुरस्कर्ते असणे शक्य नाही. त्याच्यात पुराणमताचा अभिमान असणारच. पण त्यानी थोडीशी तरी सुधारणा एकदर सामाजिक, धार्मिक व राजकीय परिस्थितीशी जुळते घेण्या-साठी केली ही कमी महत्त्वाची बाब नव्हे.

बुद्धभिक्षूचा व त्याच्या गुरुप्रसादाचा पगडा ब्रह्मी जनतेवर विशेष असल्याने, मंत्रतंत्रादि सिद्धीवरही त्याचा विश्वास—दृढ विश्वास—आहे. मंतरलेला ताईत दिला तर त्याला पिस्तुलाचीही गोळी लागणार नाही, असा स्वानुभवी सिद्धांत ते मानतात. असला ताईत वापरणारास बंदुकीपासून मरण येऊ शकत नाही किंवा अमुक एक विशिष्ट आकृति अगर मंत्र शरीराच्या ठराविक भागावर गोंदून घेतल्यासहि 'मृत्युंजय' होता येते, अशी ब्रह्मी जनतेची पक्की खात्री आहे. ताइताचे व गोंदण्याचे हे वेड इतके कमालीचे पसरलेले दिसते की, त्याला धार्मिक (वेडगळ) समजुती ह्यापेक्षा दुसरे नावच देता येत नाही. पंतोजींनी मारलेली छडी लागू नये, किंवा 'छम् छम्'चा उपयोग करण्याचा प्रसंगच येऊ नये, म्हणून गावठी शाळांतील विद्यार्थी देखील विवक्षित प्रकारे गोंदून घेतात. रंगूनमध्ये राहणाऱ्या एका सुशिक्षिताने मला आपल्या 'मृत्युंजय' ताइताचा प्रभाव पुढे लिहिल्याप्रमाणे सांगितला, तेव्हा तर खरोखर आश्चर्यच वाटले.

काही नास्तिकांना एका साधूने ताईत दिला, आणि तो वापरला असता कोठेही गेल्यास बंदुकीची गोळी लागणार नाही, अशी त्याची ख्याति सांगितली. पण त्यांतील सर्वजण पडले पक्के नास्तिक! मंत्रदात्या बुवाची फजिती करण्यासाठी त्यांनी त्या ताइतावर गोळी चालवून पाहिली. त्यांच्याजवळ पिस्तुल असे. प्रत्येकाने पाच पाच गोळ्या झाडल्या तरी एकही त्या ताइताला लागली नाही व हा चमत्कार पाहून सर्वच नास्तिक गडे, ताईत, दोरे, नवस इत्यादिकांवर विश्वास ठेवू लागले म्हणे!

शहरगावच्या शिक्षितांची ही अवस्था, मग खेडवळांची गोष्ट विचारतांच कशाला? इंग्रजांसारख्या बलिष्ठ शत्रूशी लढाई द्यावयाची, तेव्हा तयारीही जय्यतच पाहिजे. म्हणून बंडखोरांनी खरोखरच गमतीचा उपाय काढला. विशिष्ट प्रकारे गोंदून घेतलेला इसम सहा महिने तरी बंदुकीच्या गोळीने मरणार नाही, अशी त्यांची समजूत आहे. म्हणून सरकारविरुद्ध लढण्यासाठी जो जो जवान तयार होतो, त्याला तशा प्रकारे गोंदून घ्यावे लागते. एक प्रकारचे ते संरक्षक कवचच म्हणता येईल, आणि म्हणून गोंदून घेत असतानाच किती तरी लोकांना ब्रिटिश अधिकाऱ्यांनी पकडून 'बंडखोर' म्हणून डांबून ठेविले आहे. ज्याला आपण गुन्हे म्हणतो, ते

करण्याची प्रवृत्ति ब्रह्मी जनतेत विशेष दिसते, असे मागे आकड्यांनी सिद्ध केलेंच आहे. त्याला देखील ब्रह्मी समाजरचना काही अंशानी कारणीभूत असावी. आर्थिक अडचणीमुळे मनुष्याला गुन्हा करण्याची अनावर इच्छा होते, नाही असे नाही. पण गुन्हेगाराच्या धाडसाचीच तारीफ करणारे पुष्कळ लोक सापडतात. त्याच्या दुष्कृत्याकडे कोणी फारसे लक्ष देत नाही. शिवाय जवानीत असलेल्या मर्दांना कसला तरी पराक्रम गाजवावा असे वाटतेच. ब्रह्मी खेडेगावातील प्रमुख पुंड एकत्र जमतात व दरोडे घालून आपल्या योवनी धाडसाचे प्रदर्शन करण्यासाठी जवळपासच्या खेड्यातून आपणास कोणी सहकारी मिळतात की काय याची चौकशी करतात. तेव्हा सहजच शूर व साहसी युवक त्या टोळीला मिळतात व दग्याधोप्यास सुरवात होते. 'शांतिः शांतिः' म्हणून कितीही जप केला तरी मनुष्यमात्राला हाणामारी, ठोकाठोकी किंवा तसल्याच गोष्टी मधून मधून पाहिजे अशा वाटतातच. ब्रह्मी प्रजेची ही उसळी, जीवितातील कंटाळा घालविण्याचाच एक प्रकार असावा.

ब्रह्मदेशात राहणाराचा असा अनुभव आहे की, कोणत्याही ठिकाणापासून एका दिवसाच्या वाटेवर 'चेट्टी' असतो. चेट्टी हे पेढीवाले म्हणजे डबोले बाळगून असावयाचे. ब्रह्मी लोक हे चेट्टीच्या मानाने उधळ्या वृत्तीचे असणार. तेव्हा सर्वच गावकऱ्यांचा डोळा चेट्टीने साठविलेल्या धनसंचयावर असला तर नवल नाही. सर्वत्र ब्रह्मदेशात लाकडी घरे असतात, तर चेट्टी कधीही तसल्या खोपटात राहणार नाहीत. त्यांना चांगले मजबूत, पुंजी सुरक्षित राखणारे विटांचे तरी घर हवे. या सर्व कारणामुळे द्रव्य लुबाडण्याचा मोह ब्रह्मी जवानांना होतो. आणि त्याचा प्रयोग चेट्टी किंवा तसल्याच लोकांवर व्हावयाचा.

एवंच, बडाळीत चालू आहे अशा प्रकारची मारामारी किंवा पराक्रमाची पराकाष्ठा ब्रह्मदेशीयांना मौजेचीच वाटते. तीत घाबरून जाण्यासारखे काही नसून, मर्दांनी गाण्याचे ते एक कृत्य आहे, अशी त्यांची समजूत असते. मात्र ज्यांना अशा पराक्रमापासून ताप पोहोचतो किंवा ज्यांना त्याची झळ लागते, तेवढेच लोक, क्रौर्य, अमानुषता, रक्तपात, चोरटा हल्ला अशा शब्दांनी आपला तिरस्कार व्यक्त करितात, हेही स्वाभाविकच आहे. पण हे सर्व असंतोषाचे फल होय, यात तिलप्राय संदेह नाही.

आतापर्यंत बडाळीची कारणमीमांसा आर्थिक, राजकीय व सामाजिक दृष्ट्या कशी लावता येते ते पाहिले. यापुढे ब्रह्मदेशविभागणीच्या प्रश्नाचा ऊहापोह करावयाचा आहे. कारण हे दोन्ही विषय एकमेकात गुरफटलेलेच आहेत. यात पुष्कळच बाबींचा उल्लेख करावयाचा राहिला आहे. पण विभागणीची चर्चा होईल, तेव्हाच त्याचा निर्देश करता येईल. इकडे बडाळीस तर दिवसेदिवस रग चढत आहे, रोज बडखोराची सरशी झालेली ऐकू येते. त्या बातम्यातील मर्म कळण्यास ही चर्चा उपयोगी पडेल.

---

अध्याय पांचवा

## युरोपियनांचें मत

ब्रह्मी बडाळीची कारणमीमासा राजकीय, सामाजिक आणि आर्थिक दृष्टीनी थोडक्यात केल्यानतर, आता ब्रह्मदेशविभागणीस एकदम हात घालण्याचे प्रयोजन असे की, हे दोन्ही प्रश्न एकमेकाशी सबद्ध आहेत. विशेषतः बडाळी माजवून ब्रह्मदेश वेगळा करून घेण्याचा घाट घालणारे धूर्त बगळे टपून बसलेले असल्यामुळे या प्रश्नाकडे अधिक बारकाईने पाहिले पाहिजे. म्हणून बडाळीच्या कारणमीमासेची फलश्रुति सागण्यापूर्वीच विभागणीचे हे आख्यान सुरू केले आहे. हे सपले म्हणजे मग ‘सकीर्ण समालोचन’ करू.

स्वयनिर्णयाचे तत्त्व एकदा मान्य केले म्हणजे मग ब्रह्मदेशच काय, पण इतर कोणत्याही देशाने स्वातत्र्य मागण्यात गैर असे काहीच नाही. पण नुसत्या एवढ्या एकाच दृष्टीने ह्या प्रश्नाचा विचार करावयाचा नाही. ब्रह्मदेश स्वतत्र झाला किवा इग्रजाचे ताब्यात राहिला, तर त्यामुळे इतर कोणत्याही राष्ट्रावर कसले परिणाम होणार, हे पाहून त्याचे महत्त्व ठरविले पाहिजे.

ब्रह्मदेशातआज तीन पक्षाचे हितसबध गुतले आहेत. एक स्वतः ब्रह्मदेशचा. दुसरा आपल्या हिंदुस्थानचा. कारण, हिंदुस्थानापासून विलग होण्याची

ब्रह्मदेशाची खटपट चालू आहे–किंवा ब्रह्मदेशाच्या नावाखाली 'शिकविता धनी' तसली खटपट चालवीत असेल!–तिसरा पक्ष म्हणजे आमचे साम्राज्य-सरकार–ब्रिटिश सरकार. हिंदुस्थानचा व ब्रह्मदेशचा संबंध हा कसा आला, हे बहुतेकास ठाऊक आहेच. माणसाळलेल्या हत्तीने रानटी हत्तींना फुसलावून आणून 'पिहितमुख' खळग्यात पाडावे, तशापैकीच प्रकार ब्रह्मदेश 'कार्बीज' करण्यात झाला आहे. हिंदी तिजोरीतील द्रव्य खर्च झाले किंवा हिंदी शिपायांचे रक्त सांडले म्हणूनच ब्रह्मदेश हिंदुस्थानास जोडला गेला, असे मात्र मानण्याचे कारण नाही. राज्यकर्त्यांची त्यात सोय होती. ब्रह्मदेशासारख्या समृद्ध शेजाऱ्यावर परक्याची सत्ता असणे म्हणजे संपन्न जामदारखान्यावर चोराला नजर ठेवण्यास सवड देण्याप्रमाणेच होणार. म्हणून अज्ञान हिंदुस्थानच्या कृपाळू पालनकर्त्यांनी खबरदारी घेतली व ब्रह्मदेश परक्याच्या हाती लागू दिला नाही. याखेरीज खनिज तेल, चांदी, कथील, जस्त, वुल्फ्रॅम ( टङ्स्टन* ), वैडूर्यमाणिकादि रत्ने, सागवानी उत्तम प्रकारचे लाकूड, रबर आणि 'रगून' तांदूळ इतका कच्चा माल वैपुल्याने मिळण्याचे ठिकाण, वनिये इंग्रज आपल्या हातातून जाऊ देणार नाहीत. आपल्या राज्य-शकटास रुळलेले लोक मिळावे म्हणून हिंदुस्थानातील बाबूंची भरती तिकडे झाली. आणि 'बाबू पिछे कूली' देखील गेले.

ब्रह्मदेशविभागणी म्हणजे ब्रह्मी, हिंदी व ब्रिटिश प्रजाजनांतील तिरंगी लढा होय, हे आता स्पष्ट कळले आहे. प्रत्येकाचे म्हणणे काय व ते समर्थनीय कसे, हे बारकाईने पाहिले म्हणजे ही चर्चा पुरी होईल. म्हणून प्रथमतः माबाप सरकारचे म्हणणे काय हे ऐकून घेतले पाहिजे. कारण अग्रपूजेचा मान त्याचाच आहे. शिवाय त्याचे धोरण फार दूरवरचे असणार व त्यात बऱ्याच लहानमोठ्या राष्ट्रांचे हितसंबंध गुंतलेले असावयाचे. म्हणून प्रथमतः ब्रिटिशाचे म्हणणे ऐकून घेऊ.

खनिज तेल, चांदी, कथील, शिसे, जस्त, लोखंड, वुल्फ्रॅम, लाल ( रत्न ), पाचू इतकी भूगर्भातील संपत्ति ब्रह्मदेशांत आहे.

ही खनिज द्रव्ये खणून परदेशी नेणाऱ्या कंपन्या सर्व इंग्लंडमध्ये स्थापन झालेल्या असावयाच्या, किंवा काही स्कॉटलंडमध्ये असल्या म्हणून काय

* टङ्स्टनचा उपयोग विद्युद्दीपात होतो.

फरक होणार? ही लूट करण्यास खाणींचे एकदर ३८० परवाने १९२८ साली सरकारने दिले होते. खाणीतील मजुराना नऊ नऊ, दहा दहा तास काम देतात ( आणि मजुरीचा मक्ता बहुतेक हिंदी जनतेला दिलेलाच आहे), किंवा त्याना पोटभर मजुरीही मिळणे कठीण होते, बायकाना खाणीत कमी मजुरीवर कामाला लावतात, इत्यादि माणुसकीच्या तक्रारी करण्याचे हे स्थळ नसून, एकदर लूट किती झाली आहे, इतकेच पहावयाचे आहे.

घासलेट, पेट्रोल व त्याचे इतर भाऊबंद मिळून ब्रह्मदेशातील खाणीतून दरसाल सुमारे पञ्चवीस कोट गॅलन तेल तयार होते त्याची किंमत सव्वा पाच कोटि रुपयापर्यंत जाते! चांदीची पैदासमुद्धा फार नाही! फक्त सुमारे ५७५० मण ( बंगाली ) इतकी म्हणजे ७५ लक्ष रुपयाची अंदाजे झाली. शिवाय एका वर्षात ( १९२९–३० )

| | |
|---|---|
| शिसे ( प्रत १ ली ) | ७७,१४३ टन |
| ,, ( ,, २ री ) | ६४,१२२ ,, |
| जस्त | ६४,१२२ टन |
| तांबे | १०,९७८ ,, |
| लोखंड | ७४,८१३ ,, |
| लाल ( माणिक ) | –३२,००० कॅरट |
| पाचूचे दगड | –४,५०० ,, |

अशी एकदर खनिज संपत्ति निघाली. तिची किंमत एकत्र करता येत नसली, तरी अंदाज बांधता येतो. जंगलातून लाकूडफाटा ( इमारती व जळाऊ ) असा दरसाल पुष्कळच निघतो त्याचे दरसाल वार्षिक उत्पन्न काही कमी नाही. १९२३-२७ सालची सरासरी पाहिली तर प्रत्येक वर्षी १ कोटि ९६ लक्ष रुपये, लाकडाचे नुसते परवाने देऊन सरकारने मिळविले असे दिसते.

ब्रह्मदेशचा भाताचा व्यापार दांडगा असल्याचे सर्वास ठाऊक आहेच. येथून परदेशात ( हिंदुस्थान वगळून ) एकदर सुमारे एकवीस कोटि रुपयाचा तांदूळ एका वर्षात जातो! हा प्रत्यक्ष दिसणारा निर्गत व्यापार झाला. याखेरीज आयात व्यापार आहे तो वेगळाच. स्वदेशी व बहिष्कार असल्या शस्त्राचा आपणाकडे जितका उपयोग करतात, तितका ब्रह्मदेशात करीत

नाहीत. म्हणून परकी माल तिकडे फारच बोकाळलेला दिसतो. हा सर्व व्यापार चालविणाऱ्या मोठमोठ्या पाचसहाच पण सर्व विलायती कपन्या असून विलायती पेढ्या (बँका) व इतर मडळ्या आहेतच. त्याच्या मार्फत चाललेल्या लुटीचा अदाज एका तज्ज्ञाने असा केला आहे की, दरसाल सुमारे पधरा ते वीस कोटि रुपये वाहतुकीच्या व इतर विलायती कपन्या निव्वळ नफा म्हणून मिळवितात!

ब्रह्मी सरकारी नोकरीत युरोपियनाचीच अधिक पगारावर वर्णी लावण्याच्या नाना युक्त्या चालू आहेत. युरोपियन वसाहतीसाठी सर्व दृष्टींनी सोईस्कर असा दुसरा कोठलाच प्रदेश हिंदी साम्राज्यात नाही, म्हणून अॅग्लो-इडियन बगलबच्चे सारखी ओरड करीत आहेत. त्याचा हेतु काय असावा, हे न सागताच समजण्यासारखे आहे. त्याच्या व्यापाराचा व प्रपचाचा ब्रह्मदेशातील हा पसारा लक्षात घेतला, म्हणजे 'ब्रह्मदेश विभक्त करा' ह्या ओरडीच्या सुरात गोऱ्याचा गळाही का ऐकू येतो, याचे रहस्य थोडेसे ध्यानात येईल. सर्व खाणी व जगल याचा फायदा गोऱ्या व्यापाऱ्यानीच लुटावा, अशी इच्छा राज्यकर्त्यांची. हिंदुस्थानातले शहाणे झालेले प्रजाजन आणि तेथील लोकसभाना मिळणारे सवलतींचे हक्क, आपणास ही लुटालुट मुळीच पचू देणार नाहीत, ही भीति या भाडवलवाल्याना साहजिकच वाटते. आणि म्हणून 'ब्रह्मदेश वेगळा करा,' अशा ओरडीत गोऱ्या कपन्यानी व ब्रिटिश अधिकाऱ्यानीही आपला सूर मिळविला. अशा कपन्या ब्रह्मदेशातील खनिज तेल व इतर धातु वगैरे बाहेर काढीत आहेत. तेव्हा ब्रिटिश व्यापाराच सरक्षण करण्याच्या निमित्ताने ब्रिटिश सरकारला 'आपला हात जगन्नाथ' वृत्ति अनुसरण्यास पाहिजे असाच अर्थ यातून निघत नाही काय?

परतु याहीपेक्षा दूरदृष्टीचे कारण वेगळेच आहे. सिगापूर येथे नाविक केंद्र केले असून, जागतिक आरमारी वर्चस्वाची चढाओढ आता हिंदी महासागरातच चालणार आहे. म्हणून सिगापूरला आतरराष्ट्रीय राजकारणात विशेष वर्चस्व मिळत आहे. याचा दुसऱ्या शब्दात अर्थ असा की, भावी युद्धात सिगापूरहूनच बहुतेक आरमारी हालचाली होतील. मग आरमारासाठी नाविक ज्वलन (अॅडमिरल्टी फ्युएल) ब्रह्मदेशातून आयतेच हक्काने

व सवलतीने मिळेल. लढवय्याचा पुरवठा तेथूनच करावा लागेल. रसद तुटण्याची भीति उद्भवू देतां कामा नये. खुद्द ब्रह्मदेशात नेहमीच पुष्कळ सेना जय्यत ठेवावी लागेल आणि हे सर्व साधण्यास सर्व दृष्टींनी ब्रह्मदेश कसा सोईचा आहे हे आता वेगळे सागण्यास नकोच. हिदुस्थानच्या देवडीचे रक्षण करण्याच्या मिषाने मागून गडबड करण्याऱ्या चीनला लाथेखाली तुडविता येईल, सयाममध्ये कांही हालचाल दिसली किंवा फ्रेंच इडो-चायनात फ्रेंचानी कारस्थान रचले, जपानने उचल खाल्ली, डच लोकानी डोळे मोठे करून हिदुस्थानकडे पाहिले, अशा कोणत्याही शक्य वा अशक्य गोष्टीचा बदोबस्त करण्यासाठी ब्रह्मदेशावर अनियंत्रित सत्ता असावयास पाहिजे, अशा प्रकारचीच विचारसरणी साम्राज्यवाद्यांनी लढविली आहे.

शिवाय रशियातील समाजसत्तावाद सर्वत्र जोराने फैलावत असता चीनमधून तो ब्रह्मदेशात व ब्रह्मदेशातून पुढे हिदुस्थानात आल्याविना कसा राहील? ही एक दहशत राज्यकर्त्यांच्या पोटात वागतच आहे. त्यामुळे ही लाट वाटेतच थोपवून धरण्याचा प्रयत्न करण्याकरिता, वायव्य सरहद्दीवर हिंदी सरकारचा कडक बदोबस्त आहे, तसा ब्रह्मदेशातही ठेवता यावा, असे साम्राज्य-सरकारास वाटते. सयामच्या सरहद्दीवर सयामी सरकारने पुष्कळच विमाने जमविली, म्हणून नेहमी सरकारी रिपोर्टात लिहिलेले असते, त्याचा बदोबस्त करता यावा म्हणून साम्राज्य-सरकारचे जे जे 'आकाशाधिपति' हिदुस्थानात येतात, ते ते सर्व ब्रह्मदेशात जाऊन सयामकडील सरहद्दीची 'पाहणी' करून येतातच. ती कारणे कोणतीही असोत. ब्रह्मदेश राजकीय प्रगतीच्या आकांक्षी 'चादोबा'च्या नादाला न लागता 'वेडगळ अज्ञाना'-प्रमाणे सदैव आपल्याच पालकत्वाखाली रहावा अशी इच्छा इग्रजाची आहे हे खरे.

ब्रह्मी सरकारचे या बाबतीतले मत पाहिले, म्हणजे इग्रजाचे किती हितसबध ब्रह्मदेशात गुतले आहेत, हे सहजच कळून येईल. ब्रह्मदेश हिदुस्थानापासून वेगळा करावा, असे विधान करून त्यांनी म्हटले आहे की:—" किनाऱ्यालगतच्या वाहतुकीचे बिल तर चर्चेसाठी लोकापुढे आहेच. कल्पनाशक्तीला कितीही ताण दिला तरी त्यायोगे ब्रह्मदेशचा काडीइतकाही फायदा होईल असें वाटत नाही. उलट अशाने वाहतुकीचे दर चढतील

आणि त्यामुळे ब्रह्मी व्यापाराची कुचंबणा होणार." कुचंबणा कोणाची होणार आणि इतका प्रेमाचा उमाळा सरकारला का आला, हे स्पष्टच आहे. ह्या बिलाचा निर्देश सरकारने वारवार केलेला पाहून मात्र असे वाटते की, दर्यावर्दी वाहतुकीपासूनच गोऱ्या व्यापाऱ्याना ब्रह्मदेशांत बरीच किफायत असली पाहिजे. आणि ती गोष्ट खरीच आहे. इरावती फ्लोटिला कंपनी इरावती नदींत एकसारख्या बोटी फिरवीत असते, व खनिज तेलाची ने-आण करण्याचा मक्ता तिलाच आहे. तेल काढणारी एक व नेणारी दुसरी, अशा दोन्ही कंपन्या संगनमत करून भयंकर नफा लुटीत आहेत. तो इतिहास प्रस्तुत नाही. ब्रह्मी सरकारने आणखीही असे गृहीत धरले आहे की, "ब्रह्मदेश विभक्त झाल्यास ब्रह्मदेश जिंकण्यासाठी हिंदी तिजोरीतून जो खर्च झाला आहे, तो वसूल केला जाणार नाही." हिंदुस्थानने इंग्लंडपासून वेगळें होण्याची भाषा तोंडातून काढली की, ब्रिटिशाचे या बाबतींत काय उद्गार असतात, आणि त्या दृष्टीने ब्रह्मदेशाच्या विभागणीविषयी त्यांचे काय मत आहे, हे सूक्ष्म दृष्टीने पाहिल्यास विभागणीचे खरे मर्म उघड होईल.

आणखीही एका कोपऱ्यांतून मतलबी कावा सहजासहजी बाहेर पडतो. ब्रह्मदेशाला सोईस्कर अशी राज्यव्यवस्था कशी असावी, हे स्वानुभवाने मिळालेल्या ज्ञानावरून सर चार्लस इन्नेस व त्यांचे हस्तक यांनी सुचविलें आहे. त्यात मुख्य चार गोष्टींवर सरकारचे लक्ष अधिक असले पाहिजे, असे त्यांनी बजाविले आहे:—

( १ ) ब्रह्मदेशात सर्वत्र शांतता, सुरक्षितता व स्वस्थता नांदण्याची व्यवस्था करणे.

( २ ) ब्रह्मदेशाचे 'आर्थिक स्थैर्य' राखणे.

( ३ ) कार्यक्षम अशा नोकरशाहीची नेमणूक करणे.

( ४ ) औद्योगिक किंवा व्यापारी क्षेत्रात धर्म, जात, कुळी याचा भेदभाव मानला जाणार नाही अशी तरतूद करणे व तशा प्रकारचे निर्बंध घालण्यास सरकारने सवड न ठेवणे.

सरकारच्या या चार कलमी बखरीत सर्व 'ब्रह्मांड' साठविले आहे असे म्हटले तरी चालेल. ब्रह्मदेश वेगळा झाल्यावर हिंदी चेट्टी तेथे फार वेळ राहणार नाहीत; आणि मग त्यांचे काम 'डॉसन' बँकेला आयतेच पहावयास मिळेल.

दरसाल भातशेतीसाठी सुमारे २५ लक्ष रुपये एकटी डॉसन बँक कर्जाऊ देते. आर्थिक स्थैर्य व देशातील शांतता ही परकी व्यापाऱ्याच्या लुटीस सवलत मिळावी म्हणूनच आहे, हे उघड आहे. कार्यक्षम नोकरशाही म्हणजे महागऱ्या पगारावर गोऱ्या लोकाची वर्णी, आणि शेवटचे कलम कशासाठी आहे हे स्पष्टच दिसतें. श्री. हाजी याच्या बिलाला इतका विरोध झाला, यातच त्याचे महत्त्व आहे. याच चार मुद्यावर सरकारी खलित्यात वारवार जोर पुनः पुन दिलेला आढळतो. त्यावरून ब्रिटिशाचे हितसबध त्यात किती गुतले आहेत हे कळून येईल. आणि मग ब्रिटिश अधिकारी, गोरे व्यापारी व अँग्लो-इडियन पत्रकार याना ब्रह्मदेश वेगळा का पाहिजे ते समजेल.

---

अध्याय सहावा

## हिंदी लोकांची गाऱ्हाणीं

ब्रह्मदेशविभागणीस हिंदी जनतेचा विरोध आहे. हिंदुस्थानापासून ब्रह्मदेश विलग होऊं नये, असे हिंदी लोकाना वाटते. पण हे हिंदी लोक म्हणजे कोणाचे प्रतिनिधी किंवा अखिल राष्ट्राचे मत तेच त्याचे मत कशावरून? हे प्रश्न उपस्थित केल्यावर हिंदी ‘ लोकमत ’ काय किमतीचे आहे तें कळतें. वास्तविक ब्रह्मदेशात जाऊन व्यापारधदा करणारासच हिंदुस्थानाशी ब्रह्मदेश सदैव जोडलेला असावा, असे वाटते. ब्रह्मदेशात ज्याचे भाडवल गुतले आहे किंवा तेथील उदीम व्यवहारावरच ज्याचे पोट अवलबून आहे अशाची इच्छा ब्रह्मदेश हिंदुस्थानापासून वेगळा फुटून निघू नये अशीच असणार. कारण एकदा तो देश ‘ स्वतत्र ’ झाला म्हणजे तेथील हिंदी व्यापाऱ्यांस काय काय हालअपेष्टा सोसाव्या लागतात याची कल्पना प्रत्यक्ष अनुभवाने बऱ्याच जणाना लगेच येते. आफ्रिका, कानडा व अगदी जवळचा व ताजा मेसापोटेमिया येथील अनुभव कटु असल्याने ब्रह्मदेशाने हिंदुस्थानशींच

निगडित रहावे असा त्याचा आग्रह आहे. अर्थात् जोपर्यंत विचारास पटणारे एखादे कारण हिंदी जनता पुढे करीत नाही, तोपर्यंत अशा विरोधास साम्राज्यवादाचाच वास मारीत राहील. इग्लडला हिंदुस्थान हातचे जावें असे वाटत नाही याचे जे कारण तेच ब्रह्मदेशविभागणीच्या बाबतींत हिंदी व्यापारी पुढे करू लागले तर त्याना 'साम्राज्य नसलेले साम्राज्यवादी' म्हणावे लागेल. पण ह्या प्रश्नाकडे पाहण्याची एवढी एकच दृष्टि नाही. ज्या कारणानी ब्रह्मदेशविभागणीस विरोध करता येतो ती वेगळी आहेत व त्याचा अगदी शेवटी विचार करू. प्रथमतः हिंदी व्यापाऱ्याचे म्हणणे काय ते पाहू.

'आम्ही आलो नसतो तर ब्रह्मदेश अरण्यमयच राहिला असता. भाताची लागवड इतकी मुळीच झाली नसती. व्यापाराला व शेतीला भाडवल देखील मिळाले नसते. इतकी मजुरी किंवा मेहनत करणारी माणसे ब्रह्मदेशात नाहीतच मुळी.' अशा प्रकारची प्रौढीची भाषा हिंदी व्यापारी नेहमी बोलतात. त्यात तथ्यही आहे आणि सत्यापलापही पण आहे. 'हिंदी भाडवालवाले चेट्टी व राबणारे तैलगणी मजूर ब्रह्मदेशात आले नसते तर ब्रह्मदेशचा व्यापार आजमितीस इतका वाढला नसता,' असे सर्टिफिकेट वेगवेगळाल्या गव्हर्नराकडून त्याना मिळालेले असले तरी एकमेकाना दिवे ओवाळण्यापेक्षा त्याला अधिक महत्त्व नाही. 'कारण हिंदी व्यापारी ब्रह्मदेशात (किंवा इग्रज व्यापारी हिंदुस्थानात) गेले ते केवळ परोपकारार्थच,' असे म्हणण्याइतका निलाजरेपणा कोणी करणार नाही. उलट ते केवळ स्वार्थासाठीच गेले ही गोष्ट खरी असली तरी शिष्टाचारानुरूप तिला गोंडस स्वरूप देण्यात येते. आधुनिक पिढीत विचारौघ इतका स्पष्ट व 'नग्न' होत चालला आहे की, 'जन्मदात्यानीही आपणावर कसलाच उपकार केला नाही,' असे म्हणण्यापर्यंत त्याची मजल जाते! तेव्हा असल्या काळात उपकार, नि:स्वार्थबुद्धि, ब्रह्मी लोकाचे हित, वगैरे गोड शब्दावर विश्वास ठेवणार कोण? इग्रजाच्या बाबतीत आपण जे दोष काढीत आहोत, तेच ब्रह्मदेशच्या बाबतीत आपले व्यापारी व चेट्टी करीत आहेत. क्रिया एकच असता ती करणारे लोक वेगळे असले म्हणून तिचा दोष कमी कसा होईल? ब्रह्मदेशात आपणास पुष्कळ मजुरी मिळेल म्हणून मजूर तिकडे धावले आणि आपल्या जवळच्या खेळत्या भाडवलास

तिकडे व्याज बरे येईल म्हणून चेट्टी पळत सुटले, ही गोष्ट काही खोटी नाही. मग आज आम्ही इतके भांडवल—सुमारे ७५ कोटि रुपये—तुमचेकडे गुतविले आहे ते परत द्या, असे म्हणणे वेडेपणाचे आहे. अगोदर त्याच्या दसपट नव्हे, शतपट रक्कम व्याजाचे रूपाने ब्रह्मी प्रजेला पिळून नेत आहां ती परत द्या, असे उलट ब्रह्मी प्रजेने म्हटले तर कसे होईल? आजपर्यंत गुतविलेल्या रकमेची किती पट मद्रास इलाख्यात परत नेली आहे? ते द्रव्य कोठून आले? इत्यादि प्रश्न या ठिकाणी उपस्थित करण्याचे कारण असे की, त्याच मुद्द्यावर पुढेमागे आपणास ब्रिटिश राज्यकर्त्यांशी भांडावयाचे आहे. शिवाय हे भांडवल जे ब्रह्मदेशात 'पेरले' ते ब्रह्मी लोकाच्या समतीने की काय, हा तर मुख्यच प्रश्न निघेल! अस्तु.

हिंदी प्रजेचे दुसरे म्हणणे असे की 'आम्ही ब्रह्मदेश जिकला.' ह्यात तर मुळीच तथ्य नाही. ब्रह्मी युद्धासाठी पैसा व मनुष्यबळ हिंदुस्थानने पुरविले असले तरी ते वेगळ्या परिस्थितीत व वेगळ्या कारणामुळे. हिंदुस्थानला त्या वेळी सरकारच्या विरुद्ध जाता येणे शक्य नव्हते, आताही शक्य नाहीं. पण अशा जबरदस्तीच्या वागणुकीत सद्गुण आढळल्याबद्दल शाबासकी कसली द्यावयाची? आणि खरे बोलावयाचे तर विनाकारण एका स्वतंत्र राष्ट्राचे सौभाग्य हिरावून घेण्यात सहकार्य केल्याबद्दल हिंदुस्थान आतरराष्ट्रीय स्वातंत्र्य-न्याय-मदिरात दोषीच ठरेल. चोरीचा गुन्हा प्रत्यक्ष न करता त्यास मदत केली, एवढ्याचसाठी जर चोराच्या साथीदारास शिक्षा मिळते, तर राष्ट्राच्या बाबतीतही तोच न्याय का लागू नसावा? आम्हा हिंदी जनतेच्या हातून अज्ञानामुळे व अविचारीपणामुळे काय काय घोर अपराध घडले आहेत ते, व आपणाकडे परकी कोणत्या दृष्टीने पहातात तेही, आमच्या ध्यानात यावे म्हणून थोडी अतर्मुख दृष्टि करून पाहिले पाहिजे. हिंदी आपले बाधव म्हणून त्यानी केलेले सर्वच समर्थनीय ठरविले पाहिजे, अशी 'सिव्हिल-सर्व्हंटी' वृत्ति सध्या नको आहे. म्हणून अत्यत स्पष्टपणे व निर्भीडपणे आपल्या हिंदी बांधवाच्या हातून घडलेल्या कृत्यांची छाननी केली आहे. ती किंचित् कटु वाटल्यास त्याबद्दल दोष कृष्णकृत्याचा आहे. ती उघडी करणाराचा किंवा त्याचा अर्थ स्पष्टपणे मांडणाराचा नाही. हिंदी बांधवाविषयी सहानुभूति नाहीं असा त्याचा अर्थ करू नये.

'ब्रह्मदेश वेगळा झाल्यावर तुमचा व्यापार बुडेल' ही भीति अनाठायीच आहे. ब्रह्मदेशात पैदा होणारी सर्व चांदी आणि सगळे खनिज तेल एकटा हिंदुस्थान घेत आहे. लाकूड, तांदूळ ह्या मालाविषयी तर बोलावयासच नको. साधारणपणे दर वर्षी ५० कोटि रुपयाचा माल ब्रह्मदेशातून हिंदुस्थानात येतो. 'ब्रह्मदेशाच्या वीसपट लोकवस्तीचे हे बडे गिऱ्हाईक ब्रह्मी मालाला आयते मिळत असता, ब्रह्मदेश वेगळा करून ते घालविण्याचा मूर्खपणा करू नका,' असा उपदेश काही हिंदी व्यापारी करतात. पण त्यातही पुन: त्याच्या 'स्व'ला धक्का लागतो, ह्या भीतीचीच छटा प्रामुख्याने दिसते. कारण असे की, हिंदुस्थानात जो ब्रह्मी माल खपतो, तो केवळ 'आपल्याच राज्यातल्या' ब्रह्मी लोकानी केला, म्हणून नव्हे. तर हिंदी प्रजेला त्याची गरज आहे, अन्यत्र तो स्वस्त मिळत नाही म्हणूनच हिंदुस्थानी प्रजा ब्रह्मदेशातील माल खरेदी करते. ब्रह्मदेशाचे बाबतीतही असेच आहे. ह्या मालास असलेले दुसरे गिऱ्हाईक सोडून देशप्रेमाखातरच हिंदुस्थानला ब्रह्मी व्यापारी माल विकीत आहेत असे मुळीच नव्हे. हा व्यापारी सौदा आहे. तो दोघानाही पटल्यावर मालाची खरेदीविक्री होतेच. व्यापारात तरी कोणी कोणावर उपकार करीत नाही. तेव्हा 'ब्रह्मदेशचा व्यापार बुडेल' किंवा 'हिंदुस्थानातील माल ब्रह्मदेशास यापुढे मिळणार नाही' अशा समजुती शुद्ध वेडगळ होत. सूर्यावर रुसण्यापैकीच तो एक प्रकार मानला जाईल. एक मात्र शक्यता संभवते खरी. ब्रह्मदेशातून येणाऱ्या मालावर, हिंदी सरकार, ब्रह्मदेश वेगळा झाल्यावर, जकात बसवू शकेल किंवा निर्यातीवरही निर्बंध लादले जातील. परंतु हाही प्रश्न परस्पराच्या सोईचा आहे कारण दरसाल सुमारे १५।१६ कोटीचा माल हिंदुस्थानातून ब्रह्मदेशी जातोच. तेव्हा एकमेकाला जसे सोईचे दिसेल तशा आयातनिर्यातीवर जकाती बसविल्या जातील. त्याची मोठीशी अडचण नाही. तीच बाब मजुरांची, शिकलेल्या बाबूंची किंवा चेट्टींची आहे. त्याना पाहिजे असल्यास हिंदुस्थानापासून वेगळा झालेल्या ब्रह्मदेशात रहावे. वेगळे हक्क, महागडा पगार किंवा इतर सवलती किंवा भांडवल सुरक्षित ठेवण्याचे आश्वासन स्वतंत्र हिंदुस्थानचे बाबतीत गोरे व्यापारी व सोकावलेले सिव्हिल सर्व्हंट्स् मागतात तसे त्यानी मागण्याचे कारणच उरत नाही.

हिंदी जनतेची ही विचारसरणी सर्वस्वी चुकीची अशी आहे. कारण इंग्रज हिंदुस्थानविषयी ज्या आकांक्षा बाळगून आहेत, त्याच आमचे व्यापारी व इतर ब्रह्मदेशस्थ लोक ब्रह्मदेशाविषयी बाळगतात. दोघांचीही एकच चूक आणि ती म्हणजे 'आम्ही ब्रह्मदेशाच्या ( हिंदुस्थानच्या ) हितार्थ पुष्कळ राबलो' या शब्दांचा प्रयोग होय. अगदी स्वतःच्या फायद्यासाठी देशत्याग करून हे दोन्ही समाज त्या त्या देशात आले असता 'केवळ जगाच्या कल्याणा' आपण देह कष्टवीत आहोत ही त्यांची समजूत झालेली दिसते. कदाचित् हे जाणूनबुजून पांघरलेले वेडही असावे. पण ह्या बाबतीत हिंदी राष्ट्रीय सभेने दर्शविलेली अनास्था अगदी अक्षम्य आहे. राष्ट्रीय सभा म्हणजे राष्ट्रातील सर्व महत्त्वाच्या बाबतीत लक्ष घालणारी एकच एक अशी राजकीय संस्था असता, आजपर्यंत तिने ब्रह्मदेशाकडे ढुंकूनही पाहिले नाही! महात्मा गांधी एकदा तिकडे गेले होते. पण थैल्या गोळा करणें किंवा अनत्याचारी अहिंसेचा व चरख्याचा उपदेश करणें यापलीकडे त्यांचे राजकारण जाऊच शकले नाही. हिंदी लोकांनी तिकडे काय केले किंवा त्यांचे ब्रह्मी जनतेशी संबंध समाधानकारक आहेत किंवा नाहीत इत्यादि आवश्यक गोष्टींकडे लक्ष देण्यास कॉंग्रेसला फुरसत नव्हती. परंतु याच्यापेक्षा अधिक खेदाची गोष्ट म्हणजे हिंदी राष्ट्रीय सभेत ब्रह्मदेशचे प्रतिनिधी भरपूर आहेत अशी प्रतारणा आजपर्यंत चालू दिली, ही होय! कराचीचीच गोष्ट पहा. तेथे ब्रह्मदेशचे म्हणून सुमारे ११७ प्रतिनिधी आले होते, असे अधिकृत पत्रकात नमूद आहे. पैकी फार फार तर वरचे फक्त १७ इसम—किंबहुना शेवटचे सातच—ब्रह्मदेशातील असतील. बाकीचे शंभराहून अधिक प्रतिनिधी इतर प्रांतांतलेच होते. ज्यांना इतर कोणत्याही प्रांतातून निवडून जाता आले नाही त्यांनी ब्रह्मदेशाला 'दत्तक देश' मानून त्याचे प्रतिनिधी म्हणून उघड्या बैठकीत किंवा विषयनियामक मंडळीत खुशाल उजळ माथ्याने फिरावें ही लबाडी सत्याचे प्रयोग करीत असणारांचे पुढे चालत आली! ब्रह्मदेशचे खरे प्रतिनिधी तेथे न आल्याने त्या प्रांताच्या हिताहिताची चर्चाच होऊ शकली नाही. आणि म्हणून आज एकदम अशा थराला गोष्टी आल्या असताही कॉंग्रेस त्या बाबतीत काही धोरण ठरवीत नाही, किंवा कॉंग्रेसला ठरविता येत नाही. कॉंग्रेसची चूक केवढीही असो,

ती घडली खरी व तिचे घोर परिणाम आज सर्वांस भोगावे लागत आहेत. हिंदी लोकांनी ब्रह्मदेशात बेसुमार गर्दी केली व तत्रस्थाच्या तोंडचा घास काढून घेण्याचा प्रयत्न कळत न कळत त्यांचे हातून झाला, या अश्लाघ्य वर्तनाचे प्रायश्चित्त भोगलेच पाहिजे. ब्रह्मी लोकांत प्रसृत असलेल्या बुद्ध-धर्माची शिकवण 'अक्रोधेन जयेत् क्रोधम्' अशी असली तरी पोटाची आग इतकी तीव्र आहे की, सर्व धर्म बाजूला राहून त्यांना वाटेत येणारावर हल्ला करावासा वाटतो आणि असा हल्ला झाला म्हणजे हिंदी जनतेला वैषम्य वाटते. 'ब्रह्मदेशात परकी प्रजा म्हणजे हिंदी, चिनी व युरोपियन अशी असतां फक्त हिंदी लोकांबद्दलचाच विद्वेष इतक्या तीव्रतेने कां करतां?' असा प्रश्न कांही हिंदी पुढारी ब्रह्मी प्रजाजनांना टाकतात. परंतु चिनी प्रजाजनांची संख्या थोडी आहे आणि त्यांच्या चालीरीति, रीतीरिवाज व धार्मिक सम-जुतींत ब्रह्मी जनांशी बरेंच साम्य आहे. म्हणून चिनी लोकांचा इतका द्वेष झालेला दिसत नाहीं. युरोपियन हे बोलूनचालून सत्ताधारी. त्यांचा कितीही तिरस्कार वाटला तरी केवळ दंडधारी म्हणून गरजवंताप्रमाणे त्यांच्या पुढे डोके हे लवविलेंच पाहिजे. हिंदी मात्र गचाळ खरे. त्यांना त्यांच्या घरीं देखील मान नाहीं. जेथे तेथे साहेबाच्या मागे जाऊन यांनी स्वतंत्र राष्ट्राचे सौभाग्य हिरावून घेण्यास मदत तेवढी केली आहे! अशामुळे हिंदी द्वेष वाढतो आणि ब्रह्मी लोकांबद्दल गैरसमज पसरतो. पण ब्रह्मी जनांचा यांत काय दोष?

हिंदी प्रजाजनांना ब्रह्मदेशाने वेगळे होऊं नये असे वाटते ते केवळ स्वार्थामुळेच. ब्रह्मदेशाशी व्यापारसंबंध असलेल्यांचेच मत या बाबतींत ग्राह्य ठरणार हे उघड आहे. पण केवळ स्वतःच्या हितासाठी दुसऱ्या कोणत्याही राष्ट्राच्या स्वयंनिर्णयावर गदा आणण्याचे काम हिंदुस्थाना-सारख्या परतंत्र देशाला तर मुळींच करतां यावयाचे नाहीं. कारण त्यायोगे खुद्द हिंदुस्थानच आपला स्वयंनिर्णयावरील हक्क सोडून देण्यास तयार आहे, असा तर्क निघेल. तेव्हां हिंदी जनांच्या स्वार्थी विचारसरणींत पुष्कळ महत्त्वाचे दोष असल्यामुळे ती त्याज्य ठरते. आतां पुढे स्वतः ब्रह्मदेशस्थांचे या बाबतींतले विचार पाहूं.

## अध्याय सातवा

# ब्रह्मी जनतेचें म्हणणें

इंग्रजी व्यापाऱ्यांना ब्रह्मदेश स्वतंत्र करण्याचा कळवळा का आहे, हें आता वाचकास समजलेच असेल. हिंदी लोकाचा हितसबंध ब्रह्मदेशविभागणीत कितपत आहे आणि त्यातही आखूड दृष्टीचीच विचारसरणी कशी आहे, हे आपण पाहिले. आता खुद्द ब्रह्मी प्रजाजनाचेच या बाबतीत काय म्हणणे आहे ते विचारात घेणे जरूर आहे. कारण आजकालचे दिवस स्वयनिर्णयाचे असून त्याच तत्त्वावर आपण स्वातंत्र्यासाठी लढत आहोत. तेव्हा तो हक्क ब्रह्मी प्रजेस दिलाच पाहिजे.

ब्रह्मदेशातील बहुतेक पुढारी विभागणीस अनुकूल आहेत असे म्हणण्यात अतिशयोक्ति नाही. त्यातील काही लोक विभागणीस प्रतिकूल आहेत, असे आपण ऐकतो खरें, पण ते सुद्धा, 'सध्या ब्रह्मदेश हिंदुस्थानाशी फटकून राहिला तर त्याची राजकीय प्रगति होणार नाही, म्हणूनच तूर्त विभागणी नको' असे म्हणतात दोन्हीहो पक्ष विभागणीवादीच आहेत. एकाला ब्रह्मदेश ताबडतोब अलग व्हावयास हवा, तर दुसऱ्याची धूर्त दृष्टि 'विभागणी आजच नको' असे म्हणत आहे. त्याची कारणे अनेक आहेत. विभागणीवादी उघड उघड सवाल असा टाकतात की, 'हिंदुस्थानच्या हाताला हात लावून काळ कठण्यात ब्रह्मदेशाचा काय फायदा आहे?' या प्रश्नाला समाधानकारक उत्तर देता येत नाही. पण काही तरी जबाब देण्याचा प्रयत्न केल्यास हिंदी व्यापाऱ्याच्या तोंडून खालीलप्रमाणे ठराविक साच्याची उत्तरें ऐकू येतील.

'ब्रह्मदेशाचे सरक्षण करण्याची जबाबदारी ब्रह्मी लोकाना अद्याप घेता येत नाही. हिंदी सैन्याची त्याना नेहमीच जरूरी असणार. ते वेगळे झाल्यावर त्याचा व्यापार अगदीच बुडेल. त्याचा तांदूळ आम्ही मुळीच घेणार नाही. किंवा त्याना लागणाऱ्या वस्तु देखील देणार नाही.' वगैरे वगैरे.



श्वे डगोन पॅगोडा–सुवर्णमय कळस.

ह्या घमेंडीचा पोकळपणा स्पष्ट करून सांगण्याची आवश्यकता नाही. इंग्रजाना 'हिंदुस्थान सोडून जा' म्हणून म्हटले किंवा 'हिंदुस्थानला स्वतंत्र करा' म्हणून म्हटले म्हणजे त्याचेही अशाच प्रकारचे उद्गार असतात ना? त्याना आपण जी किंमत देऊ तीच ब्रह्मदेशातील हिंदी जनांच्या वरील आशयाच्या तक्रारीस दिली पाहिजे, हे उघड आहे.

परंतु ब्रह्मी पुढारी काही काही मुद्दे मांडतात ते महत्त्वाचे असून ते खोडून काढणे सोपे नाही. उदाहरणार्थ, आपण एक गोष्ट घेऊ. आज ब्रह्मदेशातून दरसाल अंदाजे साडेआठ कोटि रुपये मध्यवर्ति सरकारला कर म्हणून दिले जातात. इन्कमटॅक्स ( उत्पन्नावरील कर ), आयात जकात, मिठावरील कर वगैरे मध्यवर्ती सरकारच्याच मालकीचे असून प्रांतिक सरकार फक्त हे कर गोळा करण्याचे काम करते. तरी असे मिळविलेले हे आठ साडेआठ कोटि रुपये पर्यायाने प्रजेच्याच खिशातून गेले आहेत आणि हिंदुस्थानच्या मानाने ब्रह्मदेशाची प्रजा पुष्कळच कमी आहे. आकड्याचे प्रमाण घेऊन ही विषमता अधिक स्पष्टपणे मांडता येते. हिंदुस्थानची लोकसंख्या ब्रह्मदेशाच्या एकोणीस पट असून मध्यवर्ती सरकारला मिळणाऱ्या एकंदर करापैकी सुमारे २१ पै ( पावणेदोन आणे ) ब्रह्मदेशातील लोक देतात. लोकसंख्येच्या मानाने ब्रह्मदेशाचा हिस्सा फार फार तर १०¼ (दहा पूर्णांक एक चतुर्थांश ) पै असावयास पाहिजे होता. तेव्हा हे साडेआठ कोटि रुपये ब्रह्मी प्रजा हिंदी सरकारला देते, त्यापैकी सुमारे निम्मे म्हणजे सव्वाचार कोटि रुपये विनाकारण दिल्यासारखे होत नाहीत काय? कारण ब्रह्मदेशाने कराचा बोजा इतर हिंदुस्थानचे मानाने अधिक का सोसावा? आणि हे सर्व रुपये ब्रह्मदेशाच्या हिताखातर खर्च होत नसून हिंदी सरकारचा महागरा दिवाळखोरी खर्च भरून काढण्याकडेच त्याचा विनियोग होतो. करांचा बोजा अधिक सोसूनही विशेष फायदा होत नसेल तर मग ब्रह्मदेश वेगळा करून कराचे ओझे कमी का करू नये? असा प्रश्न ब्रह्मी पुढारी—विभागणीपक्षाचे—टाकतात.

ह्या प्रश्नाला समाधानकारक उत्तर नाही खरे. कारण अधिक कर दिल्याबद्दल योग्य मोबदला मिळत नाही, याबद्दल वाद असणेच शक्य नाही. आणखीही दुसरा एक प्रश्न विभागणीवाले उपस्थित करतात तो असा—हिंदी लेजिस्लेटिव्ह असेंब्लीत ब्रह्मदेशाचे फक्त पाचच सभासद असतात. एकंदर १४३

सभासदामध्ये पाच हे प्रमाण, ब्रह्मदेशच्या उत्पन्नाचे मानाने अगदीच थोडें आहे. पाचापैकी एक सरकारने नेमलेला, एक गोऱ्या व्यापाऱ्याचा प्रतिनिधि, असे दोन वजा करता 'खरेखुरे निवडलेले' असे तीनच प्रतिनिधी ब्रह्मदेशच्या वाटणीस येतात. त्याना दर वर्षी रगून ते दिल्ली-सिमला येथील यात्रा करण्याचा त्रास किती होत असेल हा प्रश्न बाजूला ठेवला तरी लेजिस्लेटिव्ह असेम्ब्लीतील बहुतेक ( ब्रह्मी दृष्टीने ) निरर्थक अशा विषयावर चालणाऱ्या चर्चेस हजर राहून मत द्यावे लागते. कित्येक कायदे तर ब्रह्मी जनतेस लागू करण्याचा प्रसग येण्याचा सभव नसताही केवळ हिंदुस्थानबरोबर गाठ पडली म्हणूनच तसले 'अजागळ' कायदे ब्रह्मी सरकारच्या कायद्याच्या ढिगात पडतात. शारदा कायदाच पहा ना? तो ब्रह्मदेशात उपयोगात आणण्याचा प्रसग कधी यावयाचा नाही, अशी समाजस्थिति तेथे आहे. परतु हिंदुस्थानशीं 'लग्न' लावल्यामुळे ब्रह्मी सरकारासही तो मान्य म्हणून दप्तरी दाखल करणे भाग पडले. तसेच वायव्य सरहद्दीवर एवढा मोठा खर्च दरसाल होतो आणि असेम्ब्लीत त्याविषयी कडाक्याचा वादही माजतो. पण ब्रह्मदेशचा व त्या सरहद्दीचा सबध येतो तरी कसा? म्हणून हिंदुस्थानशीं निगडित राहून मिळणार काय? असा सवाल विभागणीवाले टाकतात.

राष्ट्रीय सभेत ब्रह्मदेशाचा समावेश असला तरी तेथे कसा गोधळ चालत असतो हे मागे एकदा दर्शविलेच आहे राष्ट्रीय सभेतच जर ब्रह्मी हिताहिताची चर्चा नीटपणे होत नाही, तर सरकारच्या लेजिस्लेटिव्ह असेम्ब्लीत तरी ती कशी व्हावी? असेम्ब्लीच्या दिवाणखान्यात साधारणपणे जितके ब्रह्मी सभासद उपस्थित असतात, त्याच प्रमाणांत जर कॉंग्रेसच्या मडपात ब्रह्मी प्रतिनिधींची गर्दी झाली असती तर कदाचित् ब्रह्मी प्रश्नास पुष्कळच चालना मिळाली असती. पण ते तसे होत नाही म्हणून तर ही ओरड!

ह्या दोन मुख्य प्रश्नांखेरीज इतरही पुष्कळ अशा बाबी आहेतच. त्यांची उत्तरे नीट देतां येत नसली तरी विभागणीचे भूत वेगळ्याच पण अत्यत महत्त्वाच्या कारणासाठी परतविले पाहिजे. ती कारणे सागण्यापूर्वी ब्रह्मदेशातील विभागणीवाल्या पक्षातील वेगवेगळ्या पुढाऱ्याचे म्हणणें ऐकून घेतलें पाहिजे. तूर्त 'विभागणी नको' म्हणणारा जो पक्ष आहे

त्यात यू मौंग मॉग जी, थारावाडी यू पे, यू सित् ल्हॅग, व यू क्वॉ म्यिन्, बॅरिस्टर, एम. एल. ए., हे चार प्रमुख नागरिक आणि पुष्कळसे ' फुजी ' सामील आहेत. यू मॉग मॉग जी म्हणजे कराचीस गेलेल्या ब्रह्मी मडळाचे पुढारी. त्यानी तर हिंदी फेडरेशनमध्ये ब्रह्मदेशाचा समावेश का व्हावयास पाहिजे आणि ब्रह्मदेश वेगळा केल्याने तोटे काय होतील, हें जाहीर करण्यासाठी एक खास पत्रकच तयार केले आहे. फेडरल स्ट्रक्चर कमिटीवर ब्रह्मी पुढारी कोणी ना कोणी तरी असावे, अशी त्याची आग्रहाची मागणी आहे. बाकीच्यानी विभागणीस विरोध केला तो अशासाठी की, आज विभागणीनतर ब्रह्मदेशाला कोणती राजपद्धति मिळणार, याचा निश्चित निर्णय विलायतकर ' फिरगी ' अजून काही देत नाही. दोनचार तारा करून विचारले, तरी मॅक्डोनल्डकडून जबाब येत नाही. तेव्हा हिंदुस्थानची ' गट्टी ' फू केली म्हणजे हिंदुस्थानला मिळणारे स्वराज्यही ब्रह्मदेशास मिळावयाचे नाही. हिंदुस्थानच्या हातास हात लावल्याने जर राजकीय हक्क आपणास मिळतात तर विनाकारण विलग होण्याची भाषा आताच बोला कशाला? असा त्याचा धूर्त विचार आहे. मॉटेग्यू-चेम्सफर्ड सुधारणाचे वेळी ब्रह्मदेश वगळला होता, तशी अवस्था पुनः भोगण्याचा प्रसग येऊ नये म्हणून हिंदुस्थानच्या मागणीच्या सुरातच आपला सूर मिळविणे ब्रह्मी प्रजेच्या हिताचे आहे, असे या विभागणी-विरोधकाना वाटते व त्यात बरेच तथ्यही आहे. म्हणूनच ते विभागणीपक्षाला नावे ठेवतात. ब्रह्मदेशाला राज्यपद्धति कोणत्या पद्धतीची मिळणार हे समाधानकारक रीत्या अधिकारी वाणीने आश्वासन मिळाले व त्याप्रमाणे आचरण घडले म्हणजे ह्या पक्षाची विभागणीस हरकत नाही.

आता विभागणीवाला पक्ष घेऊ. त्यात यू बा पे, यू मॉग जी, एम. ए., बॅरिस्टर, मॉग ट्वे ही मडळी प्रमुख आहेत. यू बा पे हे ब्रह्मी प्रतिनिधि म्हणून मडलाकार मेजाभोवती बसण्यास लडनला गेले होते, हें सर्वांस ठाऊक आहेच. त्यांचे व त्यांच्या अनुयायाचे म्हणणे असे की, ब्रह्मदेश हिंदुस्थानपासून फुटून निघाल्याने त्याचे कोणतेंही नुकसान होणार नाही, तर उलट फायदाच होईल. म्हणून कसलाही वाद न करता तत्काळ हिंदुस्थानचा सबध तोडून टाकावा. M 1070

हिंदी जनतेच्या आक्रमणशील वृत्तीने ते घाबरले असावेत किंवा ब्रह्मी स्वातंत्र्यपिपासेने ते तृषाक्रांत झालेले असतील, इंग्रजी व्यापाऱ्यांचा विभक्ती-करणातला कावा न समजल्यामुळेही विभागणी लवकर करा असा त्यांचा आग्रह असेल, कोणतेही कारण असो, आज ते अत्यंत उतावळे झाले आहेत, हें मात्र खरे. हिंदुस्थानच्या मागे लागल्याने आपणास अधिक हक्क मिळतील किंवा आपण वेगळे झाल्याबरोबर आपला व्यापार बसेल, यावर त्यांचा मुळीच विश्वास नाही. इंग्रजी अधिकाऱ्यांना ब्रह्मी प्रजाजनाचे म्हणणे मान्य करावयास लावण्याची ताकद आपल्या अंगी आहे आणि तशी चळवळ आपणास चालविता येईल, इतका दृढ आत्मविश्वास त्यांना वाटतोच वाटतो. हिंदुस्थानापासून ब्रह्मदेशाला काहीच मिळवावयाचे नाही ही त्यांची पक्की खात्री आहे. म्हणून ते ' विभागणी लवकर करा ' असा मंत्र जपत बसले आहेत. त्यांची पत्रे ह्याच मुद्यावर एकसारखा भर देत असतात.

फेडरेशनबद्दल त्यांना विशेष आदर वाटत नाही, इतकेंच काय पण मॉग मॉग जी किंवा थारावडी यू पे अशासारख्यांना फेडरल स्ट्रक्चर कमिटी-वर जावयास मिळावे म्हणूनच हिंदी फेडरेशनमध्ये ब्रह्मदेशाचा समावेश व्हावा असे त्यांचे मत आहे, असा आरोप ब्रह्मदेश तूर्त हिंदुस्थानपासून अलग करू नये असे म्हणणारांवर करण्यासही विभागणीवाले कमी करीत नाहीत. ' विभाग-णीस आमचा विरोध आहे. ' असे एकमुखाने सरकारास कळविण्यासाठी जी एक प्रचंड सभा रंगून येथे भरली होती तीत हजर असलेले ब्रह्मी नाग-रिक व फुंजी पाहून मात्र हा आरोप पक्षभेदाच्या व पैशाच्या दूषित दृष्टीने पाहिल्यामुळे केला आहे असे वाटते. दोन अडीच हजारांवर प्रजाजन त्या सभेस हजर राहिले व ठिकठिकाणच्या नागरिकांनी एकत्रित जमून ऐकमत्याने ठराव पास केले. त्यांतील मुख्य असा होताः—

" ब्रह्मदेशाला संपूर्ण स्वायत्तता मिळाल्याविना हिंदुस्थानापासून तो वेगळा करू नये. "

हा ठराव मंजूर करण्यात ब्रह्मी जनतेने—अर्थातच विभागणीविरुद्ध पक्षाने—ब्रिटिशांचे कारस्थानी डावपेंच ओळखले, हे तर सिद्ध होतेच, पण शिवाय आपले सत्त्व कायम राखण्यासाठी घेतलेली खबरदारीही दृष्टोत्पत्तीस पडते. ब्रह्मदेशाला स्वायत्तता पाहिजे ही बाब विभागणीवाले व विरोधी अशा दोन्ही

पक्षांसही मान्य आहे यांत शकाच नाही. परतु एकाला वाटते की, आपण नुसती मागणी करण्याची खोटी की, स्वराज्य आपल्या हातात येऊन पडलेच असे समजा. इग्रज अधिकारी स्वराज्याचे दान देण्यासाठी आतूर होऊन बसले आहेत. परतु विभागणीविरुद्ध जो पक्ष आहे तो मात्र पक्का व्यवहारी दिसतो. ब्रिटिशाचे हातून स्वराज्य कधी सुटावयाचे नाही, एवढेच नव्हे, पण एकट्या ब्रह्मदेशाच्या ओरडीस इग्लड केव्हाच भीक घालणार नाही, हे त्याना कळून चुकले आहे. तेव्हा हिदुस्थानच्या स्वराज्य-मागणीच्या सुरात आपला सूर मिसळला तर बरेच काम होईल. हिदुस्थानच्या विस्ताराचा व स्वराज्याच्या लायकीचा फायदा ब्रह्मदेशाला मिळण्यासारखा आहे, तर तो का सोडावा? असा सरळ पण शहाणपणाचा मार्ग त्यांचा आहे. त्यापैकी एकमेकानी परस्पराना दोष ठेवावे यात नवल नाही, परंतु दोन्हीपैकी अधिक व्यवहार्य कोण आहे हे वाचकानीच ठरवावे.

विभागणीविरोधियाची सभा रगूनमध्ये भरली म्हणून वर म्हटलेच. तांत दुसराही एक महत्त्वाचा ठराव मजूर झाला. त्यामुळे मडलाकार परिषदेस गेलेल्या ब्रह्मी प्रातिनिधींचे खरे स्वरूप प्रकट झाले. ठरावात म्हटलें आहे की—

" गेल्या मडलाकार परिषदेस गेलेले ब्रह्मी प्रतिनिधी हे खरं लोकनियुक्त नव्हत, ते लोकपक्षीयाच्या इच्छेविरुद्ध मतप्रदर्शन करीत असल्याने परिषदेच्या पुढील अधिवेशनप्रसगी खऱ्या लोकपक्षीय प्रतिनिधीची निवडणूक व्हावी, असे या सभेचे मत आहे. "

मडलाकार परिषदेस यू बा पे हे गृहस्थ गेले होते व त्याचेबरोबरच ब्रह्मदेशाचे गव्हर्नर सर चार्लस इन्नेस हेही होते, हे लक्षात घेतले म्हणजे 'जी हुजूर' करणारेच तेथे ब्रह्मदेशाचे प्रतिनिधी निवडले असले पाहिजेत, हें उघड होते. यू बा पे हे ब्रह्मदेशाचे एक प्रतिष्ठित ब्रह्मी प्रातिनिधि म्हणून गेले होते आणि 'त्याचे मत तेच सर्व ब्रह्मदेशाचे' असें सागण्यात आले. हें सर्व ब्रह्मदेशातील बहुजन समाजाच्या मताविरुद्ध असल्याने आता त्यानी त्यास विरोध केला आहे.

ब्रह्मदेशियात अशी हीं मुख्य दोन प्रकारची मते आहेत. त्याचे या महत्त्वाच्या बाबीवर एकमत झाले असते तर असा गोंधळ उडाला नसता.

परंतु एक सरकार पक्ष व दुसरा लोकपक्ष अशा दोन विरोधी पक्षीयांच्या भिन्न मतांत बहुजनसमाजाचे म्हणणे सरकार ऐकते की नाही हे पहावयाचे आहे. कारण सरकारच्या हातात वर्तमानपत्रे व बातम्या पाठविणाऱ्या संस्था असल्याने विनाकारण सत्यापलाप करून आपली बाजू कमताकत असली तरी जगी गाजावाजा करून तीच मोठी, असे भासविण्याचा प्रयत्न सरकारचा चालू आहे. लोकपक्षीयांनी संघटित होऊन सरकारी प्रयत्नास प्रत्युत्तर देण्याची खटपट आरंभिली आहे, पण तिला यश येण्यास अवधि लागेल.

ही प्रमुख कारणे झाली. पण आणखीही काही कारणासाठी ब्रह्मदेश वेगळा व्हावा अशी ब्रह्मी प्रजेची इच्छा आहे. 'ब्रह्मदेशात खरे ब्रह्मी रक्त असें फारच क्वचित् आढळते,' ही तक्रार कित्येक परंपराभिमानी करतात. तीत भावनेचाच अंश अधिक असला तरी त्यांच्या म्हणण्यात तथ्य बरेच आहे. शुद्ध ब्रह्मी रक्ताचा प्रजानन सापडणे मुष्कील का झाले असावें, हे सामाजिक चर्चेत दर्शविले आहेच, आणि बहुजनसमाज अशिक्षित असल्याने त्यास हे कारण लवकर पटते. ब्रह्मी प्रजेच्या रक्तात भेसळ करणारांवर द्वेषाची नजर पडते ती अशा विचारांनीच! आधुनिक विचारसरणीच्या मंडळींस 'शुद्ध' रक्ताचे महत्त्व मुळींच वाटत नसले तरी अद्यापिही इंग्लंड-अमेरिकेंतही 'शुद्ध' रक्ताचा जाज्वल्य अभिमान बाळगणारे घरंदाज असतात, ही गोष्ट लक्षात घेतली म्हणजे ब्रह्मी अशिक्षित समाजात शुद्ध रक्ताची वाण तत्काळ का पटली असावी, हे समजेल. प्रजेवरील आर्थिक बंधने ढिली करण्याची आशा हिंदुस्थानपासून ब्रह्मदेश वेगळा झाल्याने वाढणार हे तर उघडच आहे. तातमेडा किंवा डोईपट्टी यासारखे अन्याय्य कर तर कमी करूच, परंतु हिंदी मध्यवर्ति सरकारला मेस्टन करारान्वये द्यावी लागणारी रक्कम व त्याचे वसूल करावे लागणारे कर आपणास वाचविता येतील आणि ते वाचले नाहीत तरी त्यांचा विनियोग ब्रह्मी प्रजेच्याच प्रत्यक्ष फायद्यासाठी करता येईल, ही त्यांची अपेक्षा आहे. सर्वांत महत्त्वाचे मनोराज्य म्हणजे हेंच की, स्वतंत्र ब्रह्मदेशात हिंदी माणसाचे प्राबल्य हल्ली आहे तितके रहाणार नाही व म्हणून ब्रह्मी प्रजेस गांजणारे पुष्कळ लोक निघून जातील. अर्थात् यात तथ्य कितपत आहे, हा प्रश्न अगदीच निराळा. पण अशा भावी सुखाच्या कल्पनाचित्रांनी प्रत्येक पक्षाचा आपापल्या बाजूस तेथील लोकमत बळविण्याचा

प्रयत्न चाललेला असतो. त्यात खरे म्हणणे कोणाचे व ते तसे का हे पाहण्या-पूर्वी विभागणीवाल्याचे खरेखुरे अत.करण जाणण्यासाठी काही महत्त्वाच्या मुलाखतींचा साराश अभ्यासिला पाहिजे.

---

## अध्याय आठवा

# मुलाखती

'ब्रह्मदेश तत्काळ स्वतत्र झाला पाहिजे, असे माझे ठाम मत आहे. त्यापासून ब्रह्मदेशाचा काडीइतकाही तोटा होणार नाही.' असे रगून-मधील 'ट्रुथ' (सत्य) नामक दैनिकाचे सपादक ठासून म्हणाले.

पहिल्या प्रथम अभिवादन होताच मी रगूनमध्ये कशासाठी आलो, हे त्यानी ताडले व लगेच आपले उपरिनिर्दिष्ट ठाम मत ठोकून दिले. त्याचे वजन दाडगे आहे. नुसते दैनिक चालवून ते स्वस्थ नाहीत, तर साप्ताहिकही त्याचे हाती आहे. गेल्या वेळी लेजिस्लेटिव्ह असेब्लीचे सभासदही ते होते. त्यांचे नाव मॉग ट्वे असे असून विभागणीपक्षातील एक पुढारी म्हणून मी त्यांस भेटावयास गेलो. त्यांनी आपले स्पष्ट मत प्रकट करताच 'कशाकरिता' हा सीधा प्रश्न मी त्याना केला. 'आम्हाला स्वातत्र्य हवे.' 'स्वयनिर्णय नको का?' 'विनाकारण हिदुस्थानात समाविष्ट होऊन काय फायदा?' वगैरे ठराविक साच्यातील प्रश्नच त्यानी माझ्या प्रश्नाला उत्तर म्हणून उलट विचारले. तेव्हा थोडेसे वेड घेऊन पेडगावला जाणे भागच पडले. 'ब्रह्म-देशाचा व्यापार बुडेल.' असे मी म्हणताच सपादक महोदय म्हणाले, 'मला नाही तसे वाटत. का म्हणून आमचा व्यापार बुडावा? आम्ही वेगळे झालो, म्हणजे आमचा माल हिदुस्थान घेणार नाही, असे कसे होईल?'

सपादकाना मध्येच सपादकीय काम पहावे लागे. तारा येत तिकडे लक्ष तर दिले पाहिजेच, तेव्हा विनाकारण साधे प्रश्न विचारून त्याचा अमोलिक

वेळ घेणे इष्ट नाही हे लक्षात घेऊन त्याना एवढेच विचारले की, 'पुढे स्वतंत्र झाल्यावर ब्रह्मदेशाची राज्यपद्धति कसल्या प्रकारची राहील ते आपण मला कृपा करून सागाल काय?' –'ते अद्याप ठरले नाही. बहुजनसमाज ठरवील त्याप्रमाणेच आम्ही वागू!'

प्र.–पण असे कसे म्हणता? ब्रह्मदेश स्वतंत्र व्हावा असे ठरविणारांनी स्वतंत्रतेची रूपरेषा तर ठरविलेली असेल ना? –'नाही. ते अद्याप काहीच ठरले नाही. आयत्या वेळी बहुमताने मान्य होईल तीच राज्यव्यवस्था आम्ही स्वीकारू.'

प्र.–मला आपले बोलणे मुळीच पटत नाही. स्पष्ट बोलतो याबद्दल क्षमा करा. आपण पाहिजे तर असे म्हणा की, ठरलेल्या राज्यघटनेची परिस्फुटता आता करता येत नाही. परतु तिचा विचार केला नाही हे मला खरेच वाटत नाही. एक तर आपण मला चकवू पहात आहा किवा आत्मवचना करून घेत आहा. खरे काय आहे ते तर सागाल? आपल्या गौप्याचा स्फोट होईल, अशी का आपणास भीति वाटते? –'छे, तसे काही नाही. खरोखरच बहुजनसमाजाने मान्य केलेली व्यवस्थाच आम्ही स्वीकारू. तिजबद्दल आज विचार करण्याचे कारणच नाही.'

प्र.–हे पहा, आपण हिंदुस्थानापासून वेगळे होणार म्हणता आणि कोणती राज्यपद्धति आपणास पाहिजे याचा विचार अजिबातच केला नाही असे सागता, हे खरे वाटेल कसे? ज्याला वेगळे व्हावेसे वाटते तो वेगळे होण्याची इच्छा प्रकट करण्यापूर्वी, नतर कसे रहावयाचे याचा विचारच करीत नाही, असा आपल्या म्हणण्याचा आशय दिसतो. आपणास वसाहतीचे स्वराज्य हवे, निर्भेळ स्वातंत्र्य पाहिजे, का आणखी कसले राज्य पाहिजे आहे, स्पष्ट तर करा! –'कानडाप्रमाणे वसाहतीचे स्वराज्य आम्हांला पाहिजे.'

प्र.–म्हणजे हिंदी व्यापाऱ्याना आपण ताबडतोब हाकून देणार म्हणावयाचे! –'ते कसे! हिंदी व्यापारी ब्रह्मदेशात राहिले म्हणून काय बिघडलें?'

प्र.–कानडांत हिंदी लोकाविरुद्ध तर केवढी मोहिम चालू आहे. त्याना तेथे स्थाईक होण्यास किती अडचण पडते, त्याच्यावर विचित्र निर्बंध कसे आहेत, इत्यादि प्रकार आपण जाणतच आहा. तसेच आपण ब्रह्मदेश स्वतंत्र झाल्यावर करणार ना!–'नाही, नाही, पण तुम्ही हिंदी लोकांची



"ब्रह्मदेश विलग करूं नका" म्हणणाराची सभा

तरफदारी करण्यासाठीच मुद्दाम आलेले दिसतां. आमच्या मनांत हिंदी व्यापाऱ्यांचा द्वेष मुळीच नाही. आमच्यावर हा वृथारोप का करतां ? '

प्र.—हें पहा, उगाच गैरसमज करून घेऊ नका. माझी येथील कोणत्याही हिंदी व्यापाऱ्याची ओळख नाही किंवा मला कोणी वकीलपत्रही दिलेले नाही. मी हे प्रश्न शुद्ध अभ्यासू दृष्टीनेच विचारीत आहें. हिंदी व्यापाऱ्यांविरुद्ध ब्रह्मी प्रजा चिडलेली आहे, असे वर्तमानपत्रातून दिसतें, म्हणून मी हे प्रश्न विचारले. आता सांगा पाहू, आपल्या स्वतंत्र ब्रह्मदेशांत हिंदी नागरिकांचा दर्जा कसा राहील? —' का बरे, सध्या आहे तसाच तो कायम राहील. त्यांत फरक करण्याचे कारणच नाही.'

प्र.—असे काय बोलता? ब्रह्मदेश वेगळा झाल्यानंतर ब्रह्मी प्रजाजनांचीच नेमणूक सर्वत्र होईल ना! 'ब्रह्मी लोकांसाठी ब्रह्मदेश' हे तत्त्व तुम्ही पाळाल ना? मग आज येथे असलेल्या हिंदी जनतेचा दर्जा कायम कसा राहील? ' यावर पुन्हा मूळपदावर येऊन संपादक महाशय म्हणाले, 'मी सांगितले ना की सर्व 'मेजॉरिटी' ठरवील त्याप्रमाणेच होईल म्हणून!'

प्र.—बरे तर, विभागणीला बहुजनसमाज अनुकूल आहे का? —' हो नसायला काय झाले? शेकडा ९०-९५ जणांना ब्रह्मदेश स्वतंत्र पाहिजे आहे.'

प्र.—होय ना? मग गावठी खेडवळांना ब्रह्मदेश स्वतंत्र झाल्यावर काय काय मिळेल हे आपण समजावून सांगितले असेलच. आपल्या पक्षाचा एखादा तरी जाहीरनामा निघाला असावा. त्यांत आपण जनतेला कसलीं कसलीं अभिवचनें दिलीं आहेत? —' अभिवचनें दिली नाहीत. पण त्यांना ब्रह्मदेश वेगळा व्हावा, असे वाटते खरे. आपणांला काय काय मिळावयास पाहिजे हे मग ' मेजॉरिटी ' ( बहुमत ) ठरवील.'

संपादकांच्या ' बहुमताचा ' हा अतिरेक पाहून खरोखरच संताप आला. तेव्हा थोडेंसें डिवचण्याकरितां मीं पुनः त्यांना जरा वेगळ्या आवाजांत म्हटलें, ' आपण तर एका मोठ्या दैनिकाचे संपादक म्हणवितां; लोकमत तयार करण्याची जबाबदारी आपणांवर संपादकीय खुर्चीबरोबरच चालत आलेली आणि आपण तर पुनः पुनः ' मेजॉरिटी ' ' मेजॉरिटी 'चा जप करतां; हें कोडें मला तर उलगडतच नाही! वास्तविक लोक हे आपले अनुयायी; कोणत्या मार्गानें त्यांनी जावें हें आपणच त्यांना दाखवावयाचें,

तें सोडून उलट अनुयायाच्या मागे मागे जाणारे हे पुढारी मात्र मी आजच प्रथम पाहत आहे. कदाचित् आपले वर्तमानपत्र फार विख्यात नसेल. पण जेवढे आपले क्षेत्र असेल तेवढ्यात तरी आपले एक निश्चित मत ठरलें असलेच पाहिजे. आपण ते लपवून ठेवण्याचा प्रयत्न का करीत आहां, हे मात्र मला समजत नाही.'

हे बोलणे सपादकांना तिखट लागलेले दिसले. त्यानी कामाची सबब काढली आणि 'आमच्या पक्षाचे अध्वर्यु' म्हणून एका ब्रह्मी बॅरिस्टराचें नाव त्यानी सुचविले. त्याना भेटल्यास 'आमच्या भावी अपेक्षा काय आहेत त्या कळतील,' असेही ते म्हणाले. औपचारिक रीत्या नमस्कार झाले, अमूल्य वेळ घेतल्याबद्दल क्षमा करा म्हटले, आणि हसत हसतच आम्ही 'विभक्त' झालो.

दुसरी मुलाखत यू बा पे याची घेतली. ब्रह्मदेशचे प्रतिनिधि म्हणून हे गोलमेज परिषदेस लडनला गेलेले. त्याच्या हातात रगूनमधील चारपाच प्रमुख दैनिके व साप्ताहिके आहेत. कौतुकाने त्याना 'ब्रह्मी लॉर्ड नॉर्थक्लिफ' असेही म्हणतात. त्यानीही 'कानडाचे वसाहती स्वराज्य' आम्हांला पाहिजे, असे सागितले. त्यानी हिंदी लोकाशी आमचा वैरभाव नाही, हेही कबूल केले. त्याना आम्ही ब्रह्मदेशातून हाकून देणार नाही म्हणून म्हटले. पण ह्या सर्वांचा मेळ मात्र कसा बसणार हे त्यांनी सागितले नाही. म्हणून त्याना वेगळाच प्रश्न मी विचारिला:—'ब्रिटिश सरकारकडून तुम्हाला पाहिजे तेच स्वराज्य मिळेल अशी खात्री आहे काय? आणि मिळाले नाही तर काय कराल?' असा दुहेरी प्रश्न टाकताच यू बा पे म्हणाले, 'हे पहा, आमचेकडे गाधींचा चरखा नाही आणि अहिंसा नाही. ब्रह्मी लोक कसे आहेत, हे प्रस्तुतच्या बडावरून कळले असेलच. ब्रह्मी प्रजेच्या मागण्या जोपर्यंत स्वीकारल्या जात नाहीत, तोपर्यंत हे असेच चालू राहील.'

प्र.—या बडाच्या बुडाशी राजकीय आकाक्षा आहेत असे म्हणतां तर! बरे मग, परवा जी 'ब्रह्मदेश वेगळा करू नका' असे म्हणणाऱ्याची सभा झाली तिचे कसे काय? त्याना बहुजनसमाजाचा पाठिबा नाही की काय!

—'अलबत्! शेकडा ९९ लोक आमच्या पक्षाचे असून फक्त शेकडा एक त्यांच्या बाजूस आहेत. त्या सभेला फार फार तर ५०० लोक जमले

असतील! ’ [ मी प्रत्यक्ष त्या सभेस हजर होतो आणि लोकसमुदाय अडीच हजारावर खात्रीने होता हे मी मोजले होते—पण! ]

प्र.—असे काय! त्याच्या मताचा गाजावाजाच फार होतो म्हणावयाचा. फुंजी त्यात सामील का होतात किंवा थारावडी यू पू किंवा मॉग मॉग जी-सारखे पुढारी त्या पक्षास का मिळाले ते सांगाल काय? —‘ हो हो, अहो त्याना विलायतेला जावयास मिळाले नाही, म्हणून त्याची ही खटपट आहे! राज्यघटना-कमिटीत आपलें नाव असावे असे त्याना वाटते. ते तरी विभागणीस अनुकूल नाहीत असें नाही. त्याचा व आमचा मतभेद फक्त अवधि किती लागावा यात आहे. त्यांच्या बोलण्याकडे विशेष लक्ष देण्याचे कारण नाही. फुंजी याच्या मागे लागतात याचे कारण ते अडाणी आहेत व श्री. उत्तम कॉंग्रेसला ( कराचीस ) गेले होते, म्हणून उत्तमाचेच म्हणणे ऐकावे असे त्यांना वाटते. बाकी त्याना विशेष असा मान कोठेच नाही. ’

यू बा पेंचा आशय कळला. त्याचा सर्व रोखही लक्षात आला. आपल्या उच्चासनाची त्याना वरचेवर जाणीव झालेली दिसे आणि मधून मधून सर चार्लस इन्नेस यांच्या मर्जीतले आपण आहोत, म्हणून त्यांना अभिमानाचे वारेही लागल्यासारखे दिसे. पण खऱ्या परीक्षकाला त्यातील मर्म कळण्यासारखे होते.

विभागणीला विरोध करणाऱ्यापैकी मॉग मॉग जीच प्रमुख. त्याना भेटल्यावर ‘ माझे म्हणणे मी एका पत्रकात स्पष्ट करून सागितले आहे, ’ असाच त्यानी हवाला दिला! पत्रकात मात्र फेडरेशनचा अर्थ काय, ते तत्त्व किती चागले आहे, त्यामुळे फायदे किती होतील वगैरे साधार दर्शविले आहे. परतु त्याचा मुख्य मुद्दा असा की, ब्रह्मदेशाला स्वायत्तता अल्पायासे मिळावी म्हणून सध्या हिंदुस्थानपासून विभक्त होण्याची गडबड करण्यांत अर्थ नाही. हिंदुस्थानच्या सुरातच आपला सूर आपण मिळवावा.

श्री. उत्तम हे तर सध्या ब्रह्मदेशातून हद्दपार झाल्यासारखेच आहेत. त्यांना मधुमेहाचा तीव्र विकार असून तूर्त ते कलकत्त्यास औषधोपचारासाठी इस्पितळांत आहेत. तरीही त्यानी माझ्याशी सुमारे अर्धा तास चर्चा केली, व ब्रह्मी प्रजेचे गाऱ्हाणे थोडक्यात पण मुद्देसूद रीत्या माडले. ‘ डोईपट्टी उठविल्याविना ब्रह्मी प्रजा सतुष्ट होणार नाही. हा अमानुष कर इंग्रज लोक

वसूल करीत आहेत, म्हणून नेहमी नेहमी ब्रह्मदेशात बडे होतात. त्याची खरी कारणे लक्षात न घेतां सरकार आपली दडपशाही चालू करते. आज ब्रह्मदेश वेगळा झाला तर साम्राज्यशाहीचा धिगाणा अधिक बेतालपणे चालेल. ब्रह्मदेशाचे त्यात नुकसान आहे, पण इतर राष्ट्राच्या स्वातंत्र्यालाही धोका पोहोचेल. तेव्हा सर्व हिंदी राष्ट्राने मिळून या विभागणीस विरोध करून डोईपट्टी प्रथम उठविली पाहिजे ' इतके त्यानी सांगितले.

सरकारच्या तालावर नाचणाराचे वर्णन देखील उत्तमानी केले. सर चार्लस इन्नेस यानी लंडनला आपणास पचतील तेच प्रतिनिधी कसे नेले आणि तेथे इतर सभासदास काही माहिती न देता, ब्रह्मदेशविभागणीचा प्रश्न तडकाफडकी कसा निकालात काढला, हेही त्यानी सांगितले. ' आर्थिक बंड असता त्याला राजकीय स्वरूप देऊन हिंदी प्रजेविरुद्धच ते आहे, असे भासविण्याचा सरकारी प्रयत्न चालला आहे, ' इतके सांगून त्यानी पुष्कळ उपयुक्त सूचना केल्या व कोणाकोणास भेटावयाचे त्याची नावे दिली.

हिंदी व्यापारी वर्गातील प्रमुखाचीही गाठ घेतली. त्यानी हिंदी भांडवल ब्रह्मदेशात किती गुंतले आहे, ब्रह्मी प्रजा राज्यव्यवस्था पाहण्यास लायक का नाही वगैरे ठराविक कारणे सांगून हिंदी व्यापारी व नोकर याच्याशिवाय ब्रह्मी कारभार चालणारच नाही, असे आपले मत दिले. त्या सर्वांचे म्हणणे नुसते ऐकून घेणेच शहाणपणाचे होते.

अशा एकदर मुलाखती झाल्या. त्यावरून निरनिराळ्या पक्षोपपक्षांच्या आकांक्षा काय आहेत आणि त्याची विचारसरणी कशी धावते, हे कळून येईल. आता ब्रह्मदेशाच्या बंडाळीचा आणि विभागणीचा विचार साकल्याने करावयाचा आहे. '

## अध्याय नववा

# समालोचन

ब्रह्मदेशाचे बंड अद्यापि आवाक्यात येत नाही असे सरकारने कबूल केले नसले, तरी ती गोष्ट सत्य आहे. सर्व राजबंदींना प्रथम माफी जाहीर केली, तिचे क्षेत्र वाढविले आणि दोन वेळां ब्रह्मी पुढाऱ्यांशी गव्हर्नरांनी विचार-विनिमय केला. पण ह्या सर्वांचा परिणाम बंडाळीवर मुळीच झालेला दिसत नाही. खून, लूट, दरवडे आणि सरकारी दप्तरे जाळण्याचे प्रकार अजून थांबले नसून, उलट वाढत्या प्रमाणावरच आहेत असे म्हणता येते. तेव्हां यावरून काय अनुमान काढावयाचे? ब्रह्मी प्रजेच्या मनात—विशेषतः बंड-खोरांच्या मनात—हिंदी जनांचा द्वेष भरला आहे, असे सरकारतर्फे दर्शविण्याचा पुष्कळ प्रयत्न झाला, आणि त्याचे प्रत्यंतर तिकडून हिंदुस्थानात परतणाऱ्या हिंदी रहिवाशांच्या गर्दींतही सापडते. पण, हिंदी लोक हजारांनी परतले, तरी त्यावरून त्यांची भीति वास्तविक होती, असे मात्र मुळीच ठरत नाही विनाकारण माजविलेले हे हिंदद्वेषाचे भूत ऱ्याच जणांना भेडसावू शकले, ही गोष्ट मात्र खरी. हा खटाटोप कसा सुव्यवस्थित होता व त्यांत हेतु काय असावा, हे प्रथम पाहणे आवश्यक आहे.

हिंदी लोकांची धोंड आपल्या मार्गांत येणार, हे ब्रह्मदेशातील गोऱ्या व्यापाऱ्यांना फारच लवकर कळले. धान्य, लाकूड किंवा खनिज संपत्ति ही लुटण्याचा मक्ता आपण बळकावून बसल्यानेच त्यांची भूक भागणारी नव्हती. सरकारी नोकरी व शहरपेठेतील व्यापार यांतही आपलीच वर्णी कायमची लागावी, आपणास कोणी प्रतिस्पर्धी नसावा, एकतंत्री राज्य उपभोगण्यास सापडावे, अशी अपेक्षा गोऱ्यांची होती व अजूनही आहे. परंतु हिंदी नोकर कमी पगारात मिळतात आणि हिंदी व्यापारी सर्व व्यापार आपल्या हातीं ठेवतात, तेव्हां त्यांचे उच्चाटण कसे करावे याविषयीं दीर्घ विचार होऊन सुपीक मेंदूंतील युक्ति बाहेर पडली. ब्रह्मी बंडखोरांत ' हिंदी लोकांचा द्वेष फारच माजला आहे ' असे दर्शविण्याचा जारीने प्रयत्न होऊं लागला.

बंडखोरी म्हटली म्हणजे तीत हल्ले प्रतिहल्ले व्हावयाचेच, आणि मारहाण देखील टळत नाही. बरें, बडखोर हिंदी लोकच वेगळे निवडून काढून त्याना ठोकतात असे म्हणावे, तर एकदर ज्या १०७४ इसमाना त्यानी यमसदनास पाठविले, त्यापैकी फक्त ७४ च हिंदी आहेत, असे सरकारचेच पत्रक आहे.

नोकरशाहीची युक्ति अशी होती की, मारहाणीत कोणी हिंदी सापडला की, तेवढाच मुद्दाम निर्दिष्ट करावयाचा व ब्रह्मी अथवा इतर प्रजाजनावर झालेल्या हल्ल्याचा निर्देश टाळावयाचा. 'एका हिंदी शेतकऱ्याची गज जाळली '—' खेड्यावर हल्ला झाला, एक हिंदी मेला ' अशा प्रकारच्या विकृत बातम्या मुद्दाम पसरविण्यात आल्या. यात दुहेरी हेतु होते. भेदनीतीचा हा अगदी नवा डाव आहे. ब्रह्मी प्रजेच्या मनात हिंदी जनतेविषयी वैमनस्य आहे, असे प्रथम हिंदी लोकाच्या मनात भरवून द्यावयाचे, आणि नतर स्वसरक्षणार्थ हिंदी लोकानी कडक उपाय योजण्याची विनति सरकारला केली की, हिंदी प्रजा तुमचा द्वेष करते म्हणून ब्रह्मी प्रजेची समजूत घालावयाची! असा दुटप्पी व दुहेरी डाव नोकरशाहीचा आहे, असे का म्हणू नये? पुनः गमत अशी की, बड मोडण्यास आघाडीवर हिंदी सैन्य गेले म्हणजे त्याचेही वेगळे पण विकृत स्वरूपात प्रतिपादन करता येतें. ' हिंदी शिपायाना तुमचेवर शस्त्र चालविण्यास काहीच वाटत नाही. ' ही शिकवण प्रत्यक्ष दिली नाही, तरी अप्रत्यक्ष रीत्या ब्रह्मी प्रजेच्या मनावर ठसली जाणार, यात शका कसली? असे बी पेरल्यावर मग ' तुम्ही हिंदुस्थानपासून वेगळे व्हा कसे?' म्हणून ब्रह्मी प्रजेला फूस दिली की, हे सर्व आपल्या कल्याणासाठीच आहे असे ब्रह्मदेशियाना वाटते.

अशी कारस्थाने रचण्यात ब्रिटिश मुत्सद्दी चतुर आहेत. ब्रह्मदेश हिंदुस्थानपासून वेगळा असावा, शहाणे व शिकलेले हिंदी व्यापारी आणि अधिकारी आपल्या राज्यात नकोत, फक्त गोऱ्या बाळानाच तो प्रदेश आंदण मिळावा, अशा प्रकारची मनोराज्ये ब्रिटिश व्यापाऱ्याची आहेत. पण साम्राज्यवादी राजकार्यधुरधराचा हेतु यापेक्षा वेगळा आहे. त्याना ब्रह्मदेश विलग व्हावा असे वाटते, ते निराळ्याच कारणासाठी. जागतिक राजकारणाचे केंद्र युरोपमधून निघून आशियात आल्यास बरीच वर्षे झालीं. त्याचे धागेदोरे

पाहिले म्हणजे सिंगापूर एकदम स्पष्ट दिसेल. सिंगापूरचें नाविक केंद्र, बगदादचे वैमानिक केंद्र आणि कोठली तरी आणखी केंद्रे ही कशाची पूर्वतयारी दर्शवितात? शिवाय झोंपेतून जागा होणाऱ्या चीनवर पाहिजे तेव्हा पाय टाकून त्याला दाबता यावे, अमेरिका, फ्रान्स, हॉलंड व जपान याच्या मेतकुटात जमल्यास माती कालविता यावी आणि उदयोन्मुख राष्ट्राची मान मुरगाळण्यास सवड व सत्ता मिळावी म्हणून साम्राज्यवाद्याची धडपड चालू असावयाचीच.

कारण साम्राज्यवादाची आधुनिक कल्पना अगदी वेगळी आहे. स्वतःची विडी पेटविण्यासाठी, दुसऱ्याच्या घरादाराचीच काय, पण व्यक्तीची देखील राखरागोळी करण्यासाठी खटपट करणे हे प्रचलित काली साम्राज्यवादाचें स्वरूप होऊन बसले आहे. म्हणून ब्रह्मदेश वेगळा करणे म्हणजे अशा सर्वग्रासी व सर्वभक्षक साम्राज्यवादाचे बूड स्थिर करण्यास मदत करण्यासारखें आहे, असे म्हणता येते. कारण असले वाढते साम्राज्य म्हणजे जगातील शांततेस जबरदस्त धोकाच होय.

ब्रह्मदेश वेगळा होऊन खराखुरा स्वतंत्र होत असेल तर त्याबद्दल सर्वांनाच आनंद होईल. 'पिछेसे आये और आगे बढगये' म्हणून हिंदी जनतेला ते एक अनुकरणीय उदाहरण होईल. परंतु इजिप्त व इराक याची उदाहरणे ताजी आहेत. त्यांना स्वातंत्र्य असल्याचे कागदोपत्री नमूद आहे. पण ते स्वातंत्र्य कसले आहे, याची चौकशी मात्र कोणी करू नये. एवढे कशाला? खुद्द ब्रिटिशाच्या जातभाईचीच गोष्ट पहा ना? आयर्लंड स्वतंत्र आहे, असें म्हणणारास स्वातंत्र्याचा खरा अर्थ तरी कळला नाही किंवा त्याला वस्तुस्थितीचें ज्ञान तरी नाही असेंच म्हटले पाहिजे. शेजारच्या, स्वधर्मी भाऊबंदांना 'स्वराज्य' देण्यात जर इतके आढेवेढे तर ब्रह्मदेशाचे बाबतीत ते किती होतील बरे? म्हणून ब्रह्मदेशच्या विभागणीस विचारवंताचा विरोध आहे तो अशासाठीच की, विभागणीमुळे साम्राज्यशाहीच्या वाढीस आळा न बसता, उलट जोम येईल. ब्रह्मदेशात गोरे सैन्य आणून ठेवले किंवा तेथे साम्राज्यवाद्यांचे 'स्वराज्य' बोकाळले म्हणजे आसपासच्या देशावर अनर्थ कोसळण्यास अवधि कसचा? एडन, सुएझ, माल्टा किंवा जिब्रॉल्टर या ठिकाणांना फक्त नाक्याची जागा म्हणूनच लष्करी महत्त्व आहे. पण ब्रह्मदेश म्हणजे

आशियांतील नाक्याची जागा होऊनच्या होऊन, खनिज तेल, चांदी, लाकूड रबर, तांदूळ इत्यादि लढाईस आवश्यक अशा साधनसामग्रीचा भरपूर सांठा देखील त्या जागेभोवती अनायासे जगाच्या कल्याणासाठी ( ? ) जगदुद्धारार्थ त्या पुण्यपुरुषांच्या हाती लागणार आहे. चीनवर नजर ठेवतां येईल, सयाम गडबड करू लागला तर त्याला लाथेखाली दडपता येईल, जपानचे आक्रमण वाढू लागल्यास त्यास पायबंद घालता येईल, किंवा सर्वत्र आपला वरचष्मा राखता येऊन 'आशियातील राष्ट्रे म्हणजे गोऱ्या घोड्यांची मनसोक्त चरण्याची कुरणें होत !' हे विधान बेधडकपणे घोषित करता येईल. अशासाठीच ब्रह्मदेशासारखा संपन्न व समृद्ध देश हिंदुस्थानापासून वेगळा असावा असें इंग्रजाना वाटते. हिंदुस्थानवरील मगरमिठी ढिली होत चालली असें वाटू लागले तरी सुद्धा ब्रह्मदेशातून डोळे वटारून पाहिल्याने काम भागेल.

अशा अनेक दूरवरच्या धोरणासाठी ब्रह्मदेश वेगळा पाहिजे अशी 'ब्रह्मी प्रजाजनांची' ( ? ) मागणी आहे. साम्राज्यशाहीचे बंध घट्ट होणार म्हणजे आणखी कोठल्या तरी राष्ट्रावर या सर्वभक्षकाची वक्रदृष्टि वळणार ! म्हणूनच ब्रह्मदेशविभागणीस विरोध करावयाचा आहे. आम्ही पारतंत्र्यांत खिचपत पडलो, म्हणून दुसऱ्या स्वतंत्र राष्ट्रानीही आमच्याच पंक्तीत येऊन बसावें अशी आमची इच्छा नाही. म्हणून या गुप्त कटास कसून विरोध केला पाहिजे. त्या ठिकाणी ब्रह्मी बंडखोरांनी आमच्या बांधवावर हल्ले केले आणि त्यांना देशोधडीस लावलें म्हणून सूड उगविण्यासाठी आम्ही पुनः ब्रह्मी प्रजेशीं लढलेच पाहिजे, अशी वृत्ति वेडेपणाची होईल. कारण प्रथमतः केवळ हिंदी लोकांवरच ब्रह्मी बंडखोरानी हल्ले केले ही गोष्ट चुकीची. दुसरी बाब अशी की, त्यांनी आमचा द्वेष केला तरी जोपर्यंत तिसरा शत्रु आम्हा दोघांवर टपून बसला आहे तोपर्यंत आपसांतील वैरभावाचा विचार करण्यास फुरसत नाही. बंडाळीचें खरे स्वरूप लक्षांत न घेतां सरकारी कलुषित दृष्टीनेच आम्ही तिकडे पाहत आहोंत, हे आश्चर्य होय.

वास्तविक ब्रह्मी बंडाळीचा व विभागणीचा तसा कांहीच संबंध नाही. बंडाळी ही निवळ प्रजेच्या गाऱ्हाण्याचें प्रगट स्वरूप होय. डोईपट्टी किंवा तातमेडा ( घरपट्टी ) वसूल करणारे शंभरांहून अधिकारी बंडखोरांच्या शौर्यास बळी पडले यावरून काय दिसतें ? खेड्यांवर हल्ला होतांच ते प्रथम



सुधारलेलीं पण लाकडी घरें.

गावकामगारला का पकडतात आणि सारावसुलीचे किंवा इतर सरकारी कागदपत्र का जाळून टाकतात, याचे उत्तर सरकारी अधिकारी कसे देणार? सरकारी कर, तो वसूल करण्याची जुलमी पद्धत व ते अधिकारी, याच्या विरुद्धच बडवाले मुख्यतः उठले आहेत, हे सिद्ध करण्यास दुसरा पुरावाच मुळी नको आहे. परंतु बडाचे खरे स्वरूप उघडकीस आले, तर सर्वत्र सुधारलेल्या म्हणून नावाजलेल्या ब्रिटिश राष्ट्राची जगाच्या चावडीत नाचक्की होईल. कारण कायद्याने ५०–७५ वर्षे निःशस्त्र केलेली प्रजा – आणि तीहि लढवय्यी जात नाही अशी – सशस्त्र, संघटित, सुधारलेल्या व सुव्यवस्थित सरकारशी सात आठ महिने झुंजत राहून सरकारी अधिकारी ठार करते व सरकारी दप्तरे जाळून टाकते, याचा अर्थ काय होतो? 'देशबांधवांशी बेइमानीने वागा, त्याचे सर्व भेत आम्हाला कळवा म्हणजे तुम्हास दहा गुन्हे ( खून नव्हे! ) माफ' असे जाहीर आश्वासन दिले, तरी बंडखोर हाती लागत नाहीत, ही गोष्ट काय दर्शविते? बंडाळीचा उपशम करण्यासाठी ब्रह्मदेशात आठ दहा हजार सैन्य नेले, मशिनगन्स उभारल्या किंवा जागोजाग तोफा डागल्या, म्हणून अत्यंत निर्वाणीने उठलेले ब्रह्मी शेतकरी भिणार थोडेच? त्याचे अंगी समोरासमोर लढाई देण्यास सामर्थ्यही नाही. कारण मुख्यत. त्याचजवळ साधने नाहीत पण 'येनकेन प्रकारेण' ते प्रबल सम्राट सरकारला जेरीस आणीत आहेत, ही गोष्ट कोणालाच नाकबूल करता यावयाची नाही. इन्सेनकडे पोलिसाचा बंदोबस्त सरकारने केला तर हेंझादाचे बाजूस बंडखोर बळावतात. म्हणून इन्सेनकडील पोलिस हेंझादाकडे गेले की, थारावडीचे आसपास हल्ले वाढतात. अशी ही चुकवाचुकवीची आणि गनिमी काव्याची लढाई मोठ्या चिकाटीने लढण्यात ब्रह्मी शेतकऱ्याच्या मनातील तीव्र असंतोष प्रकट होत आहे. हिंदी प्रजाजनांनी आपल्या तोंडातील घास काढून घेतला असल्याने हिंदी लोकांवर ते तुटून पडले तर त्यात नवल नाही. परंतु अशा बंडाचे वेळीं हे सर्व पक्षोपपक्ष लयास जाऊन मोठा एकच प्रतिस्पर्धी दिसतो, त्याविरुद्ध सर्व मोहीम चालते.

शेतकऱ्याची ही मनोभूमिका काही सुशिक्षित व सरकारकच्छपी लागलेल्या ब्रह्मी पुढाऱ्यांना समजत नाही. आपण मागू तसले राज्ययंत्र इंग्लंड आपल्या झोळीत टाकणार ही त्याची भावना झाली आहे. स्वराज्यदानाचे

बाबतींत इंग्लंड किती चिक्कू व आखडत्या हाताचे आहे, याचा त्याना स्वतःला अनुभव नसला तरी इतर राष्ट्रांच्या अनुभवावरून ब्रह्मी प्रजेस हे ज्ञान व्हावयास पाहिजे. परंतु इतिहासापासून काहीच शिकावयाचे नाही असाच जर त्या इंग्रजांच्या कच्छपीं लागलेल्या ब्रह्मी पुढाऱ्यांचा निश्चय असेल तर त्याला कोण काय करणार आहे? अस्तु.

हिंदी सावकार म्हणजे मद्रासकडील चेट्टी व हिंदी मजूर अशा बंड-खोरीचे वेळी घाबरून हिंदुस्थानांत पळून येतात, याचाही उलगडा केला पाहिजे. खुद्द बंडाळीच्या टप्प्यांत हिंदी, ब्रह्मी, युरोपियन असा भेद मुळीच पाळला जात नाही, हे उघडच आहे. आडवा आला की तो कापून काढण्याकडे प्रवृत्ति बंडखोराची व्हावयाचीच, आणि अशी अस्वस्थता माजली म्हणजे मारवाडी, सावकार, दुकानदार अशाना अर्थातच भयंकर भीति वाटते. ती भीति म्हणजे ' भांडवल ' सुरक्षित कसे राहील याची. आपण जबरे व्याज घेतों, कुळाच्या कौटुंबिक हालअपेष्टांची किंवा सुखदुःखाची पर्वा करीत नाही, ते आपणाविषयीं अत्यंत असंतुष्ट असतात, अशी जाणीव साव-काराना असते आणि म्हणून बंडाळी माजली म्हणजे प्रथम हल्ला आपणावर होईल हे त्याना आपसूकच कळते, कोणी तिसऱ्याने सांगावे लागत नाही. ' व्यापारी बनियाची ' अशी जात कोठल्याही धर्माची अथवा कोणत्याही देशातली असो सशाप्रमाणे भित्री असते. हा अनुभव आपणाकडे सोलापूर मार्शल लॉचे वेळी आला. सरकारास ' घालीन लोटांगण ' करीत जाण्यास अशा भांडवलवाल्यांना मुळीच शरम वाटत नाही. त्यांचा हेतु एकच— ' आम्हाला सुरक्षित ठेवा म्हणजे आमची कुळे व आम्ही पाहून घेऊ. ' अगदी ह्याच प्रकार ब्रह्मदेशात घडला तर आश्चर्य नव्हे.

बंडाळीच्या जिल्ह्यांतील सावकारवर्ग जीव बचावण्यासाठी पळू लागला, तेव्हा इतर ठिकाणच्या ब्रह्मी प्रजाजनानी सावकाराचे खरे धारिष्ट ओळखून हिंदी दुकानदाराना निनावी धमकीची पत्रे पाठविण्यास आरंभ केला. शूर वीरांच्या पराक्रमावर पोकळ धमक्या देणारे घमेंडीनंदन चोहोंकडेच उद्भ-वतात. बंडखोरी माजली थारावडी जिल्ह्यात आणि अशी धमकी देणारी पत्रे प्रमुख हिंदी व्यापाऱ्यास आली रंगूनमध्ये. यावरूनच त्यांत खऱ्या बंड-खोरांचे आंग नसून उपटसुंभ पुढांची ती कारवाई असावी असे स्पष्ट दिसते.

' तुम्ही लवकर पळ काढा, नाहीतर कठिण प्रसग ओढवेल ' अशा आशयाची ती पत्रे असत. एका भित्र्याने दुसऱ्या ' भ्याडास भेडसावे ' तशापैकीच हा प्रकार झाला. कारण बडखोर अशा सनदशीर मार्गाने पूर्वसूचना देऊन हल्ला करीत नाहीत. पण बडखोरीचा फायदा घेणारे मात्र असा चोरटा हल्ला करण्याचा आविर्भाव आणतात. हिदी व्यापारीही पडले भित्रे त्याचे मन देखील त्याना खात असते की, आपण जी चैन चालविली आहे ती ब्रह्मी लोकाच्या मूर्खपणामुळेच. म्हणून कोठे खुट् झाले की, सशाप्रमाणे ते घाबरतात व आपल्य प्राणावर बेतले असेच त्याना वाटून ते पळत सुटतात!

ही कारणपरपरा कदाचित् खोटी वाटेल, पण तिला पुष्टिदायक असा एकच प्रसग व एका खऱ्या समाजोपयोगी सस्थेचे उदाहरण देतो. रगूनमधील ' आर्यसमाज ' हा ब्रह्मी प्रजेच्या डोळ्यावर येण्याचे मुळीच कारण नाही. तेथे आर्यसमाजाचे कार्य फार व्यापक, तसेच प्रशसनीयही आहे. पण त्या ' आर्याना ' ब्रह्मी बंडाळीची भीति वाटत नाही. किवा ते तेथून पळही काढ् इच्छीत नाहीत. उलट रगूनमध्ये ब्रह्मी व हिदी मजुराची जेव्हा जगी मारामारी दीड वर्षापूर्वी झाली, तेव्हा हिदी मजुराचे सरक्षण करण्यास आर्यसमाज अस्तनी वर सारून पुढे सरसावला आणि त्याने शक्य तितक्या हिदी मजुरास आर्यसमाजाचे आवारात घेतले, व बाहेर स्वतःचे लाठीचे पहारे बसविले. तेव्हा ब्रह्मी हल्ले लगेच थाबले. ' भित्यापाठी ब्रह्मराक्षस ' ही म्हण कदाचित् ब्रह्मी प्रजेच्या वागणीवरूनच आपल्याकडे प्रचारात आली असावी. कारण जरा धैर्य धरले किवा नुसती का होईना पण ऐट आणली, की भेडसावणारे ' ब्रह्मराक्षस ' पळून जातात असा अनुभव अनेक वेळा ब्रह्मदेशात आलेला आहे. खरे बडखोर अर्थातच भिवविण्याच्या भानगडीत पडत नाहीत.

बडखोराना कोणा परकीयाचे साहाय्य आहे की काय किवा चीन लोकाच्या मदतीस ' रक्त ' हस्तक धावून आले आहेत का कसे? ह्या सभवनीय शकेचेही निरसन केले पाहिजे. ब्रह्मदेश बगालला अगदी लागूनच आहे. तेव्हा तरुण क्रातिकारक अराजकानी ब्रह्मी बडखोराशी सगनमत केले असावे, असे देखील कित्येकाना वाटते. याचे मुख्य कारण असे की, हे क्षुल्लक बड साम्राज्य-सरकारला थाबविता आले नाही किंवा एकदा पेटल्यानतर मग ते लवकर आवाक्यातही राहिले नाही. बडखोरीचा उपद्रव थारा-

बंडी जिल्ह्यात बहुधा नेहमीचाच असतो. तशापैकीच हाही असेल या समजुतीने सरकारने तिकडे प्रथम दुर्लक्ष केले, ही गोष्ट खरी. परंतु दुसऱ्याही कारणासाठी सर चार्लस इन्नेस यानी बंडाळीकडे कानाडोळा केला असावा. ब्रह्मदेशविभागणीसाठीच हे बंड आहे असे दाखविण्याचा हेतु सर चार्लस याचा असावा, अशी शंका मुत्सद्द्यांचे मनात येणे शक्य आहे. ब्रह्मी लोकांचा असंतोष हा केवळ हिंदुस्थानशी जखडल्यानेच झाला आहे, विभक्त राहण्याची त्यांची उत्कट इच्छा आहे, असे विलायतेतील लोकांना भासविण्याचा हेतु सर चार्लस इन्नेस याचा नाही असे म्हणवत नाही.

लोकांत तर खरोखरच असा भ्रम निर्माण झाला होता की, बंड हे काही खरे नाही. सरकारची ही नवी कलाप्ति आहे. पण शेवटी बंड लुटुपुटीचे नसून खरोखरच ते सरकारच्या आवाक्याबाहेर गेले हे स्पष्ट झाले, तरीही हिंदी प्रजाजनांचा त्याजवर विश्वासच बसेना. कारण ' बंड बंड ' म्हणून कितीही मोठे झाले तरी सशस्त्र ब्रिटिश फौजेपुढे बंडखोरांचा टिकाव लागेल कसा? अशी शंका प्रत्येकासच सुचे. बंडखोरांचा पाडाव इतके दिवस होत नाही याचा अर्थ सरकारचे मनात बंड मोडावयाचे नाही असाच ते करीत. पण रेंगाळत पडलेले हे बंड आणखी काही काळ चालले तर ' लाल बावटा ' आत शिरण्याचा संभव आहे. ब्रह्मी प्रजाजनांची वृत्ति समाजसत्तावादी स्वरूपाचीच असून त्यांचेकडे व्यक्तिगत द्रव्यसंचय करण्याचा प्रघात प्रथमपासूनच नाही, हे आपण पाहिले आहेच. प्रचलित काली कोणाही त्रयस्थाची मदत नसता किंवा त्यांच्यामध्ये कोणी सुशिक्षित पुढारी नसता इतके दिवस बंडखोर बलशाली ब्रह्मी सरकारशी तोंड देतात, याचा अर्थ गनिमी काव्याची लढाई ते पूर्णपणे खेळू शकतात हाच होय. ब्रह्मी शेतकरी एकाकीच लढत आहेत. बंगाल्याचे किंवा लाल बावट्याचे साहाय्य त्यास सध्या तरी नाही. तसे साहाय्य देण्यासाठी दोघेही दोन्ही दिशास टपून बसले असल्यास मात्र माहीत नाही. कारण अडचणीत सापडलेल्या साम्राज्यवाद्यास अधिक तगाई करणे हे तर त्यांचे ब्रीद आहे. अस्तु.

---

अध्याय दहावा

# समाजस्थिति

'कोणत्याही राष्ट्राच्या संस्कृतीचे मोजमाप तेथील समाजात स्त्रियाना मिळणाऱ्या स्थानावरून करता येते,' असा एका अमेरिकन तत्त्ववेत्त्याचा सिद्धांत आहे, व तो बव्हशी खरा दिसतो. ही कसोटी ब्रह्मी संस्कृतीस लावून पाहिली तर जगातील सर्व राष्ट्रात ब्रह्मदेशाला वरचे स्थान मिळेल. कारण ब्रह्मी महिलाना मिळते तितके स्वातंत्र्य किंवा तितके महत्त्व अन्यत्र कोणत्याच समाजात नाही, असे म्हणतात. खाजगी मालमत्तेचा किंवा स्त्रीधनाचाच हक्क घेतला तर त्यासाठी सुधारलेले देश कायदे करू लागले आहेत व कांहींनी नुकतेच केलेले आहेत. परंतु ब्रह्मी स्त्रीच्या जन्मसिद्ध हक्कांपैकीच विवाहोत्तर खाजगी मालकीचा हक्क असल्याने वेगळा कायदा करण्याची आवश्यकता भासली नाही. तीच गोष्ट मतदानाची. इंग्लंड आपणास सुधारलेल्या राष्ट्रांपैकी अग्रेसर मानते. पण तेथे मतदानाच्या हक्कासाठी स्त्रियाना किती झगडावे लागले व त्यामुळे 'मताभिलाषी बायांचा धिंगाणा' किती माजला, हे ठाऊक असणाराना ब्रह्मदेशात प्रथमपासूनच स्त्रियांना ते हक्क आहेत हे ऐकून आश्चर्य वाटेल. पण त्याहीपेक्षा आश्चर्य हे की, 'न स्त्री स्वातंत्र्यमर्हति' म्हणून दंडक घालणारा आपलेकडे 'मनु'च होता आणि ब्रह्मदेशात स्त्रियाना इतके स्वातंत्र्य देणारा 'मनु'च आहे! ह्या मनूचे कोडें काही का असेना, जेथे स्त्रियाना कल्पनातीत स्वातंत्र्य आहे तेथील समाजस्थिति मनोरंजक, उद्बोधक आणि काहीशी आकर्षक अशी वाटणारच.

स्त्रियांच्या समाजातील दर्जापासूनच लिहावयाचे तर असे म्हणता येईल की, बहुतेक सर्व स्त्रियाना 'आपण ब्रह्मदेशातच जन्मलो असतो तर फार बरें झाले असते,' असे वाटेल. एक तर काही बाबतीत पुरुषांपेक्षा अधिक सवलती त्याना आहेत आणि दुसरें असे की, समाजात वावरण्याची पूर्ण मुभा ब्रह्मी स्त्रियाना असते. पडदा किंवा बुरखा नसलेल्या स्त्रिया तरी आपलेकडे समाजात सर्रास कोठे मिसळतात? पण ब्रह्मी स्त्रियांचे तसे नाही. पडदा

कसा तो त्याना ठाऊक नाही. पण उलट रोजच्या व्यवहारात त्याना महत्त्वाचे अधिष्ठान आहे. म्हणजे मध्यम वर्गात आपणाकडे घरात अधिकार गृहिणीचा असला तरी बाजारहाट पुरुषाच्याच हाती असतो. तसेही ब्रह्मदेशात नाही. सर्वच कामे गृहिणीनी आपल्या ताब्यात घेतली असल्याने त्याना गृहिणी का म्हणावे ही पचाईतच पडेल. कारण गृहिणीसारखे घर राखण्याचे काम ' घरच्या मडळीं 'ना करावे लागते. चूलबाईची आराधना करूनसुद्धा ब्रह्मी गृहिणी बाहेरची कामे साभाळतात. नुसत्या खरेदीसाठी त्याना बाजारात रोज जावे लागते असे नाही. बहुतेक ब्रह्मी बायका कसला ना कसला तरी व्यापार करतातच. म्हणून देवघेवीसाठी त्याना बाहेर फिरावे लागते. बाजारात बायकाचाच भरणा मनस्वी. आपल्या इकडे फक्त भाजी विकणाऱ्या तेवढ्या ' माळणी ' असतात, पण ब्रह्मदेशात कापडचोपड, धान्य-भुसार, खाद्य पदार्थ इत्यादि सर्व प्रकारच्या दुकानात ' देवी'-चेच प्राधान्य दिसते. खरेदी करण्याचे काम पुरुषवर्गाकडे असते तर दुकानदार ब्रह्मी बायकानी त्याना चागलीच ' टोपी ' घातली असती. पण गाठ बायकाबायकाचीच पडते आणि एकमेकींची वर्मे समजतात. तेव्हा ठकवाठकवी सहसा होत नाही.

परतु विविध व्यवसाय करणारी ब्रह्मी अबला आपले सौदर्य वाढविण्याची फारच काळजी घेते. तिची केशभूषा रचण्यास खरोखरच चातुर्य लागते. ब्रह्मी लोकच मुळी थोडेसे खुजे. त्याचा केतकी वर्ण, गालांची हाडे उच व पुढे आलेली, नाकाच्या बोडीखालचा ओष्ठप्रात रुदट, भुवयात वक्रता कमी; डोळे बारीक इत्यादिकामुळे सौदर्यहानि जरी होत असली तरी ती केशकलाप, वस्त्रे व अगविक्षेप यानी भरून काढण्याची कला ब्रह्मी बायकाना ब्रह्मदेवाने प्रथमपासूनच शिकविलेली असावी असे वाटते. केशभार मोठा व लाब असेल तितकी अधिक शोभा, असे ब्रह्मी स्त्रिया समजतात. मात्र नेहमी वेणी न घालता ' अबाडा ' बाधण्याची चाल त्याच्यात आहे. परतु अबाडा कामचलाऊ होय. काम करते वेळी केसाची गाठ मागे मारण्यास हरकत नसते. पण सायकाळी स्नान झाल्यानतर ( ब्रह्मी लोक नित्याचे स्नान संध्याकाळीच करतात ) किंवा देवदर्शनाला जातांना ब्रह्मी महिलाचे केश डोक्यावरच मोठया खुबीने गुडाळलेले असतात. सकृद्दर्शनी डोक्याच्या

मध्यभागी छोटीशी पण उच अशी काळी मखमालीची ती टोपी आहे असा भास होईल. परतु सूक्ष्म निरीक्षण केल्यास तो केशाचा पुज असल्याचें दिसेल. व्यवस्थित बदोबस्ताने सर्व केसाना ताब्यांत ठेवण्याची ती युक्ति आमच्या इकडे कितपत आवडेल ते सागता येणे कठिण. पण 'नाविन्य' म्हणूनच तिची नक्कल करणाऱ्या महाराष्ट्र महिला कमी आढळणार नाहीत. अशा केशकलापाची शेपटे किंवा त्यात लांब देठासह घातलेली फुले काना-पर्यंत खाली सोडणे, ही एका विशिष्ट अवस्थेची खूण आहे. कन्या 'उपवर' झाली – आपण आता विवाहबद्ध व्हावे असे तिला वाटू लागले ( हो, तिच्या आईबापाच्या मतापेक्षा तिच्या मतालाच ब्रह्मदेशात अधिक मान आहे ) म्हणजे केस कानापर्यंत लोंबत सोडून ती फिरावयास जाते. आणि मग तिची मागणी करण्यास कोणी तरी तरुण येतोच. पूर्वी साधारणपणे मुलगी वयात आल्यानतरच तिचे लग्न होई. ही पहिली रीत जाऊन अलीकडे मात्र १४-१५ व्या वर्षी तिचे लग्न होते. तरुणतरुणींचे मन एक झाले तरी दोन्ही-कडील वडील मडळीची अशा विवाहास समति लागतेच. ती बहुधा मिळते आणि मिळाली नाही तरीही भागते. त्यात वावगे असे काहीच नाही. मुलामुलीना आपले लग्न ठरविण्यास ब्रह्मी समाजात मोकळीक बरीच आहे. सध्याकाळचे भोजन आटोपल्यानतर म्हणजे रात्री ८।। ते ९।। च्या दरम्यान प्रियाराधनाची वेळ म्हणून मानली जाते. 'न्याहारीचा वकुत' किंवा 'गोदोहन-काल' हे शब्दप्रयोग आपणाकडे रूढ आहेत. तसाच 'प्रिया-राधनकाल' हाही ब्रह्मी प्रजेत नित्याच्या परिपाठातला आहे. लग्नाच्या बाबतीत जात, गोत, कुल, शील, गरीबी, श्रीमती किंवा धर्मदेखील आडवा येऊ शकत नाही. अगोदर ब्रह्मदेशात जाती, गोत्र, प्रवर असल्या अडचणी नाहीतच. त्यामुळे वैवाहिक निवडणुकीस स्त्रीपुरुषास क्षेत्र फारच मोठे असते. बरे, लग्नापूर्वी स्त्रीने मिळविलेली सपत्ति किंवा तदनतर तिने कमावलेली मिळकत या दोन्हीवरही तिचाच ताबा असल्याने–

'नष्टे मृते प्रव्रजिते क्लीबे च पतिते पतौ'

अशा आपत्तींत अथवा नुसते पटत नाही एवढ्या सबबीवर देखील तिला वेगळे होता येते किंवा द्वितीय सबध करण्यास मुभा असते. गावातील पचां-पुढे जाऊन तिने आपले गाऱ्हाणे सागावे आणि पचाची खात्री पटली की,

ती आपली मोकळी! ‘ काडी ’ मोडण्याचा हा इतका ब्रह्मदेशातला साधा विधि आणि युरोपियन राष्ट्रातील घटस्फोटाचा कायदा यावरून स्त्रियाना कोणत्या समाजात स्वातन्त्र्य अधिक आहे ते स्पष्ट होईल. विवाहकालचे समारभ किवा नतरचे थोडेफार सोहाळे, यावर हिंदु चालीरीतीची छाप पडलेली दिसते. याचे कारण मणिपुराकडील ब्राह्मणानी आपणासाठी ब्रह्मी समाजात स्थान प्राप्त करून घेतले हे होय. ब्रह्मी राजाने मणिपुराकडून काही ब्राह्मण ‘ गुलाम ’ म्हणून आणले. पण ते गुलाम म्हणून न राहता हळूहळू ब्रह्मी प्रजेलाच त्यानी आपल्या कह्यात घेतले. त्याना ‘ पोन्ना ’ किंवा ‘ बेदिंगसाया ’* असे म्हणतात. नामकरण, ‘ व्रतबध ’ अथवा विवाह अशा समारभप्रसगी ‘ पोन्ना ’ला बोलावलेच पाहिजे, अशी भाविक लोकाची समजूत आहे. आणि अजून देखील श्रद्धावान् समाजात अशा ब्राह्मणाचे प्रस्थ थोडेफार दिसते. अस्तु.

विवाहोत्तर दोन तीन वर्षेपर्यंत जामात श्वशुरगृहीच राहतात. तात्पुरता घरजावईच असा तो समजावा. नतर जरूर तर वेगळे बिऱ्हाड करता येते. पण हल्ली व्यवसायानिमित्त एका कुटुबात एके ठिकाणी सर्वांना राहता येणे शक्य नसते. म्हणून लग्न होताच स्वतत्र बिऱ्हाड थाटण्याची चाल परिस्थिती-मुळेच रूढ होत आहे. मात्र एक विचित्र चाल अजून पूर्ववत् तशीच चालू आहे. विवाहासाठी नवरदेव आपल्या भावी पत्नीच्या घरी जाऊ लागले म्हणजे गावातील काही वात्रट मुलें त्याच्या वाटेत एक सोनेरी दोरी बाधतात, आणि ती तोडून पुढे जाण्यास नवरदेव धजत नाही. कारण कदाचित् लग्न अपेशी ठरेल अशी भीति त्याला वाटते. ‘ आम्हाला पेढ्यासाठी पैसे द्या म्हणजे वाट मोकळी करतो ’ असा त्या मुलाचा आग्रह असतो. एका दृष्टीने ‘ मिष्टान्नमितरे जनाः ’ पैकीच हा प्रकार! पोटभर खाऊ घातले किंवा घालण्याचे वचन दिले की, नवरदेवाचा मार्ग मोकळा होतो.

असाच दुसरा प्रकार ब्रह्मदेशात इतर ठिकाणी होतो. विवाहोत्तर वधूवर ज्या घरात राहतात, त्यावर दगडाचा भडिमार करून त्याना एकात लाभू द्याव-याचा नाही, हा उद्देश उभयपक्षाच्या स्नेह्यासोबत्याचा असतो. दोघाच्याही

---

* बेदिंग + साया म्हणजे वेदांग + पडित. साया = पडित

सुदैवाने ( किंवा दुर्दैवाने ) हा त्रास फक्त पहिल्याच रात्री देतात. त्यात दगड कोणाला लागतील, जखम कोणाला होईल इत्यादि दूरवरचे विचार त्यांच्या डोक्यात येतच नाहीत. ही दगडाची वृष्टि थांबविण्यास उपाय एकच. 'बाबानो, हे घ्या १०-१२ रुपये, पुरे करा एकदाची कटकट' असे म्हटलें आणि मित्रांना मनोवाञ्छित रक्कम मिळाली तर त्या युगुलाला स्वास्थ्य लाभते! नाही तर इस्पितळात जाऊन पडण्यापर्यंतही पाळी येते!

ब्रह्मी स्त्रियांची सौंदर्याची कल्पना जरा वेगळी असावी असे दिसते. आपला केतकीवर्ण टिकून रहावा किंवा चेहरा तुळतुळीत असावा म्हणून त्या एक प्रकारच्या झाडाच्या सालीची वस्त्रगाळ पूड सकाळी व संध्याकाळी तोंडावर फासून घेतात. वसंतपूजेच्या वेळी ब्राह्मण हातातोंडावर केशरी गंध चोपडतात किंवा चैत्रातील हळदीकुंकवाचे समारंभात आपल्याकडे बायकांच्या हातांना गंध लावून ते खरखरीत शिंपानी विरल व सारखें करतात, तशासारखाच पण त्याहून अगदी भिन्न असा हा मुद्रासाहित्याचा प्रकार आहे. 'पिवळे भस्म' तोंडाला लावल्याप्रमाणे ब्रह्मी बायका दिसतात, पण भस्म सुकल्यानंतर आपोआपच कमी कमी होते—ते उडून जाते—तसे पिवळ्या पुडीचे नाही. ती तासन् तास चेहऱ्यावर तशीच बसते. आणि ती लावून समाजात वावरणे म्हणजे काही विचित्र चाल नव्हे, अशाचप्रमाणे ब्रह्मी बायका वागतात. सौंदर्य वाढविण्यासाठी काही काळ आपण विरूप दिसलो म्हणून बिघडत नाही असे त्यांना वाटते. लहान मुलीपासून आजीबाईपर्यंत सुद्धा या पीतगंधाचा उपयोग सर्वजणी करतात. त्यांचा पोषाख पाहिला तर सुटसुटीत पण मोहक असतो. स्त्रियांना सोईचा असा दुसरा पोषाख, गरिबीच्या अडचणी लक्षात घेतल्या तर, आढळणार नाही. आपल्या इकडे वस्त्रान्तर करताना किंवा स्नान करताना आडोसा नसल्याने स्त्रियांची फार पंचाईत होते. पण ब्रह्मी स्त्रियांच्या पोषाखाने ही अडचण दूर केली आहे. भर रस्त्यावर स्नान किंवा वस्त्रान्तर करण्यास ब्रह्मी स्त्रियांना कसली भीति वाटत नाही. यावरून त्या निर्ढावल्या आहेत असे नव्हे, तर त्यांच्या वस्त्राची योजनाच अशी आहे की, आडोशाची आवश्यकताच त्यांना भासत नाही.

स्त्रीपुरुषांच्या वस्त्रास 'लुंगी' असे म्हणतात. कासोटा घातल्याशिवायच लुंगी परकराप्रमाणे नेसावयाची असते. ती धोतरासारखी गुंडाळता येत नाही.

तिचीं दोन्ही टोकें एकत्र शिवलेली असल्याने डोक्यावरून अथवा पायाकडून तींत आपण शिरावे लागते. साधारणपणे दोन वार लांबीचे हे वस्त्र असते. पण ते दुहेरी असल्याने एकूण चार वार कापडात एक लुगी होते. पुरुषाच्या व बायकांच्या लुगीत थोडासा फरक असतो. मात्र नेसण्याच्या पद्धतीवरून स्त्रीपुरुष हा भेद चटकन् कळतो. विशेषत: लहान मुलामुलीच्या बाबतीत लिंगभेद ओळखण्याची अतिशयच पंचाईत पडते. पण लुगी नेसण्याच्या पद्धतीने ते कोडे सोडविण्यास अडचण नसते. केस डोक्यावर मध्यभागी बाधता यावेत म्हणून लहानपणी त्याची थोडी निगा राखावी लागते. आजूबाजूच्या केसाना कात्री लावणे तर क्रमप्राप्तच होते. परतु केशकर्तनाविषयी त्याना काहीच वाईट वाटत नाही, म्हणून बालपणी अनवश्यक केस कापणे आवश्यक होते आणि म्हणून मस्तकभूषणामुळे हा मुलगा की मुलगी असा सदेह पुष्कळ वेळा पडतो. स्त्रियाच्या बाबतीतही उरोभाग उन्नत असणे कुरूपतेचे लक्षण समजत असल्याने लहानपणापासूनच वक्षःस्थळाभोवती तग पट्टा बाधलेला असून वर ‘ इजी ’ घालतात. स्त्रियाची इजी म्हणजे लाब हाताचे पोलकेच म्हणता येईल. ती इजी बहुधा पाढऱ्या रगाची असते; आणि इजीवर दुसरे कसलेही वस्त्र घेण्याची चाल ब्रह्मदेशीय ललनात नाही. लुगी व इजी या दोनच कपड्यात त्याचे काम भागते. लुगी नेसून चालण्यात स्त्रियाना बरेच कौशल्य सपादन करावे लागते. म्हणून ब्रह्मी महिला चालताना फारच मोहक दिसतात. पायावर किंवा इतर कोठल्याही भागावर वस्त्राची सुरकुती येत नाही. लुगीची टोके दोन्हीकडे खोवली म्हणजे झाले, अशी स्त्रियाची रीत आहे. पुरुषाच्या लुगीची दीड घडी ( निरी ) मध्यभागी येते. आणि त्यावरूनच स्त्रीपुरुष ओळखता येतात. पादत्राण वापरण्यात काटकसर आहे का चिक्कूपणाचे ते लक्षण मानावे, हे समजणे कठीण होईल. लाकडी खडावा तिकडे सर्रास वापरतात. मात्र ‘ आंगठ्या ’ऐवजी पायाचा पुढला भाग अडकविण्यासाठी आडवी पट्टी किंवा जोड्यासारखे आवरण असते. पण त्यात फक्त दोनच बोटे घालून ब्रह्मी स्त्रिया इतक्या चपळाईने जातात की, त्याच्या त्या सर्व हालचालीकडे सारखे पाहत बसावेसे वाटते! आणि तिकडे नवीन गेलेल्या मनुष्याचे तर न कळत तसे होते हे सागावयास पाहिजेच असें नाही.

सर्वसाधारणपणे ब्रह्मी स्त्रीला ‘ मा ’ म्हणतात. तीच जरा पोक्त झाली की ‘ मे ’ म्हणून तिला संबोधतात. म्हणून नवयुवतींना ‘ मे ’ म्हटल्यास त्यांना राग यावयाचा. कारण त्यांना ‘ मि ’ म्हणतात. पण ‘ मिमि ’ असे दोनदा म्हणण्याचा मान विवक्षित व्यक्तीलाच असतो. प्राणप्रियाने प्रियेला मिमि म्हणावयाचे व ‘ तिने ’ याला ‘ मॉग ’ म्हणून हाक मारावयाची असा शिरस्ता आहे. कोणी कोणी ‘ मॉग ’ न म्हणता ‘ शी ’ असेही संबोधतात. ब्रह्मी स्त्री प्रेमळ तर असतेच, पण विशेषतः आपल्या मोकळ्या व उदार मनाच्या वागणुकीने ती आपली छाप बसविते. तिचे मन मोठे असले तरी ‘ सवती ’ला त्यात थारा मुळीच मिळावयाचा नाही. बहुपत्नीकत्व धर्मशास्त्राने मान्य केले आहे खरे, पण ब्रह्मी गृहिणीचा गृहस्थावर इतका ताबा असतो की, त्याची सहसा द्वितीय संबंध करण्याची छाती होत नाही. घटस्फोट झाल्यानंतर अथवा विधुरावस्थेत त्याला बंदी कोण करू शकणार? पण जन्मसिद्ध हक्क न बजावणारीच पुरुष मंडळी ब्रह्मदेशांत अधिक दिसतात. कारण बहुपत्नीक असा इसम क्वचितच आढळतो. घरकामात आणि व्यापारी देवघेवीत देखील ब्रह्मी स्त्रियाच प्रमुख असल्याने त्यांचे शिक्षण फार झाले असावे असे वाटते. परंतु ब्रह्मी समाजरचनेमुळे सर्वत्रच साक्षरता असली तरी सुशिक्षित स्त्रिया तितक्याशा नाहीत. पण नुसती अक्षरओळख तरी कमी कशी म्हणावी? हिंदुस्थानात दर हजारात फक्त तेवीस स्त्रिया साक्षर सापडतात. तर ब्रह्मदेशात त्याच्या **पांचपटीहून अधिक** म्हणजे **सवाशे** स्त्रिया साक्षर आहेत. पुरुषाचीही गोष्ट तशीच. हिंदुस्थानात दरहजारी १६१ इसम साक्षर आहेत. पण ब्रह्मदेशात ५७६ निघतात! हा फरक का पडतो व ब्रह्मी शिक्षणपद्धति कसली आहे हे पुढे कळेलच. ब्रह्मी स्त्री साक्षर असली तरी तिची देवावरील भक्ति, भूतसमंधाची भीति, नॅटवरची श्रद्धा किंवा ताईत, तोडगे अथवा गोंदून घेणे यावरील विश्वास मुळीच ढळला नाही. फुंजी दिसला की ती अगदी भाविकपणे गुडघे टेकून त्याला वंदन करील, दोन्ही अष्टम्या, पौर्णिमा आणि अमावास्या या दिवशी न चुकता जवळच्या पॅगोडाला जाईल, मेणबत्त्या जाळणे, छत्र्या दान करणे किंवा फुले वाहणे ही पूजाकर्मे अगदी यथासांग करील. गोंदून घेण्याचे बाबतींत स्त्रियांची एक मौजेची समजूत आहे. ब्रह्मी पुरुष नाभी-

पासून खाली गुडघ्यापर्यंतचा सर्व भाग गोंदवून घेत असले तरी स्त्रिया सहसा गोंदून घेत नाहीत. काही रानटी जातीत मात्र स्त्रियाच्या तोंडावर गोंदण्याची चाल आज आहे. पण एकमेकाच्या बायका पळविण्यात कसलाच विधि-निषेध न वाटणाऱ्या काळात, परीट कपड्यावर खुणा करतो तशा, बायका हुडकून काढण्यासही काही तरी खुणा लागत, आणि म्हणून तोंडावर गोद-ण्याची चाल पडली असावी. असो. इतर ठिकाणच्या स्त्रिया गोदण्याचा उपयोग अगदी निर्वाणीचा उपाय म्हणून करतात आणि तो उपाय

'कधि करिशी लग्न माझे तुज ठावे ईश्वरा'

या अवस्थेतील मुली योजतात. लग्न लवकर व्हावे असे वाटले किंवा अमुकच इसम आपणास हवा अशी इच्छा असली तर गोल ठिपके देऊन एक त्रिकोण काढून घ्यावयाचा, अशी ब्रह्मी युवतींची रीत आहे. होता होईल तो हे गोदणे सहसा न दिसेल अशाच भागावर करतात. परंतु अशा सर्व बाबतीत सल्लामसलत देणारा 'साया' (पंडित) असतो. तो कधी ओठावर तर केव्हा जिभेवरसुद्धा गोदून घेण्यास भाग पाडतो. युवकाना सुद्धा अशा गोदण्याने इच्छितप्राप्ति होते. वशीकरणाचाच हा एक गावठी प्रकार आहे की काय कोण जाणे.

ब्रह्मी स्त्रीजीवन इतके विस्ताराने सांगितल्यावर, त्याना धूम्रपानाची मोकळीक आहे, समाजात समान दर्जा आहे, इत्यादि पुनः सांगण्याची आवश्यकता नाही. त्याच्यात दोष असेल तर तो एकच. त्या स्वदेश सोडून सहसा बाहेर जाण्यास तयार नसतात. प्रेमळपणा, माहेरची ओढ आणि धार्मिक समजुतीचा जबर पगडा इत्यादिकामुळे अद्यापि पश्चिम दिशेकडे त्याची दृष्टि गेली नाही असे दिसते. मात्र सौंदर्य टिकविण्यात आणि ते वाढविण्यात त्या निसर्गतःच तरबेज असतात. कपड्याची स्वच्छता, नीट-नेटका पोषाख, व्यवस्थित केशभूषा इत्यादिकाकडे त्या विशेष लक्ष देतात. परके-पणा असा त्याना कोणाबद्दलच वाटत नाही. बौद्धधर्माच्या शिकवणीने त्याचे अंतःकरण खरोखरच उदार करून ठेवले आहे. म्हणून 'ही काळी बाई, हिच्याशी मी कशी बोलू?' अशी शंका देखील तिच्या मनांत येत नाही. याच कारणासाठी हिंदी मुसलमानाशी किंवा खिश्चनाशी लग्न करण्यास ब्रह्मी स्त्रिया तयार होत असाव्या. असो.

ब्रह्मी समाजातील दोन मोठे गुण घेण्यासारखे असतील तर त्याची चौगपद्धति आणि फुजींचे अधिष्ठान. बुद्धविहार किंवा ' गाव देऊळ ' म्हणजे चोग (Kyaung) होय. लहानसे का खेडे असेना तेथे चोग असावयाचेच. त्या चौगमध्ये बुद्धाची मूर्ति ठेवून पूजेअर्चेची सोय तर असतेच, पण पाथस्थाची राहण्याची व्यवस्था तेथे होऊ शकते. शिवाय फुजी–धर्मोपदेशक–तेथे राहतात व विद्यादानाचे महत्त्वाचे कार्य करतात चोगमधील शाळा मोफत असतात. आणि लोकात प्रसृत असलेल्या धार्मिक समजुतीप्रमाणे बहुतेकजण शाळेत दोन तीन वर्षे तरी मुलामुलींना पाठवितातच. चोगमध्ये राहणारे फुजी ' मधुकरी ' मागून निर्वाह करितात. आणि काही गरीब विद्यार्थीही त्याच मधुकरीत आपले भोजन उरकतात मात्र सूर्योदयापूर्वी ठराविक प्रकारच्या भाड्यात मधुकरी आणावी लागते नतर पुनः ' भिक्षा देहि ' करावयास जावयाचे नसते. शाळेत मुले दोन रांगा करूनच असतात, पण त्यानी नीट बसलेच पाहिजे असा नियम नाही. उलट, आडवा पोटावर पडूनच प्रत्येकजण अभ्यास करताना दिसतो. तसेच शाळेत गोंगाटाला महत्त्व अधिक. चीनमधील शाळांचा हा संस्कार असावा. छापील मूळाक्षरे अथवा ' लाकडी पाट्या ' विद्यार्थी वापरतात त्याचे शिक्षक म्हणजे पीतवस्त्रधारी फुजी. फुजी होणे हा प्रत्येक पुरुषाचा धर्म आहे म्हणजे आयुष्यात प्रत्येकाने निदान चार महिने तरी पीतवस्त्र धारण करून शास्त्रातील कडक नियमानुसार आचरण केले पाहिजे. पूर्वी अर्थातच ही मुदत अधिक होती. पण हल्ली ती चार महिन्यावर येऊन ठेपली आहे. साधारणपणे मुलगा जाणतानेणता झाला म्हणजे तो फुजीची दीक्षा घेतो. आपल्याकडे मुंजीला जितके महत्त्व तितकेच ब्रह्मी फुजी बनण्याच्या समारंभाला देतात. हा समारंभ थोडासा वेगळा आहे. आधी शक्य तितका डामडौल करून त्या मुलाची मिरवणूक काढली, आप्तेष्टांना मिष्टान्न चारले, म्हणजे मग मुंज्या मुलाला नवे कपडे देऊन त्याची ' शेंडी ' काढतात आणि संन्याशाच्या डोक्याप्रमाणे सर्व शीर्षभाग तुळतुळीत करतात. फुजी बनल्यानतर विलासाना आणि भोगाना रजा द्यावयाची असते. इतर वेळी चित्रविचित्र रंगाच्या लुंग्या नेसणारे हे लोक फुजी झाले की, फक्त पिवळे वस्त्र आंगावर घेतात आणि कमरेभोवती गुडाळतात. शिरस्त्राण असे ब्रह्मी जनतेत नसतेच. एक गुलाबी रेशमी रुमाल–हातरुमालाएवढा–

डोक्याला बांधण्याची चाल ब्रह्मी पुरुषांत आहे. पण अलीकडे शिरस्त्राण-विरहित जाण्याचा पंथ आपणाकडे बोकाळला आहे, तसाच तिकडेही थोडा फार वाढलेला दिसतो. फुजींना मात्र मस्तक उघडे ठेवूनच जावे लागते. आधीच ब्रह्मी पुरुषांचे व ' कचा 'चे वाकडे. म्हणजे त्यांच्या डोक्यावर फार केस उगवतच नाहीत. कदाचित् ते बायकांना नेहमी डोक्यावर बसवून घेतात म्हणून ही प्रतिक्रिया झालेली असेल. पण ब्रह्मी पुरुषांना मिशा जवळजवळ नसतातच, असे म्हणण्यात अतिशयोक्ति नाही. त्यामुळे सर्वांनी आधुनिक पद्धतीचे प्रतिदिनक्षौर अवलंबिले असावे अशीच कल्पना होते. म्हणून फुजी झाल्यावर संन्यासी डोके करवावयाचे म्हणजे त्यांना विशेष हाल वाटत नसावेत. फुजींनी पाळावयाचे नियम इतके कडक आहेत की, त्यांची चेष्टा करावी असाही मोह एखादे वेळी व्हावयाचा विशेषत: स्त्रियांचे बाबतीत फुजींची अनुदार दृष्टि, ब्रह्मी उदार समाजव्यवस्थेत, विरोधानेच अधिक टीकास्पद होते. फुजींजवळ वस्त्रें, ' कमंडलु ', भिक्षापात्र ही जशी ठराविक आयुधे असावयाची, तसाच एक ताडपत्राचा पंखाही असतो. त्याचा उपयोग वारा घेण्यासाठी नसून कोठल्याही समुदायात स्त्रिया आलेल्या असल्या तर त्यांचेकडे दृष्टि जाऊ नये म्हणून स्वतःचे तोंडापुढे धरण्यासाठी करतात ! पुष्पबाणाचा हल्ला परतविण्यासाठी ' ढाल ' म्हणून हे ' मोले उणे व्यजन पुढारी ' धरतात. पण हे ' पंचशर ' कसल्याच ढालीला दाद देत नाहीत व ' अनंग ' राहून देखील तो मदन त्रिभुवनविजयी होतो, हे बिचाऱ्या फुजींना कळत नाही ! सकाळी मधुकरीला जावयाचे तेव्हा भिक्षा स्त्रीने घातलेली चालावयाची नाही. इतकेच काय, पण एका होडीत कोणी स्त्री इतर मुशाफरासमवेत असेल तर फुजीला त्याच वेळीं त्या होडीतून प्रवास करता यावयाचा नाही. हल्ली आगगाडीचा प्रसार तिकडे झालेला आहे आणि बायकांसाठी एक डबा खास राखलेलाही असतो. तेव्हा फुजी त्या गाडीतून प्रवास करतात की नाही हे समजणे कठीण आहे. कदाचित् त्यांनी काही तोड काढली असावी. कुटुंबीयात राहणे हे तर फुजीला वर्ज्यच असते !

दुसरी अशी एक गमत ' दक्षिणे 'संबंधाने होते. पीतवस्त्रधाऱ्याने सुवर्ण किंवा रौप्य यांना स्पर्शही करू नये, अशी पूर्वापार चालत आलेली आज्ञा. तिचा मूळ हेतु असा की, द्रव्याचा अभिलाष त्यांनी धरू नये किंवा धन-

संचयही त्यानी करू नये. पण अलीकडे कांही कांही फुजी पहावे तो नोटाची पुडकीं वेदिक्तपणे जवळ बाळगतात किंवा कोणा भाविकाकडून सुवर्ण वा रौप्यदान स्वीकारावयाचे झाल्यास त्या मौल्यवान् धातूचा ' स्पर्श ' आपणास होऊ नये म्हणून ते हातावर एकादे फडके पसरतात. त्यावर कोणतेही नाणे टाकले म्हणजे फुजीला विटाळ होत नाही!* तशीच गोष्ट भोजनाविषयी आहे. फुजीनी मध्यान्हानतर अन्नग्रहण करावयाचे नाही अशी शास्त्राज्ञा असता भुकेने व्याकुळ झालेले हे बुद्धानुयायी घड्याळाकडे किंवा सूर्याकडे न पाहता आपल्या शेजारच्या भिक्षूस विचारतात, ' काय रे, अद्यापि बारा वाजले नाहीत ना? ' यावर तो उत्तरतो, ' छे, अजून अर्धा पाऊण तास सहज अवकाश आहे.' ' तेवढ्यांत दोन घास खाऊ या चल बघू! '

फुजीच्या जेवणातही धर्मशास्त्राच्या आज्ञा आडव्या येतातच. जेणेकरून केवळ शरीरपोषण होईल इतकेच साधे अन्न ( स्निग्ध पदार्थ वर्ज्य करून ) त्यानी खावयाचे असते. इतर ब्रह्मी बौद्धधर्मी असले तरी मासाहारी आहेत. त्याना कसलाच विधिनिषेध नसतो. परतु भात किंवा शेवया याच्या जोडीला कांदे व वाळलेली लसूण त्याच्या स्वयपाकात मनस्वी असते तसेच कोवळ्या बाबूचे ताजे कोंब, आंब्याचा, चिंचेचा किंवा तसलाच कोवळा पालाही पुष्कळच खातात. ह्या कोवळ्या पाल्याची त्याची हौस इतकी दाडगी आहे की, चहा सुद्धा ते हिरवाच खातात! गुडाखूची किंवा चिंचेची ओली रास दुकानात इकडं आपण पाहतो तशीच मोठी रास ब्रह्मी दुकानात ओल्या चहाची दिसते. आणि तो चहा चघळत राहण्याचीही सवय फैलावली आहे. आपण काही चागले जिन्नस ( लाडू, करज्या, पुरणपोळ्या ) इष्टमित्राकडे पाठवितो, तसाच समारभानिमित्त हिरवा चहा पाठविण्याची ब्रह्मी लोकाची चाल आहे. चहा पिण्याचे निरानेराळे प्रकार आपण ऐकले होते व काही तर प्रत्यक्ष पाहून किळस येण्यापर्यंत पाळी आली होती. पण त्या सर्वांवर ताण करणारी रीत म्हणजे हिरवा चहा चघळत राहण्याची होय! म्हणजे कपबशीतून चहा पीत नाहीत असे नाही. ती फॅशन ब्रह्मदेशात रूढ झालीच

---

* विठाईच्या घराची ' पायरी चढणार नाही ' अशी शपथ घेतलेल्या बगभटासारखीच ही अवस्था म्हणावी.

आहे. एका कपाने त्यांचें भागत नाही. त्यांना सबंध किटलीच लागते. आणि दुधाशिवाय बहुधा सामान्य लोक चहा पितात. अस्तु.

भोजनसमयी सर्व मडळी एकदम बसतात. मात्र एका पात्रांत त्यांचे भोजन होत नाही. मध्यभागी सर्व अन्न ठेवलेले असून त्यांतून प्रत्येकाने पाहिजे तसें आपल्या 'ताटलीं'त काढून घ्यावे अशी साधारण रीत असते. जेवतांना पाणी प्यावयाचे नाही असा जसा काही त्याचा पणच दिसतो. भोजनोत्तर मात्र पाणी पितात. तेथे भाडे एकच असते आणि त्यावर सर्वांचें काम भागतें. या बाबतीत ब्रह्मी जनतेने इस्लामानुयायाचे अनुकरण केलें असे म्हणावें तर ब्रह्मी लोकांचा बुद्धधर्म पैगबरापेक्षाही जुना. ठिकठिकाणी पाणी पिण्यासाठी कोणी धर्मात्मा दोनचार मडकी ठेवण्याची व्यवस्था करतो. त्यालाच साखळीने एक भाडे बाधलेले असते आणि त्याने येणाराजाणारानी खुशाल पाणी प्यावे व पाणी ठेवणाराला दुवा द्यावा. आमच्या कडील धर्ममार्तंड कोणी तिकडे गेले तर मात्र भ्रष्टाकार करणाऱ्या ह्या लोकोपयोगी जलस्थानाचा त्याना सताप येईल आणि ज्यानी ते ठेवले असेल त्याचा ते उद्धार केल्याविना राहणार नाहीत. असो. भोजनोत्तर मुख्य कार्यक्रम चिरूट फुंकण्याचा. त्यातही जेवणाप्रमाणे सर्व मडळी मोकळेपणाने भाग घेतात. मूल स्वतःच्या पायावर उभे राहू लागले ( अर्थ शब्दशः घ्यावयाचा ) म्हणजे त्याला चिरूट ओढण्यास मुभा मिळते. मग समोर बाप असो किंवा बापाचा बाप असो. स्त्रीपुरुष हा भेदाभेद न बाळगता चिरूट ओढावयाचा हीच तेथली चाल! हे चिरूट लाब म्हणजे निदान वीतभर असतात. गोल असा हा चिरूट ओठात धरला म्हणजे आधीच विचित्र दिसणारे ब्रह्मी लोक अधिक विचित्र दिसू लागतात आणि धूर सोडीत बोलण्याने त्यांची आधीचीच बोबडी भाषा अधिकच बोबडी होते. हे चिरूट घरोघर करतात. किंबहुना चिरूट वळतां येत नाहीत अशा मुलीचें लग्न होतच नाही असें समजावें! इतकी धूम्रसमिधा तयार करण्याची चाल घरगुती झालेली आहे. मात्र समाधानाची बाब इतकीच की ह्या चिरूटांत तबाखूच भरलेली नसते. तंबाखूच्या जोडीस एक प्रकारच्या लाकडाचे बारीक तुकडे, त्यांवर साखरेचें पाणी दिलेले असे असतात आणि त्यामुळे चिरूट मोठा असतो किंवा मुलें देखील तो ओढतात, एवढ्यानेच घाबरण्याचें कारण नाही. कांही झालें



चोगमधील फुंर्जी, शिक्षक व विद्यार्थी

तरी चिरूट तो चिरूटच! चिरूट तोंडात धरून सर्व कौटुंबीय मंडळी गप्पागोष्टी करीत बराच वेळ बसतात आणि मग विडा चघळण्यास घेतात. कारण विडा खाण्याचे व्यसन ब्रह्मदेशात बरेच फैलावले आहे. फुंजी विडा खाताना सहसा दिसत नाहीत, पण चिरूट ओढताना मात्र ते बरेच वेळा आढळतात.

धर्माध्यक्ष म्हणून हे पीतवस्त्रधारी सर्वत्र मानले जातात. तात्पुरते 'फुंजी' बनणारे नागरिक वेगळे आणि कायमचा सन्यास घेतलेले निराळे असतात. आपल्या आयुष्यातील काही काळ धर्मकारणी लागावा असे वाटणारे अधूनमधून 'फुंजी' बनून चोंगमध्ये जाऊन भिक्षावृत्तीने राहतात. पण अशाना मान कमीच असावयाचा नित्य फुंजी आणि नैमित्तिक फुंजी असे पाहिजे तर दोन विभाग कल्पावे. समाजात जाती किंवा दुसरी उच्चनीच वर्ग दर्शविणारी व्यवस्था ब्रह्मदेशात नसली तरी सर्वापेक्षा फुंजी श्रेष्ठ हे मात्र सर्वत्र खरं आहे. फुंजीच्या गुणावरून किंवा अंगच्या करामतीवरून आणि सन्यासकालावरून त्याच्या पायऱ्या ठरविल्या आहेत. त्या सर्व फुंजीचा मुख्य म्हणजे 'राजगुरु' व तो नेहमीच राजधानीत रहावयाचा. पण हल्ली राजा नसल्याने ही परंपरा तुटली असे झाले नाही. मुख्य फुंजी मंडाले येथे राहून सर्वदेशीय धार्मिक चळवळींवर देखरेख करितो. फुंजीच्या अंगी नसलेलेही कित्येक गुण ब्रह्मी भक्तांनी त्याना चिकटविले असल्याने फुंजी हा त्या समाजात आवश्यक असा घटक होऊन राहिला आहे. एक वेळ आमच्या समाजातील भटजींचे वर्चस्व कमी होईल किंवा भटजीबुवाशिवाय आमची सर्व कार्ये पार पडू शकतील, पण ब्रह्मी भक्तांचे तसे व्हावयाचे नाही. कित्येक जरूरीच्या तर काही अनवश्यक अशाही बाबतीत '**फुंजीवचनं प्रमाणम्**' अशी स्थिति तेथे आहे. आमच्याकडे भटजीचा वर्ग म्हणून जो आहे त्याची आवश्यकता केवळ धार्मिक विधीपुरतीच असल्याने त्याची एवढी मातब्बरी नाही. यद्यपि राजकारणात किंवा सार्वजनिक चळवळीत 'बामणा'चीच भरती दिसते, तत्रापि हे 'चळवळे' ब्राह्मण आणि धार्मिक कार्यांचा मक्ता असलेले भटजी (तेही ब्राह्मणच, हे खरे) एक नव्हत. त्याचे दोन वेगवेगळे गट आहेत. म्हणूनच पारमार्थिक लाभ साधून देणारे 'दलाल' भटजी व ऐहिक जगाच्या भानगडीत समाजाचे नेतृत्व पत्करणारे पुढारी याच्यामध्ये ऐहिकानाच महत्त्व द्यावे लागेल. आणि समाज ते तसे देत

असल्याचे दिसतेही. परंतु ब्रह्मी धर्मगुरूंनी ऐहिक व पारमार्थिक अशी कार्यांची फारकत होऊच दिली नाही. पारमार्थिक हिताच्या गोष्टी बोलणारे संन्यासीच आज ब्रह्मदेशात प्रमुख पुढारी असून राजकारणात त्यांचे महत्त्व मुळीच कमी नसते त्यांना संन्यासी म्हणून म्हणता येते. मात्र त्यांची वस्त्रे भगवी नसून पिवळीं असतात. नाही तर असे म्हणता आले असते की, भगवी वस्त्रे संन्यासनिदर्शक जशी आहेत, तशीच राजकारणी आखाड्यातील 'लाल' मातीचीही ती सूचक का मानू नयेत? धर्म व राजकारण एक करावी की नाही—ती एक होणे कसे शक्य आहे? इत्यादि वितंडवाद हल्लीच्या परिस्थितीत पुष्कळ निघाले आहेत. आणि ब्रह्मदेशीय समाजस्थितीत त्या प्रश्नाचे व्यावहारिक उत्तर आढळते, असे म्हणण्यास प्रत्यवाय नाही. मात्र इतके खरे की, ह्या धर्मगुरूंना थोडे अधिक शिक्षण असते किंवा त्यांनी बाह्य जगाशी किंचित् जरी संबंध ठेवला असता तरी आधुनिक जगातील कितीही पराक्रमी व शस्त्रास्त्रसंपन्न राष्ट्राला पुरून उरण्याची धमक त्यांनी आपल्या राष्ट्रात उत्पन्न केली असती. खेदाची गोष्ट एवढीच की, आजमितीस तुटपुंज्या ज्ञानाचे धर्मगुरु, राजकारणात बरेच उच्च स्थान पटकावून बसले आहेत. नाही तर ब्रह्मदेशविभागणीस खरा विरोध तावडतोबच करून गोलमेज परिषदेच्या ठरावाचा धुव्वा उडविणे त्यांना काही कठीण नव्हते. ब्रह्मी 'गोत्या'च्या पण 'इन्नेस' शास्त्रीय प्रतिनिधींचीच निवडणूक मंडलाकार परिषदेसाठी झाली तेव्हा, किंवा ती मंडळी विलायतेस गेली तेव्हा, ब्रह्मदेशातील खरेखुरे पुढारी ( म्हणजे विभागणीविरुद्ध पक्ष ) अगदी झोपल्यासारखे वागले. आणि आता ब्रह्मदेशाविषयी निर्णय लंडनमध्ये पोट-कमिटीने ठरविला, तेव्हा त्यांनी विरोधाची तार पाठविली. नंतर सभा केल्या. असो हे सांगण्याचा मथितार्थ इतकाच की, समाजातील अनुपमेय स्थान फुंजींना लाधलेलें आहे, त्याचा भरपूर फायदा घेण्यास लागणारे ज्ञान त्यांचे अंगी नाही. परंतु बदलत्या परिस्थितीतसुद्धा आपणावरील जबाबदारी ओळखून फुंजींनी राजकारणात भाग घेण्याचे जे व्यवहार्यचातुर्य दाखविले त्याबद्दल त्यांना खरोखर धन्यवाद दिले पाहिजेत. धर्मांशाचा अर्थ नीट लावण्यास देखील नुसत्या भाषाज्ञानापेक्षा अधिक शहाणपणाची जरूरी असते व ती जुन्या कल्पनांनाच कवटाळून बसणारांना बहुधा नसते, असे आपणास दिसून येते. तसे ब्रह्म-

देशात घडले नाही, ही त्या समाजाची कार्यक्षमताच म्हणावयास काय हरकत आहे?

फुजीची ही परपरा आजतागायत चालू शकली, याबद्दलचे श्रेय एकट्या पीतवस्त्रधारी जनासच देता येत नाही. ब्रह्मी जनतेकडे त्या श्रेयप्राप्तीचा अर्धा वाटा जातो. कारण जनतेने अशा धार्मिक पुरुषास पोसण्याचे नाकारले असते तर त्याच्या हातून झाली ती कामगिरी कशी घडली असती? आज देखील ब्रह्मदेशात लोकाची दानधर्माकडेच अधिक प्रवृत्ति आहे. आपण पैशाची पुरचुडी बाळगून ठेवावी, किंवा 'मरावे परी मुर्तिरूपे उरावे' अशा प्रकारची विचारसरणी ब्रह्मी समाजात रुजतच नाही असे दिसते. आपणास काही पैसे मिळाले किंवा लभ्याश झाला तर लगेच त्यातील बराचसा भाग एखाद्या चोगन्या व्यवस्थेसाठी देऊन टाकतात. नाहीतर पॅगोडावर घटा लावण्यात, मूर्ति उभारण्यात अथवा वाटेत पायस्थाना पिण्यासाठी पाण्याची व्यवस्था करण्यात खर्च करण्याची पद्धत आहे. कौटुबिक सुखापेक्षा सार्वजनिक हिताकडेच त्याची दृष्टि अधिक दिसते. कदाचित् पूर्ण विचारान्तीच हे वर्तन त्याचे हातून घडत असावे, अथवा केवळ वाडवडिलानी केले तसेच आपण करावे ह्या अधश्रद्धेने, इष्टानिष्ट विचार न करतामुद्धा, त्याचे हातून असला 'परोपकार' होत असेल. पण त्याची ही वृत्ति आहे यात सशय नाही. 'सावकार' अशा अर्थाचा शब्दच ब्रह्मी भाषेत नाही आणि ब्रह्मी समाजरचनेतही त्याला स्थान नाही. म्हणून ब्रह्मदेशात सावकारीचा प्रवेश हिंदुस्थानशी तो निगडित झाल्यापासूनच झाला आणि मद्रास इलाख्यातील 'चेट्टी,' 'दक्षिणार्थे भिक्षुकगण पळत सूटला' तसे सावकारी करण्यासाठी तिकडे धावले. ब्रह्मदेशात चेट्टींचे भाडवल किती आहे याची कल्पना मागे दिलीच आहे, परतु त्याचा प्रसार कसा सार्वत्रिक झाला आहे याची प्रचीती पटण्यास इतकेच सागावयास पाहिजे की, कोठल्याही गावापासून जास्तीत जास्त म्हणजे एका दिवसाच्या मजलीत कोणा ना कोणा तरी चेट्टीचे घर सापडलेच पाहिजे! आपल्याकडे मारवाड्याचा जसा प्रसार झाला आहे तशाच प्रकारचा ब्रह्मदेशात चेट्टीचा. किंबहुना इकडच्यापेक्षा तिकडेच अधिक!

पण अशाही परिस्थितीत ब्रह्मी समाजाने आपली सामाजिक दानधर्माची कल्पना बदलू दिली नाही. कदाचित् धार्मिक कारणामुळे असो अथवा

पिढ्यान्‌पिढ्याच्या सस्कारामुळे असो, दागदागिने, जमीनजुमला किंवा इमारती वगैरेत पैसे गुतवावे आणि आपल्या मुलाच्या मागची ददात नाहीशी करावी असल्या विचारसरणीचा ब्रह्मी जनतेवर पगडा बसूच शकला नाही. फक्त कपडे आणि इतर राहणी सोडली तर त्याच्या मनावर बौद्धधर्मीय वैराग्याचा परिणाम झालेला स्पष्ट दिसतो. ब्रह्मी घरात आकर्षक असे काही वाटावयाचेच नाही. बाधणूक, सुबक रचना अथवा बाह्याग अशा कशानही ब्रह्मी घरे डोळ्यात भरत नाहीत. घराच्या बाधणीत 'कमान' असणे म्हणजे चैनीचे व वैराग्याभावाचे लक्षण असल्याने ब्रह्मी घराना कमान अशी नसतेच. मात्र थोडक्यात सर्व आटोपशीर काम केलेले म्हणून ती लाकडी घरे पाहण्यात कौतुक किंवा कुतूहल असेल तेवढेच! पण वाडे, बगले, किंवा चाळी बाधण्यात सुद्धा जे रचनाचातुर्य आपण अपेक्षितो ते ब्रह्मदेशीय घरात मुळीच आढळत नाही. बरे, तिकडे कारागिराचा अभाव म्हणावा तर पॅगोडा, चौग किंवा बुद्धाच्या प्रचड मूर्ति असल्या ठिकाणी दिसून येणारे अप्रतिम कौशल्य पाहून आपण आश्चर्यातिशयाने थक्कच होतो! कोरीव नक्षीकाम, मूर्तींची घडण, बांधेसूदपणा, त्याचा भव्य आकार, कल्पनातीत उची, प्रत्येकीला उभारलेले नक्षीदार छत, मूर्तींवर घातलेले रगीत दागिने व भूषणे वगैरे पाहून असे कारागीर अन्यत्र मिळणार नाहीत हा विचार मनात येतो आणि तिकडे घरे पहावीत तर अगदी म्हणजे अगदीच साधी! त्यात टापटीप असते, आटोपशीरपणाही एकदम दिसतो. थोडक्यात बिऱ्हाड थाटून सर्व व्यवस्था करून घेण्याचे ब्रह्मी गृहिणीचे कौशल्यही नजरेस पडते. परतु याबद्दल ब्रह्मी स्थापत्यविशारदाची किंवा कुशल कारागिराची आठवण न होता गृहिणीच्या गृहदक्षतेची होते. यावरून हेच अनुमान निघते की, जी काय कला-कुसरता दर्शवावयाची ती देवासाठी देवालयात किंवा फुजींच्या चौंगमध्ये. घरगुती राहणीत साधेपणाच ठेवावयाचा. ही विचारसरणी राजपुत्र सिद्धार्थाच्या अनुयायाच्या मनात मुरून राहणे अशक्य नाही.

त्याची घरे सर्व लाकडाची असतात. याची कारणे दोन असावीत. एक लाकूड मुबलक व म्हणून स्वस्त मिळते. आणि दगड, विटा वगैरे बाध-कामास लागणारे सामान सहजासहजी मिळत नाही. दुसरे, वरचेवर होणाऱ्या धरणीकपामुळे घराना धक्का पोहोचू नये ही तरतूद. कारण ब्रह्मदेशात

धरणीकप म्हणजे बेळगाव-धारवाडकडे प्लेग किंवा कॉलरा जितका नित्याचा तसेच होत! कित्येक घरे जमिनीपासून ८–१०–१५ फूट उचीवर 'बाध-लेली' असतात. म्हणजे लाकडी खाबावर तो घराचा साचा उभारलेला असतो. घर सर्व लाकडी ही कल्पनाच आपणाकडे यावयाची नाही. तक्त-पोशी एक वेळ लाकडी असते किंवा खोल्यामध्ये 'पडद्या' लाकडाच्या उभारतात, हे बऱ्याच जणाना ठाऊक आहे. पण सबध घरच लाकडी, ही कल्पना महाराष्ट्रात तर मुळी करणेच कठीण जाईल. ओढूनताणून साम्य दर्शवावयाचेच तर रेल्वे क्रॉसिंगच्या ठिकाणीं किंवा इतरत्र देवडीवाल्या-( गेट कीपर )साठी उभारलेल्या लाकडी घराचे दर्शविता येईल. तशीच पण पाहिजे तितकी मोठी घरे अथवा लाबच्या लाब चाळी येथून तेथून सर्व लाकडाच्या 'बाधलेल्या' पाहून एकदम आश्चर्यच वाटते. कारण सुदर, मजबूत व उठावदार इमारत म्हटली की, चिरेबदी अथवा निदान पक्क्या विटानी तरी ती बाधलेली असलीच पाहिजे, असा आपला मनातच सकेत ठरून गेलेला आहे. घरे बाधण्याची ही निराळी तऱ्हा आपणास फारच विचित्र वाटते, पण उत्तर हिंदुस्थानातही अशीच आश्चर्य वाटणारी दुसरी एक पद्धत आहे. तिकडे सर्व बाधकाम दगडाचे करतात. म्हणजे काही काही दरवाजे सुद्धा दगडी असतात. त्यामुळे लाकडांचा घरबाधणीत उपयोग होतो हें देखील तेथील रहिवाशाना नवीन शोधाप्रमाणे वाटते. याचे प्रत्यतर काशी-तील 'काठकी हवेली' म्हणून जो प्रचड पेशवाईवाडा आहे त्याच्या नावात सापडते. काशीत बहुतेक घरे दगडाचीच बाधलेली आहेत. खिड-क्याची किंवा दुसरी दारे मिळाली तर लाकडी घालतात. याचे कारण तिकडे इमारती लाकूड कमी हे तर आहेच, पण दुसरे म्हणजे वाळवीची भयकर भीति हेही कारण लाकूड कमी वापरण्यात आहेच. म्हणून 'लाकूड वापरून बाधलेली हवेली' असे पेशव्याच्या वाड्यास म्हणतात. ( काठ = काष्ठ, हवेली = इमारत. ) इतरत्र सर्व घरे दगडाचीं असता हे एकच घर लाकूड घालून बाधले गेल्याने तत्रस्थाना आश्चर्य वाटून त्यानी 'लाकडाचे घर' असे त्या इमारतीस म्हटल्यास वावगे काहीच नाही. अशा काशीवासियाना ब्रह्मदेशांतील लाकडी घरे आणि त्यात सुखाने समार करणारे ब्रह्मी लोक पाहून काय वाटेल बरे?

ते असो. तो विचार आपणास तूर्त करावयाचा नाही. लाकडी घराचे फायदे किंवा तोटे काय आहेत हे आटोपून आपली लाबलेली ही समाज-पाहणी संपविली पाहिजे अशा घरात स्वयपाक करावयाचा म्हणजे खरो-खरच एखादे वेळी पंचाग्नि नव्हे ‘ षडाग्नि ’–साधन करण्याचा प्रसंग याव-याचा. पण बर्फमय प्रदेशात राहणारा जसा हिमवृष्टीपासून संरक्षण करण्यात जन्मतःच तरबेज बनतो तशीच गोष्ट ब्रह्मदेशातल्या काष्ठगृहात राहणाराची आहे. स्वयपाकघरात जेथे प्रत्यक्ष चूलबाईची बैठक असते तेथे मातीचा ओटा घातलेला असतो आणि आजूबाजूला ठिणगी उडू न देण्यात ब्रह्मी गृहिणी दक्षता बाळगतात. शिवाय त्यांच्याकडे स्वयपाकातही स्त्रियाना फार वेळ घालावा लागत नाही. आणि तितका वेळ, बाहेरचे सर्व उद्योगधंदे स्त्रियासच आटोपावयाचे असल्याने, देऊन त्यांचे चालणारही नाही. स्वयपाकघरात भांडी ताब्यापितळेची नसून मृत्तिकापात्रासच प्राधान्य दिले जाते. ह्या भांड्यात आणि साध्या गाडग्यामडक्यात मात्र पुष्कळच फरक असतो त्याना एक प्रकारची जिल्हई दिलेली असल्याने त्यातून पाणी झिरपत नाही किंवा ती लवकर फुटतही पण नाहीत. त्यात पुन्हा सुबक घाट, मोहक आकार अशा कलाकुसरीची भर पडते. नदीकाठच्या शहरात कुंभकाराची कला बरीच परिणत झालेली आढळते. हा अनुभव संयुक्त प्रातातील शहरा-वरून आपणास येतोच. याचे कारण नदीकिनारी अनायासे मिळणारी मऊ माती. अस्तु.

ब्रह्मी घरात आणखीही दोन सोई प्रामुख्याने कराव्या लागतात. गृह-देवतेची म्हणजे गृहाधिष्ठित नॅट्ची राहण्याची जागा राखून ठेवावयाची ही एक आणि दुसरी देखील गृहदेवतेचीच सोय आहे घरातली चालतीबोलती जी ‘ देवता ’ असते तिचे किरकोळ सामानविक्रीचे छोटेसे दुकान असते. त्याची सोयही घरातच करावी लागते. नॅट्ला नेहमी दक्षिण दिशा प्रिय असल्याने त्या बाजूच्या खांबावर तो बसलेला असतो, अशी समजूत रूढ आहे. आणि म्हणून घरात गेल्याबरोबर त्या खांबावर पल्लव-फुले वगैरे टाकलेली दिसतात. गृहिणीची दुसरी सोय घरात प्रवेश करतानाच केलेली दिसून येते. इतर घरापेक्षा किंचित् सखलात असलेले हे छोटेखानी दुकान बहुतेक प्रत्येक घरातच असते. कारण प्रत्येक गृहिणी दुकानदार–( रीण ? )

बनून कसला ना कसला तरी व्यापार करतेच. तिच्या दुकानात रोजची उलाढाल फारशी झाली नाही तरी गप्पाचा अड्डा जमण्यास ती जागा सोईची वाटते. आणि ब्रह्मी स्वभावास चकाट्या पिटणे हे फार रुचते. काही घरात दुसरीही एक सोय साधतात. पाण्याची विपुलता असल्याने पाणथळ जागा काही कमी नसतात. आणि घरे बांधताना ती जमिनीला लागून कधीच बांधावयाची नाहीत ही त्यांची चाल. तेव्हा अनायासे पाण्यावरील लाकडी हवेल्या 'उठविता' येतात. मात्र त्या तरत्या नसतात. ज्या खांबावर घर उभारलेले असते ते खांबच मुळी पाण्यात रोवतात. त्यामुळे रोज लागणारे अन्न—परसातून भाजीपाला सहज तोडून आणतात त्याप्रमाणे— घरात बसून मिळविता येते. वर बसून खाली पाण्यात जाळे टाकले अथवा हुक सोडला की काम भागते. 'खाटल्यावर बसून' खाणे मिळते! कारण तांदूळ आणि 'पाणशेंगा' असल्यावर आणखी खाणे ते काय पाहिजे? शेवया शिजवून कांद्याबरोबर किंवा नुसत्या तशाच खाण्याची ब्रह्मी जनतेची आवड कित्येक युरोपियनांना अत्यंत गलिच्छ व विचित्र वाटते. कारण शेवया म्हणजे हातांनी केलेला पिठाचा पदार्थ आहे अशी कल्पनाच त्यांना करवत नाही!

ब्रह्मी भाषा ही वेगळी आहे. तिची लेखनपद्धतीसुद्धा निराळी आहे. यावनी लिपीप्रमाणे उलट्या बाजूने ती लिहितात, असा याचा अर्थ नव्हे. तर देवनागरीशी कसलेही नाते न जुळणारी अशी ती आहे. अक्षरांचे वळण वर्तुळाकार असते. किंबहुना बहुतेक अक्षरे म्हणजे वर्तुळेच होत, असे समजण्यास प्रत्यवाय नाही मात्र भेद दर्शविण्यासाठी वर्तुळाचा भाग वेगवेगळ्या ठिकाणी कापलेला असतो असे म्हणता येईल. ब्रह्मी भाषेचा दुसरा विशेष म्हणजे ती एकावयवी आहे हा होय. 'खा, पी, तू, मी, जा' असे काही एकाक्षरी शब्द आपल्या भाषेत आहेत, परंतु ब्रह्मी भाषेत बहुतेक भरणा अशांचाच असल्याने ती ऐकणे खरोखरच गमतीचे वाटते. शिवाय हेल काढून बोलणे शिष्टसंमत समजतात. त्यामुळे तर विशेषच मौज येते. ह्या भाषेचा आणखीही एक महत्त्वाचा विशिष्ट गुण म्हणजे तिचे उच्चार फार अस्पष्ट आहेत. उच्चारानुसारी भाषा लिहून घेऊ म्हटल्याने साधणार नाही म्हणून 'गुरुमुखाविना' ब्रह्मी भाषा उच्चारता येणे अशक्यच आहे. श्रवणेंद्रिय

तीक्ष्ण व सूक्ष्म भेदाभेद ओळखण्यात पटाईत करून ठेवले आणि वाटेल तसे ओठ हलविता येत असले तरच ब्रह्मी भाषा नीटपणे बोलण्याचा अभ्यास करता येईल, एरवी नाही. एकाच तऱ्हेने लिहिलेले पण उच्चार वेगवेगळे होणारे किती तरी शब्द ब्रह्मी भाषेत आहेत आणि उच्चाराप्रमाणे अर्थही बदलतात. म्हणून ब्रह्मी भाषा शिकणे हे कठीणच काम दिसते.

आपणास बोलता आली नाही किंवा समजली नाही तरी ब्रह्मी भाषा ऐकत बसण्याने पुष्कळच करमणूक होते. ह्या भाषेचा आणि संस्कृताचा कांही संबंध जुळतो का ते पाहणे मनोरंजक आहे. संस्कृत व ब्रह्मी ह्या भाषांचा तुलनात्मक अभ्यास केला तर ब्रह्मी लोक बोबडे आहेत असे दिसते. म्हणजे '**गाला उलोनि पलला, सत्व खले नवल कलितसां काय**' ही जशी बालगोपालाची 'अव्यक्तवर्णरमणीय' भाषा तशीच दुसरीही असते. 'र' चा किंवा 'श, ष, स' याचा उच्चार जेव्हा नीट करता येत नाही तेव्हा मुले 'वसता' म्हणण्याऐवजी 'वथता' म्हणून हाक मारतात किंवा 'मुय्ली-धय्' असे 'मुरलीधर'चे स्वरूप बदलतात. तसाच काही अशी प्रकार ब्रह्मी भाषा-भाषींचा झालेला दिसतो. 'ललतां हलिनेंचि झालिला पाय' अशापैकी 'लडयोरभेदः' ते करीत नाहीत. किंवा उत्तर हिंदुस्थानात 'पूडी-कचोडी' म्हणताना 'र' ऐवजी 'ड' वापरतात तसाही भेद त्यांचे हातून होत नाही. तर विशेषतः र, श, ष, स आणि क्वचित् प्रसंगी 'च' याऐवजी अनुक्रमे, य, स, त, थ व स असा अक्षरभेद केलेला आढळतो. उदाहरणार्थ, ब्रह्मी महिन्याची नांवे पाहू—

(१) मेथ, (२) प्येथ, (३) मेदोन्, (४) करकट्, (५) थीन, (६) कन, (७) तु, (८) प्येत्स, (९) नु, (१०) मकय, (११) कोन, (१२) मेन.

ही बारा नावे नेहमीच्या प्रचारातली नसून आपणाकडे 'इंदुवासर, भृगु-वासर' ही जशी शिष्टजनाच्या मुखात असतात, तशीच महिन्याची वरील नांवे होत. थोडासा विचार केल्यास ती बारा राशींची नावे असल्याचे आढळून येईल. प्रत्येक महिन्याला 'याथी'चे म्हणजे राशीचें नांव दिलेले दिसते. तीच गोष्ट 'उतू'ची (ऋतूची) आहे. 'हेमत' उतु, 'गेमत' उतु आणि 'वथत' उतु असे तीनच ऋतु ब्रह्मीजन



चात्रान चौगमधील वृद्ध फुजी

ओळखतात. त्याची नावे कशी आली हे समजण्यासारखेच आहे. मात्र त्याच्या वसतात आणि आपल्या वसतात फार फरक आहे. आपणासारखे शुक्लकृष्ण पक्षही त्याचेकडे प्रचलित आहेत. मेन वद्य ते करकट् शुद्ध अखेर ' गेमत, ' करकट् वद्य ते ग्येत्स शुद्ध अखेरचा ' वथत ' आणि उरलेल्या चार महिन्यातील ' हेमत ' अशी वाटणी ब्रह्मी करतात. म्हणजे ' गेमत ' हा उन्हाळा व ' वथत ' हा पावसाळा असा तिकडील शिरस्ता दिसतो. ' हेमत ' मात्र आपल्या हिवाळ्याशी जमतो. त्याची वर्षगणना चाद्रमानाने असल्याने महिन्याचे दिवसही नक्की नसावेत असे वाटते. पण सोईसाठी ब्रह्मी ज्योतिष्यानी एका महिन्यात २९ व दुसऱ्यात ३० दिवस असे प्रमाण ठरवून टाकले आहे. त्यामुळे क्षयवृद्धीचा फारसा घोटाळा उडत नाही. तसेच दर तीन वर्षांनी ' घोडा ' यावयाचा, तो महिनाही ठरलेलाच आहे. ' करकट् 'च नेहमी ( म्हणजे तीन वर्षांनी एकदा ) अधिक असावयाचा. त्याला ते ' दुतीय ' ( द्वितीय ) असे म्हणतात.

दिवसाची नावे देखील आकाशस्थ ग्रहावरून पडलेली दिसतात. ' यवि ' (रवि), ' सद ' (चद्र), ' इग ' ( मगळ ), ' बोद्द ' (बुध), ' ग्येपति ' (बृहस्पति), ' थौक्य ' (शुक्र), ' सने ' (शनि), अशी दिवसाची नावे आहेत. दिवसगणनेत एक महत्त्वाचा भेद आहे तो असा की, बुधवारला दोन नावे देऊन एका दिवसाचे दोन भाग कल्पिले जातात. सूर्योदयापासून नव्या दिवसास आरभ न होता मध्यरात्रीनतर होतो. म्हणून रात्री १ ते दुपारी १२ पर्यंत बुधवार व नतर मध्यरात्रीपर्यंत ' याहू ' ( राहू ) असे म्हणतात. ही नावे संस्कृतची विकृत स्वरूपेच होत. ती कशी झाली किंवा त्यापासून काय अनुमान काढावयाचे हे अर्थात्च तज्ज्ञाचे काम आहे. मला त्यातील काहीच कळत नाही.

ब्रह्मदेशाचे कोणतेही वर्णन तेथील पॅगोडाविषयी लिहिल्यावाचून पुरे होऊ शकत नाही. किंबहुना असेही म्हणता येईल की, ब्रह्मदेश म्हणजेच पॅगोडाचा प्रदेश होय. ब्रह्मी लोकाच्या राहणीत त्याचे कपडेलत्ते बगळल्यास अत्यत साधेपणा असतो हे मागे सागितलेच. त्यांची घरे तर अगदी साधी म्हणजे झोपडीवजाच असतात. कलाकुसरीला त्यांत कोठेही स्थान नसते. परतु ह्या साधेपणाचे उट्टे ब्रह्मी पॅगोडात निघते असे म्हणता येईल. पॅगोडा-

साठी खर्चिलेले द्रव्य अगणित असते आणि ते सर्वस्वी सार्वजनिक रीत्या गोळा होते. पॅगोडा बांधण्यासाठी स्थापत्यशास्त्रकोविदांना बरेच परिश्रम घ्यावे लागतात. तेथील कारागिरी, सुवर्णाचा लेप देण्यात दाखविलेले कौशल्य, पॅगोडाच्या उच्च शिखरावर रत्नजडित सुवर्णघटा टांगून ठेवण्याची अजब करामत, प्रचंड बुद्धमूर्ती कोरण्यास व त्या नाना भूषणांनी भूषविण्यात लागणारी सौंदर्य-समीक्षता इत्यादि गुणांचे एकसमयावच्छेदेकरून भरणारे प्रदर्शन म्हणजे हे पॅगोडाच होत, असें म्हणता येते. पॅगोडा म्हणजे आपणाकडे बुद्धाचे स्तूप कार्ली-सांची येथे जसे आहेत तसलेच पण थोड्या फरकाने व श्रीमतीने सजविलेले, स्तूपच होत. गौतमबुद्धाच्या शारीरिक अवशेषावर, त्याच्या वापरातील साहित्यावर, गौतमप्रणीत किंवा अन्यांनी रचिलेल्या धर्मग्रंथावर अथवा बुद्धमूर्तींवर हे स्तूप रचले जातात. त्यांना बुद्धधर्मात अत्यंत महत्त्वाचे स्थान आहे. कारण या समाधींचा नित्यदर्शनासाठी उपयोग होतो, आणि नवविधा भक्ति पॅगोडाच्या रेखानेच भक्ताच्या अंतःकरणातून वाहू लागते. निरनिराळ्या देवता नसल्याने बुद्धधर्मीयांचे पूजनअर्चन वगैरे अशा पॅगोडांतच होते. म्हणून मूळ स्तूपाभोंवती बुद्धाच्या अनेक आकाराच्या मूर्ती बसविलेल्या असतात, व तेथे नित्यशः भक्तगणाची रहदारी चालू असते. ह्या पॅगोडासंबंधाने हल्लींच्या चिकित्सकबुद्धीच्या काळात काही विचक्षणी लोकांच्या मनात शंका येतात. याचे कारण असे की, गौतमबुद्धाच्या शारीरिक अवशेषावर बांधलेले स्तूप ब्रह्मदेशात व दक्षिणेकडील इतर बेटांतही पुष्कळ आढळतात. उदाहरणार्थ, त्याच्या दातावर उभारलेले एकंदर स्तूप घेतले तर गौतमबुद्धास शेकडो दात होते, असे मानण्याचा प्रसंग येईल. हीच गोष्ट त्याच्या वापरण्यात आलेल्या कमंडलु, भिक्षापात्र इत्यादि उपकरणांची आहे. परंतु, धर्मसंस्थापकाचे ठायीं त्याच्या अनुयायांची असलेली उत्कट भक्ति लक्षात घेतली तर ह्या गोष्टींत आश्चर्य वाटण्याचे कारण नाहीं. येशू ख्रिस्ताचे बाबतींतही युरोपांत अशाच गोष्टी सांगतात. हा आकाशातील बाप जेव्हा क्रूसावर चढला—नव्हे त्याला खिळ्यांनी तेथे जखडून टाकले— तेव्हा उपयोगांत आणलेल्या खिळ्यांचे महत्त्व ख्रिस्तानुयायांत साहजिकच वाढले. आणि ‘त्या वेळचे खिळे आमच्याजवळ आहेत’ अशी सात्त्विक बढाई प्रमुख प्रमुख ख्रिस्त मंदिरांतील धर्माध्यक्ष मारूं लागले. ख्रिस्ताला टांगण्यासाठी उपयोजिलेले

म्हणून प्रसिद्ध असलेले, सर्व युरोपातील देवालयामधील हे खिळे एकत्र केले तर खंडोगणती भरतील, अशी ख्रिस्तानुयायाचीच कबुली आहे. साराश काय की, असल्या धार्मिक भावनेच्या बाबतीत शास्त्रीय चिकित्सेची कसोटी लावावयाचा नसते.

असो. पॅगोडाभोवती गौतमबुद्धाच्या भिन्न भिन्न आकाराच्या मूर्ती असतात म्हणून म्हटले त्या अर्थातच स्थानमाहात्म्यावर अवलबून असतात. कारण देवालय बाधणे ही जशी आपणाकडे पारमार्थिक लाभ साधून देणारी बाब मानतात, तशीच तिकडेही. पण ज्या मानाने पॅगोडाला महत्त्व त्या मानानेच अधिक महत्त्व तेथे उभारलेल्या बुद्धमूर्तींना असणार व त्या प्रमाणातच बाधणाराला श्रेय किंवा पुण्य अधिक मिळणार अशी कल्पना भाविकाची असते. खुद्द ब्रह्मदेशातच काय, पण आजूबाजूच्या सयाम, इंडोचायना, मलाया इत्यादि भागातही श्वे डेगॉन पॅगोडाइतके महत्त्वाचे आणि धार्मिक श्रेष्ठतेचे दुसरे स्थान नाही. त्यामुळे सर्वात अधिक मूर्तीची गर्दी तेथेच व्हावी, हे ओघाओघानेच येते. तेव्हा ह्या स्तूपराजाचे वर्णन थोडे विस्ताराने केल्यास ब्रह्मी जनतेच्या मनातील महत्त्वाच्या भावनाचीही आपणास ओळख होईल. श्वे डेगॉनचा पौराणिक इतिहास फार प्राचीन काळापासूनचा असून अनेक दतकथाचा त्याच्या रचनेशी सबध येतो. त्या गलबल्यात तूर्त न पडणेच बरे. हा पॅगोडा रगूनमध्ये एका लहानशा टेकडीवर उभारलेला असून बराच उच आहे. सुरुवातीला त्याचा परीघ सुमारे पाव मैल (१३५० फूट) असून ३७० फूट उचीपर्यंत तो चढविला आहे. अर्थातच घेर कमी होत गेलेला असून शिखरावर एक भले मोठे छत्र बसविलेले आहे. त्या छत्राभोवती अनेक घटा आहेत, व इतक्या उचीवर सहजच येणाऱ्या वाऱ्यामुळे त्या एकसारखा मजुळ ध्वनि करीत असतात. हा उच शिखर असलेला जगी स्तूप खालपासून वरपर्यंत सोनेरी वर्खाने मढविलेला दिसतो. पचमहाभूताना दाद न देता सोनेरी रग कायम टिकविणे ही कमी खर्चाची बाब नव्हे. तसेच शिखरावर उभारलेले छत्र अत्यत वजनदार हवे म्हणून आतून लोखडाचे असले तरी हिरेमाणकाचे कोंदणे करता यावे म्हणून जाड सोन्याच्या पत्र्याने मढविलेले आहे. हे रत्नखचित छत्र अर्थातच सर्व पॅगोडात मौल्यवान् असते. श्वे डेगॉन पॅगोडावरील छत्राची किंमत पूर्वीच्या हिशेबाप्रमाणे सातआठ लाख

रुपये तरी व्हावी असा, ते छत्र पाहिलेल्यांनी अदाज केलेला आहे. कारण इतक्या उचीवरील शिखराभरणाची खरी किमत खालून पाहणारास येणे शक्य नाही.

श्वे डेगॉन पॅगोडाचे भोवती आणखीही काही आवारे बांधलेली आहेत. त्यात भाविक लोक पूजेसाठी जातात. ब्रह्मी पूजेचा प्रकार आपणाकडील पद्धतीहून थोडासा भिन्न आहे. देवळात जाताना फुले, मेणबत्त्या आणि उदबत्त्या वगैरे घेऊन जावे लागते. शिवाय प्रत्येक वाराला एक ठराविक जनावर नेमलेले आहे आणि त्या जनावराची प्रतिमा असलेल्या मेणबत्त्या देवापुढे ( बुद्धापुढे ) लावावयाच्या असतात. ब्रह्मी लोक वाढदिवस वार्षिक मानण्याऐवजी साप्ताहिक मानतात व म्हणून प्रत्येक आठवड्याला म्हणजे आपल्या वाढदिवशी त्या दिवसाच्या जनावराची आकृति असलेली मेणबत्ती बुद्धापुढे लावणे हे आयुरारोग्यप्राप्तीच्या अनेक मार्गापैकी एक कृत्य आहे. मंगळवारी जन्मलेल्याने सिंहाकृति मेणबत्त्या घ्यावयाच्या, शुक्रवारी सूकर छाप मेणबत्त्या जाळावयाच्या, वगैरे ठराविक प्रकार ' धर्माज्ञे 'प्रमाणे निश्चित झालेले आहेत. आपल्या इष्टमित्रासाठीही आपण त्याच्या दिवशी मेणबत्त्या लावल्या तर चालतात. असो. पॅगोडाला जाताना पाणी व फुले ही अवश्य लागतात. ती प्रवेशद्वारापाशी मिळतातही. ब्रह्मी लोक देवदर्शनाला येतात, तेव्हा आधी घंटा वाजवितात. ही घंटा डोक्यावर कधीच टांगलेली नसते. देवालयात चढण्यापूर्वी बाहेरचे बाजूस एका खांबास ती अडकवून ठेवतात व ती फार उंच नसल्याने वाजविण्यासाठी हात डोक्यावर न्यावा लागत नाही. सांबराचे शिंग किंवा लाकडी ठोकळा घंटानाद करण्यासाठी घंटेजवळच ठेवलेला असतो. त्याने प्रथमतः घंटा बडवून नंतर खाली जमिनीवर एक ठोका द्यावयाचा. हेतु हा की, पृथ्वी आणि आकाश यांना बजावून आपण प्रार्थना करतो, अशी खात्री करून घ्यावयाची. श्वे डेगॉन पॅगोडाजवळ असलेली नारोशंकरी घंटा ही जगातील तिसऱ्या नंबरची आहे असे म्हणतात. तिचा व्यास सात फूट साडेसात इंच असून ती चवदा फूट उंच आहे. पंधरा इंच जाडीच्या या अजस्र घंटेचा आवाज तिला अनुरूप अशा ' ठोकणी 'ने केला तर किती दूरवर ऐकू जाईल याची कल्पनाच करावी. ह्या घंटेश्वराचे वजन ९४,६८२ पौंड म्हणजे जवळजवळ ५९ खंडी ( बंगाली मापाने ) भरेल! असो.

घटावादन केल्यानतर आत जाऊन मूर्तीपुढे किंवा मूर्तीवर पाणी ओतावयाचे, फुले वहावयाची, मेणबत्त्या, दिवे काय असतील ते लावावयाचे आणि नतर गुडघे टेकून डोळे मिटून प्रार्थना करावयाची अशी रीत आहे. हे झाल्यानतर इतर बुद्धमूर्तीचे दर्शन घेण्यास जातात, व ऐपतीप्रमाणे तेथे काही धान्य टाकून पुढे चालू लागतात. श्वे डेगॉन पॅगोडाच्या सभोवार लहानमोठे असे शेकडो बुद्ध आहेत. त्यात मानवी आकाराच्या २०–२५ पट असेही कित्येक असून गौतमबुद्धाला वेगवेगळ्या रीतीने बसविण्यात आले आहे. एके ठिकाणी तर त्या परमवैराग्यशाली धर्मसस्थापकास विलासी परीप्रमाणे आडवेच निजविले आहे. शिवाय त्याच्या अगावर इतकी आभरणे व भूषणे चढविली आहेत की, प्रत्यक्ष बुद्धाला ते सर्व पाहून अत्यत विषाद प्राप्त होईल. सोनेरी वस्त्रे, कर्णभूषणे, बाहुभूषणे याचा त्याग केल्यानतरच ज्ञानी झालेल्या बुद्धास, बादशाही वेश्याना कधीच लाभत नाही, इतके वैभवी स्वरूप सध्या द्यावयाचे म्हणजे त्याच्या शिकवणीचा गधही आपणास लागला नाही असे दर्शविण्यापैकीच होय. परतु भक्तिभावाने प्रेरित झालेले हे बौद्धधर्मीय लोक आपल्या धर्मसस्थापकास शक्य तितक्या वैभवात बुडवून ठेवण्याचा प्रयत्न करतात. स्वत' विरागी राहून द्रव्य साठवावयाचे व त्याचा विनियोग बुद्धमूर्ति उभारण्यात अथवा उभारलेल्या सुशोभित करण्यात करावयाचा, ही तर त्याची धार्मिक परमोच्च कोटीची भावना. कदाचित् असेही असावे की, बुद्धाने जिवतपणी अत्यत हाल सोसले व ऐहिक सुखाचा त्याग केला म्हणून आता निर्वाणास गेल्यानतर सर्व विलास त्याचे अगी जाऊन बिलगत आहेत! अस्तु.

ह्या श्वे डेगॉन पॅगोडाचा पुष्कळसा भाग गेल्या वर्षी आग लागून जळाला व प्रेक्षणीय असे मदिर नष्ट झाले. ते बाधण्याचे काम चालू आहे. पॅगोडाचे आसपास अनेक भिक्षूभिक्षुणी उपजीविकेसाठी आणि बुद्धभक्तीसाठी धडपडत असतात. प्रवासी यात्रेकरूची सोय व्हावी, म्हणून ओऱ्या बाधलेल्या असतात. तेथेच रक्तपितीने पीडलेले अथवा 'आधळेपागळे आणि थोटे' राहून भिक्षा मिळवितात. 'सदाल' ( चाडाळ ) म्हणून जो वर्ग पॅगोडा झाडून स्वच्छ ठेवण्यासाठी ठेवलेला असतो, तो जवळजवळ गुलामच आहे असे समजावे. त्याना इतर समाजात मोकळेपणाने हिंडता येत नाही. ब्रह्मी

जनतेतील ते अस्पृश्य म्हणण्यास हरकत नाही. त्याची स्थिति अत्यत करुणास्पद असते खरी, आणि सर्व रीतीने उदार असणारा हा समाज सदालाचे बाबतीत इतका क्रूर का झाला हे समजत नाही. हळू हळू त्या अस्पृश्याचा दर्जा वाढण्याची चिन्हे दिसत आहेत. त्याच्यातच कैदेतून सुटलेले खुनी, दरोडेखोर, चोर किंवा तसलेच गुन्हेगार असतात. पूर्वीची पद्धत अशी की, ज्या गुन्ह्याबद्दल शिक्षा होईल तो व ज्याला शिक्षा होते त्याचे नाव तोंडावर गोंदून टाकावयाचे. म्हणजे लोकाना ह्या मनुष्यापासून चार पावले दूर रहावें असे प्रथमदर्शनीच कळावे. अशाची प्रजाही देव-दासात गणली जाते. स्मशानातील ' डोंबा 'चाही समावेश अशा अस्पृश्यामध्येच करतात. पण हे सर्व मिळून फार थोडे लोक होतात.

साधारणपणे ब्रह्मी नागरिक कोणत्या मनोवृत्तीचा असतो, ह्या प्रश्नाचें उत्तर देणे फार कठीण आहे. कारण ब्रह्मी जनाच्या मनात काय चालले आहे हें चेहऱ्यावरून ताडता येत नाही. बहुधा मानवी मुखचर्येवर मानसिक व्यापाराचे चित्र उमटलेले सापडते आणि चाणाक्ष इसम ते बरोबर ओळखू शकतो. परतु जेथे विचित्र काहीच नाही तेथे तो कितीही चाणाक्ष असला तरी काय करील? ब्रह्मी लोक आनदी आहेत, बिनाकारण फुकाची काळजी ते कधीही करणार नाहीत, सवड मिळाली की, ' चैन ' करून घेतील हे सर्व खरे. इतर वैराग्यपर राहणीतही त्याच्या मनातील सुखलोलुपता आणि काबाडकष्टाचा कटाळा ही स्पष्टपणे दृग्गोचर होतात. अर्थात् सुख व कष्ट याचा सापेक्षत्वानेच आपण विचार करीत असतो आणि म्हणून आपल्या इकडे कष्टाची जी कल्पना आहे, तिला धरूनच मी ब्रह्मी मनुष्याची तुलना करीत आहे. चिरूट फुकीत तासन्‌तास गप्पा छाटीत बसणे अथवा दुसरा कोणी काम करीत असताना त्याचे कौशल्य वाखाणीत राहणे यातच त्याना मजा वाटते. ब्रह्मी लोकात कारागिरी आहे, ती प्रथमतः पॅगोडा किंवा चोंगमधील मूर्ति व इतर बांधकामास लागणारे सामान तयार करण्यातच दिसते. नतर धर्मशास्त्राच्या ' पोथ्या ' तयार करण्यातही कौशल्य व चिकाटी कमी लागते असे नाही. त्याच्यावर लाक्षारसाने मढविलेली ' मळपृष्ठे ' घालावयाची, सचित्र प्रती तयार करावयाच्या किंवा बुद्धचरित्रातील निरनिराळे प्रसग चित्रित करावयाचे, ही कामें करण्यात बरीच मडळी तरबेज असते. भिक्षूची भिक्षा-

पात्रे किंवा पूजापात्रे, कमंडलु वगैरे लाकडाची असली तरी त्यावर लाखेचा थर देऊन तकतकी आणतात, व म्हणून ती चांगली टिकाऊ व दिखाऊही होतात. लाकडी पण लाखेने मढविलेले हे जिन्नस इतके सुबक ब्रह्मदेशा-व्यतिरिक्त कोठेंच होत नाहीत असे म्हणता येते. स्वतःसाठी लागणारे रेशमी वस्त्र पूर्वी ब्रह्मदेशातच तयार होत असे, पण आता विलायती माल अधिक मोहक व स्वस्त मिळतो—आणि विशेष असे की, त्यासाठी मेहनत फारशी नसतेच. बाजारात गेले की लुंगी मिळते, ही त्यांची समजूत. मात्र तिला निरनिराळे चित्तवेधक रंग देण्यात ते करामत खर्च करीत असतात. इतर बाबतीत विचार कमी असे दर्शविणारे ब्रह्मी नागरिक सौंदर्याच्या बाबतीत इतके शौकी कसे, ह्याचे आश्चर्य वाटते. त्यांना असलेली सौंदर्यसमीक्षता हिंदुस्थानातच काय पण कित्येक सुधारलेल्या युरोपियन राष्ट्रांत तरी असेल की नाही याची शंका वाटते. विलासप्रिय मोंगल बादशहाचे दडपण पडलेल्या प्रांतातील लोकसुद्धा इतके सौंदर्यदक्ष नाहीत. निसर्गदत्त सवलतीचा फायदा पुरेपूर घेऊन मानवी कारागिरीची थोडीशी जोड देऊन ब्रह्मी लोकांनी—विशेषतः महिलांनी—आपणा स्वतःस सौंदर्याच्या बाबतीत अखिल जगात बरेंच वरचे स्थान प्राप्त करून घेतले आहे. आणि त्यातही आश्चर्य हे की, त्यासाठी जुनें सर्वच सोडून नव्याचेच त्यांनी अंधानुकरणही केलेले नाही. किंबहुना नवे असे त्यांनी, अद्याप लुंगी व ती रंगविण्यात लागणारे अनेक रंग याशिवाय, काहीच स्वीकारले नाही मुद्रारंगसाहित्य किंवा परकी फॅशनचे कपडे स्त्रियांत तिकडे मुळीच प्रसृत नाहीत. असो.

ब्रह्मी मनुष्याचे विकार चेहऱ्यावर मुळीच दिसत नाहीत, यावरून त्याला विकार नसतील असा तर्क करणे चुकीचे होईल. इतर माणसाप्रमाणे तोही विकारवश होतो. पण विकाराची प्रतिक्रिया काय होईल याचा अंदाज तो लागू देत नाही. एकाद्या ब्रह्मी कारकुनाला किंवा गड्याला वरिष्ठ अधिकारी सडकून रागे भरला, तर त्या वेळी उत्तरे देण्याच्या किंवा आपला निर्दोषीपणा सिद्ध करण्याच्या भानगडीत तो पडणार नाही. संध्याकाळ झाली म्हणजे मुकाट्याने हातात डाह* घेऊन तो जाईल आणि आपल्या वरि-

---

* Dah हें एक हातभर लांबीचे कोयत्यासारखें हत्यार आहे

ष्टाचा खून करील! त्याला त्यात काही वाटणार नाही. परंतु अशा लहान-सहान बाबीवरून क्रोधाचा पारा इतक्या थराला क्वचितच जातो. बरेच दिवसाचे साचलेले वैर असले म्हणजेच अशा एखाद्या निमित्ताने ते बाहेर पडते. असली माणसे दुसऱ्याच्या विरुद्ध ः म्हणून सोडण्यास चांगली उपयोगी पडतात. आणि इंग्रज प्रभूंनी त्यांचा खरोखरच उपयोग करून घेतला असल्याचे दिसून येते. हिंदीद्वेष ब्रह्मी प्रजेच्या मनात भरविल्याने खुद्द वडाळीच्या क्षेत्रात नाही, पण अन्यत्र हा द्वेष माजलेला आहे. ब्रह्मी जनतेने विचार करून हिंदी प्रजेच्या विरुद्ध काहूर स्वबुद्धीने उठविले असते तर गोष्ट वेगळी. ब्रिटिशाच्या चिथावणीने त्यांनी एखादे दुष्कृत्य करण्यास उद्युक्त व्हावे यात त्यांचाच दोष दिसतो. आणि हा दोष राष्ट्रास अत्यंत विघातक आहे, हें कोणीही विचारवंत कबूल करील. विचारशक्तीचा अभाव ब्रह्मी पुढाऱ्यातही कसा दिसतो, हे मुलाखतीवरून स्पष्ट होईलच. ब्रह्मी जनतेतील उदार मताचा ( आणि हे विचाराभावाचेच एक लक्षण मानता येते ) फायदा हिंदी व्यापारी व नोकरानी घेतला त्याच्या अनेक पट युरोपियन लाटेगगाजी व त्याचे सहकारी खिस्ती मिशनरी यानी घेतल्याचे रगूनमध्ये नुसत हिंडले तरी कळून येईल.

इतके असले तरी ब्रह्मी उत्सवप्रियता काही कमी नाही. कसले ना कसले निमित्त काढून पॅगोडाला वनभोजनास जावयाचे, जत्रा भरवावयाची, घरीही काही धार्मिक कृत्यांच्या नावाखाली मेजवान्या झोडावयाच्या, नाच, गाणेबजावणे करावयाचे, यात कसलीही आपत्ति आली तरी खंड पडू शकत नाही. स्वतःचे घर जळाले म्हणून ब्रह्मी मनुष्य कधी हताश होऊन किंवा पुनः पुनः तीच आठवण काढून रडत बसणार नाही. ही दुःस्थितीशी बेफिकिरी विचारजन्य असती तर प्रशंसनीय व अनुकरणीयही ठरली असती. ह्या बेफिकिरीबरोबरच त्याची विनोदी वृत्ति आणि आनंदी स्वभाव ही दिसून येतात. ब्रह्मी वर्षारंभ ठराविक दिवशी येत नाही, तसाच तो किती दिवस चालावयाचा हेंही ठरलेले नसते. पण तो जेव्हा साजरा करतात तेव्हा एकमेकावर पाणी ओतावयाचे व सुग्रास भोजने झोडावयाची, हाच त्यातील मुख्य भाग आहे. मुले, मुली, पुरुष, बायका हातात पाणी घेऊन एकमेकाना न कळत परस्पराच्या अंगावर ते ओतण्यासाठी टपून बसतात आणि न कळता पाणी पडले म्हणजे जी गंमत उडते तिची विशेष मौज



बुद्धविहार ( चौंग ) मधील मोफत शाळा

असते. ज्याच्या अगावर पाणी पडते तो एखादे वेळी खरोखरच चिडतो; पण त्या चिडण्यानेच गमतीस रग चढतो. हा प्रयोग कोणावरही करतात. युरोपियन किवा परकी लोक त्यातून सुटत नाहीत. या सणात ब्रह्मी विनोदी वृत्ति दिसते. साधे बोलणे असले तरी त्यातही टोमणे, व्याजस्तुति आणि कोट्या याचाच भरणा आढळतो. म्हणून कोठेही सभा चालू असली की, त्या ठिकाणी ‘ खसखस पिकली ’ असे वाटते. ‘ स्वदेशी ’ची उपयुक्तता त्याना पटलेली नाही तथापि ती पटविणे मात्र कठीण नाही. फुजीच्या मार्फत कोणतीही शिकवण ब्रह्मी समाजाच्या अगदी खालच्या भागापर्यंत पोहोचविता येते. विचारवत व धोरणी पुढारी अशा अनुकूल परिस्थितीचा पुरेपूर फायदा घेण्यास चुकणार नाही. परतु साक्षरतेचा प्रसार झाला तसा शिक्षणाचा झाला नसल्याने अव्वल इग्रजी अमलात आपणाकडील पुढारी इग्रजी भपक्याने दिपून गेले, तशीच अवस्था ब्रह्मी जनतेची आजमितीस आहे. काही काळानतर त्याना आपली चूक कळून येईल. परतु इग्रजाचे ब्रह्मदेशातील वाढते वर्चस्व म्हणजे हिंदुस्थानाभोवती दास्यशृखलेचा फास घट्ट करण्यासारखे आहे, हे लक्षात घेऊन स्वार्थासाठी तरी ब्रह्मदेशीयास कोणी लुबाडू नये, अशी खटपट करणे हे हिंदी प्रजेचे कर्तव्य ठरते. शिवाय आजपर्यंत मिळालेल्या अनुभवाचा इतरेजनाना फायदा करून देणे म्हणजेच त्याचा खराखुरा उपयोग असल्याने बधुभावाने अथवा कोणत्याही भावनेने ब्रह्मदेश इग्रजाच्या आहारी न जाईल म्हणून हिंदुस्थानने प्रयत्नाची पराकाष्ठा केली पाहिजे. ‘ यत्ने कृते यदि न सिद्धयति कोऽत्र दोषः ? ’

आतापर्यंत ब्रह्मी समाजातील ठळक ठळक दिसणारे विशेष सागितले. स्त्रीवर्गाला त्यात मान बराच असतो, म्हणून त्याच्या वर्णनाला अग्रस्थान देऊन प्राधान्यही दिले. इतर पुष्कळच गोष्टी आणखी सागता येण्यासारख्या आहेत. परतु त्याविषयी किवा मडाले, पेगू, अमरपुरा येथील पॅगोडाविषयी शाततेच्या काळात ब्रह्मदेशाची सफर केल्यावर मगच लिहावे हे बरे. प्रेक्षणीय स्थळे पाहण्यास बडाळीच्या धामधुमीच्या काळी सवड नसावी हे रास्तच आहे. ही समाजस्थिति कळण्यास मात्र रगून व आसपासच्या खेड्यातील ‘ उभ्याउभ्या’चे वास्तव्य (!) कारणीभूत झाले. काही ब्रह्मी परिचिताना बरोबर घेऊन मी हिडलो आणि ‘ हे काय ? ’ ‘ ते कसले ? ’ असे विचारले.

तसेच त्याच्या बरोबरीच्या ब्रह्मी कुटुबात जाऊन गृहव्यवस्था पाहिली. पण या सर्व बाबतीत मला असे दिसले की, ही चोकस बुद्धि ब्रह्मदेशात चालविण्यास पुष्कळसा वाव असून फारच महत्त्वाची, मनोरजक आणि उद्बोधक अशी माहिती मिळण्याचा सभव आहे. इतकेच काय, परतु काही शोध लागण्याची शक्यता आहे. पण ह्या सर्व बौद्धिक आनददायी चैनी करण्यास मुख्यतः काल व द्रव्य पाहिजे. शिवाय एकस्यादुकस्याचे हे काम नव्हे. बऱ्याच जणानी तिकडे जाऊन थोडेसें परिश्रम केल्यास त्याना एम्. ए. साठी लागणाऱ्या प्रबधास भरपूर साहित्य मिळून पुन. मानवी ज्ञानात भर टाकल्याचे श्रेय लाभणार आहे. तेव्हा रुळलेला मार्ग सोडून आमचे सुशिक्षित व पदवीधर बधु किंचित् जरी आजूबाजूस गेले तरी पुष्कळच नवीन काम त्याना लाभेल व ते त्यानी मिळवावे इतकीच विनति शेवटी करावीशी वाटते.

हे बरेच लाबलेले ' ब्रह्मपुराण ' येथे सपले. ' महाराष्ट्रीय ' वाचकाना ते वाचून दाखविण्याचे काम यथाशक्ति व यथामति पार पाडले. ही कामगिरी वाचकाना कितपत पसत पडली हे ज्याचे त्यानेच ठरवावयाचे आहे. मात्र महाराष्ट्राने सध्याचे काळी बाह्य जगांतील राजकारणात लक्ष घालून घराबाहेर दृष्टि फेकण्याची वेळ सध्याचीच आहे एवढे ध्यानात ठेवावयास हवे.

# प रि शि ष्ट

## — १ —

# चितगांगमधील शस्त्रागारांवर आक्रमण

गेल्या वर्षी चितगाग येथे 'आर्मरी रेड' झाली क्रांतिकारकानी सरकारी अधिकाऱ्यावर हल्ला चढविला, एकदोघास ठार केले, तारा तोडल्या, बंदुका लुटल्या . . . . यापलीकडे जास्ती माहिती कोणास मिळू शकली नाहीं हे जे 'चित्तग्रामशस्त्रागारावर आक्रमण' झाले त्याबद्दल सध्या तेथे खटला चालू आहे. त्यासबंधी टीकात्मक विधाने खटला न्यायाधीन ( Sub judice ) असल्याने करता येत नाहीत. परंतु एकदर बाहेर आलेली माहिती सुसगत रीतीने देण्यास कसलीच हरकत नाही. म्हणून चित्तग्राम खटल्याची हकीकत थोडक्यात आज देत आहे, ती कळल्याविना खटल्यात काहीच राम वाटणार नाही.

अठरा एप्रिल १९३० रोजी रात्रौ साडेदहाच्या सुमारास चितगागमध्ये एकदम खळबळ माजली. शहरच्या मध्यभागी असलेल्या टेलिफोन ऑफिसच्या तारा तोडण्यात येऊन आतील यंत्रसामग्री फोडून मोडून टाकली आणि पेट्रोल ओतून त्या इमारतीस आग लावण्यात आली. तेथे असलेल्या पहारेकऱ्यास क्लोरोफॉर्म देऊन बेशुद्ध केले. जवळच असलेल्या तार ऑफिसातही असाच प्रकार करण्यासाठी क्रांतिकारक गेले होते. तेथे त्यानी गोळ्या झाडून व्यत्यय करण्यास आलेल्याना परत फिरविले आणि ते लगेच पुढे चालू लागले. त्याच वेळी चितगागहून 'लक्षम्' जंक्शनकडे जाणारी एक मालगाडी धूम व मीरसराइ या स्टेशनामध्ये रुळावरून घसरली आणि तिने तो रस्ता अडविला. नागलकोट व धूम या स्टेशनाजवळील तार ऑफिसच्या तारा कापण्यात आल्याने चितगाग रेल्वे स्टेशन मास्तरास कोणाशीच तार–व्यवहार करता येईना. ह्या सर्व गोष्टी साधारणपणे एकाच वेळी झाल्या धूम स्टेशन चितगागहून सुमारे ४३ व नागलकोट ७२ मैल दूर आहे.

आता या आक्रमणाचा मुख्य भाग चितगागमध्येच पण दोन ठिकाणी झाला, तो पाहू. चितगाग हे आसाम-बंगाल रेल्वेचे मुख्य ऑफिस आहे.

तेथेच सर्व कचेऱ्या व त्यावरील गोरे इपीसर राहतात. शिवाय अव्वल दर्जाचे बंदर म्हणून चितगागची गणना होऊ लागल्यापासून पुष्कळ युरोपियन व अमेरिकन व्यापाऱ्यानी (संभावित लुटारूनी) आपापली दुकाने व 'गोदामे' येथे बांधली आहेत. रेल्वेवरील गोरे कामकरी, बंदरातील व्यापारी व सरकारी वरिष्ठ अधिकारी यांची पुष्कळ वस्ती चितगागमध्ये आहे. चितगाग जिल्ह्याचे हे मुख्य ठिकाण तर खरेच, पण त्याखेरीज चार जिल्ह्यांचे मुख्य ठिकाण म्हणून कमिशनर व त्याच्या बरोबरच्या इतर कचेऱ्या चितगागला आहेत. इतके सर्व सागण्याचा मतलब हाच की, येथे युरोपियन वस्ती पुष्कळ आहे रेल्वे ऑक्झिलियरी फोर्स व सरकारी पोलिस लाइन या दोन्ही ठिकाणी शस्त्रागार आहेत. त्याखेरीज आणखी दोन ठिकाणी हत्यारे व दारूगोळा ठेवण्याची सोय असून तेथेही हत्यारे नेहमी जय्यत ठेवली जातात.

अशा एकदर चार अस्त्रागारापैकी रेल्वे ऑक्झिलियरी फोर्सचे एक व पोलिस लाइनमधील दुसरे अशा दोन्हीवर एकसमयावच्छेदेकरून हल्ला चढविण्यात आला. हे प्रकार रात्री साडेदहानतरच घडले. युरोपियन लोकाची शस्त्रे अर्थातच काळजीपूर्वक ठेवली असतील आणि विशेष दक्षतेने संरक्षिली असतील यात संदेह नाही, पण अशा ठिकाणीही जाऊन हल्ला करून, रक्षकाना व अधिकाऱ्याना ठार करून, कडेकोट बंदोबस्ताने ठेवलेल्या कोठारांची जबरदस्त कुलुपे तोडून, त्यातील शस्त्रे व दारुगोळा लुटून, उरलेल्या भागास आग लावून देण्यास पुष्कळच वेळ लागला असला पाहिजे. गुपचुपपणे हे काम होण्यासारखे खास नव्हते. वेळही गाढ निद्रेची नव्हती. साहेबांनी मदिराक्षीसमवेत मदिरासेवन करून गप्पागोष्टी किंवा 'कळपा'त जमून मजा मारण्याचे वेळी हा दगा चाललेला. सुमारे शभरसवाशे गोरे लोक जवळपास राहात असलेले. खुद्द पोलिस लाइनमध्येही काही नाही तरी ७५-१०० शिपाई होते. कोठारापाशी पहारेकरी काय गडबड करतात हे तिखट कानाच्या माणसाला ऐकू येईल, इतके त्यामधील अतर. पण त्या क्रातिकारकानी काय मोहिनी घातली कोणास ठाऊक, कोणी त्याना विरोध करण्यासाठी पुढे सरसावला नाही! नाही म्हणावयास पहिल्याने 'हुकुमडर्रर' करण्यास—म्हणजे कोण आहे ही चौकशी करण्यास— जेवढी मडळी आली तेवढी मात्र मृत्युमुखी पडली. रेल्वे शस्त्रागाराचे मुख्य अधिकारी जेवत होते.

जेवताजेवताच ते, बाहेर काय घादल आहे म्हणून पाहण्यास आले. येता येता ‘ बगाली कुतरडी ’ अशा प्रकारचे काही तिरस्कारयुक्त शब्द त्यानी काढले म्हणतात. त्यानतर लगेच त्यांस गोळी लागली—ते खाली पडले. त्याच्या तोंडावर बदुकीच्या दस्त्याचे ठोसे बसले—‘ कुत्र्याचा जोर पहा ’ असे उद्गार निघाले—आणि...मग लुटीचे काम चालू झाले. यानतर कोणी चौकशी-साठी आले नाही किंवा विरोध करण्याचीही कोणाची छाती झाली नाही. पहाटे सव्वातीनपर्यंत बदुकीची फैर झडत होती. विद्युद्दीप हातातून चोहोकडे प्रकाशत होते. क्रातिकारकाच्या मोटारी इकडूनतिकडे फिरत होत्या. अस्त्रा-गाराची दारे फोडून बदुकाची नासधूस चालू होती. पण गोऱ्या रहिवाशा-पैकी एकही खरा शूर मायेचा पूत निघाला नाही, किंवा शत्रु आहे कोण ते तरी आपण पाहू असे म्हणून सामना देण्याची इच्छा त्याला झाली नाही. क्रातिकारकापैकी प्रत्येकास तीन याप्रमाणे पुरून उरणारे, जगातील शूर लढवय्ये, शिपाईगिरीचा पोकळ अभिमान बाळगणारे गोरे लोक व त्याना पुरेशी शस्त्रे शिल्लक असता एकाही पठ्याला विरोध करावेला नाही किंवा होत असलेले नुकसान डोळ्यानी नुसते पाहण्यात शरम वाटली नाही, ही गोष्ट कोणास लाञ्छनास्पद व कोणास भूषणास्पद आहे हे न सागताच कळेल.

क्रातिकारकानी हातात विद्युद्दीप घेतले आणि जिकडून मडळी हल्ला करण्यासाठी येणार तिकडच्या रोखाने लुटलेल्या शस्त्रानीच फैर चालू ठेवली. हे खरे असले तरी त्याना आडकाठी करण्याचा प्रयत्नही कोणी केला नाही, हेही तितकेच खरे होय. प्रयत्न करून विफलता पदरी येणे हा दोष खात्रीने नव्हे. पण प्रयत्नच न करतां स्वस्थ राहणे हा अक्षम्य अपराध ठरेल. काही गोरे लोक मोटारीतून शस्त्रागाराकडे निघाले, पण विरोध करण्यासाठी म्हणून नव्हे, तर उजेड कसला दिसतो ते पाहण्यासाठी ! त्याच्या मोटारीला गोळी लागतांच त्यानी सूबाल्या ठोकला आणि लपूनछपून राहून, काय होते ते पाहत ते बसले, अशा आशयाच्या जबान्या त्या त्या लोकानी दिलेल्या आहेत. पोलिसलाइनकडेही तशीच रड होती. आणि क्रातिकारकाना विरोध कोणाचाच झाला नाही. त्यांना लावविता आले तेवढे त्यांनी लाबविले आणि पहाटे सव्वातीननतर पळ काढला ! या चकमकीत तीन युरोपियन अधिकारी व बाकी सहासात हिंदी सरकारी नोकर ठार झाले.

हा हल्ला एवढ्यावरच थांबला नाही. क्रांतिकारकांना हुडकून काढण्याचा व त्यांचा पक्का बंदोबस्त करण्याचा आता जारीने प्रयत्न सरकारने चालू ठेवला. मग त्यांना पुष्कळ काम मिळाले, सगळे वरिष्ठ अधिकारी जमले, तारा झाल्या, लखोटे लिहिले, खास गुप्त पोलिस बोलाविले, लष्कराची मदत मागितली, सर्व ' उत्तर-कार्ये ' अगदी यथासांग पार पाडण्यासाठी कसून तयारी केली. मोटारी, मोटारींतील सामान, कपडे, पेट्या इत्यादि सामान क्रांतिकारकांनी जेथल्या तेथेच टाकले होते. त्यावरून लगेच सुगावा मोठ्या ' शिताफी 'ने लावला. मग झडत्या घेतल्या! तपास जारीने चालविला! काही जणांना अटक केली! . पण खरे गुन्हेगार काही केल्या सापडेनात. चितगांगमध्येच एक जखमी युवक आहे, अशी बातमी लागताच तिकडे सर्वांनी गराडा देऊन मग त्याजकडून सर्व माहिती मोठ्या कौशल्याने मिळविली शस्त्रागारास आग लावीत असता हातावरचे पेट्रोल पेटून तो भाजला होता. त्याला त्या रात्रीच्या धादलीच्या वेळीही गुन्हेगाराच्या मुख्याने मोटारीत घालून आणून आपल्या घरी ठेवले होते. भाजलेल्या मुलाचे नाव हिमांशुसेन. त्याने दिलेल्या कबुली जबाबावरून या कटात मंडळी कोण कोण सामील आहेत, याचा तपास लागला. पण त्यांच्या ठावठिकाणाबद्दल कोणासच पत्ता नव्हता

ता. २२ एप्रिल रोजी म्हणजे गुन्हा घडल्याचे पाचवे दिवशी बातमी आली की, चितगांगजवळच असलेल्या जलालाबाद टेकडीवर फरारी इसम दिसतात. तेथे झाडी पुष्कळ असून जाण्याचा रस्ता जरा बिकटच आहे. टेकडी काही मोठी नाही, पण आजूबाजूसही तशाच टेकड्या आहेत व लहान ओढे झाडीने आच्छादलेले आहेत. त्या टेकडीवर हल्ला चढविण्यासाठी तीन चार ' सेनानी ' निरनिराळ्या मार्गांनी निघाले. लष्करी शिपायांची पलटण आणली. सशस्त्र गार्डही तेथपर्यंत नेली. मशिन्‌गन्सचा उपयोग केला! टेकडीवरून लष्करी पलटणीच्या रोखाने गोळीबार झाला असे सांगतात. लगेच दुसऱ्या एका टेकडीवर मशिन्‌गन रोखून समोरच्या टेकडीवरील प्रत्येक इंचइंच भागात गोळ्या बेधडक झाडल्या. रात्र पडेपर्यंत गोळीबार करून रात्री १०-१०॥ च्या सुमारास लष्कर शहराकडे परतले. सकाळी पुनः पलटणी टेकडीकडे गेल्या. छाती धडधडत असताच सर्व

सशस्त्र अधिकारी वर चढले! एकदर ११ प्रेते सापडली! दोन मृत्युपथास लागलेले होते त्याना पाणी पाजण्यापूर्वी 'स्टेटमेट देता का?' असे विचारण्यात आले. पाणी प्याल्यानतर लवकरच ते दोघेही स्वर्गी गेले! असे एकदर तेरा इसम रात्रीच्या गोळीबारास बळी पडले. पोलिसाकडे कोणास जखमही झाली नाही. आमच्या सैनिकाचे व गोऱ्या हफीसराचे अशा प्रकारचे शौर्य काय वर्णावे?

तेराही मुलाची—कारण या हल्ल्यात १६ ते २८ वर्षाच्या आतील तरुणच होते—प्रेते ओळखण्यात आली. मुख्य पुढारी सापडलेच नाहीत. त्याना पकडून देणारास पाच हजाराची बक्षिसे लावण्यात आली. यानतर काही आरोपी खुद्द चितगागमध्ये सापडले व फेणी स्टेशनवर तिघाना पकडले असता पोलिसावर गोळ्या झाडून ते निघून गेले! हल्ला झाल्यानतर सुमारे तीन आठवड्यानी म्हणजे ६ मे १९३० रोजी चितगागजवळ असलेल्या कर्णफुली नदीच्या पैलतीरी काही आरोपी आहेत, असा सुगावा लागला. पोलिसपार्टी व गोरे अधिकारी रात्रीच धडपडत गेले. दोन टोळ्या करून त्यानी गुन्हेगाराना पकडण्याचा प्रयत्न केला. चकमकी झाल्या, बराच वेळ गोळीबारात पाठलाग झाला. शेवटी निष्पन्न इतकेच झाले की, चार प्रेते पोलिसाना मिळाली व दोन मृत्युपथी लागलेले वीर आढळले! लगेच पोलिसानी धावपळ केली व त्या दोहोपैकी देवप्रसादाला विचारले की, 'बाळ, तुला काय पाहिजे?' 'पाणी' म्हणताच त्याला पाणी दिले आणि नतर पोलिस अधिकाऱ्याने त्या आसन्न-मरण वीरास म्हटले, 'हे पहा आमचे बडे साहेब येथे आहेत. तुला काही स्टेटमेंट करावयाचे असल्यास साग.' हे ऐकताच तो मृत्युमुखी गेलेला वीरपुत्र एकदम हुशार झाल्यासारखा होऊन म्हणाला, 'काय, मि. लोमन येथे आहेत का? (मि. लोमन हे बगालचे इ. ज. ऑफ पोलिस होते, व पुढे लगेच डाक्यास त्याचा खून झाला.) कारण लोमन येथे असतील तर मला त्याना गोळी घालावयाची आहे.' नतर त्याला किंचित् ग्लानि आली. पण पुन्हा उजवा हात वर करून तो म्हणाला, 'ह्या माझ्या हातास गोळी लागली नसती तर तुमच्या हातात कधीच सापडलो नसतो. जिवात जीव असताना मी तुमचे हाती सापडलो, ही वाईट गोष्ट झाली.' आणि अल्प काळातच देवप्रसाद देवलोकी गेला!

हे त्याचे मृत्यूपूर्वीचे शब्द सरकारी अमलदाराने शपथेवर कोर्टात सागितले आहेत. भारतीय युद्धांत बाळ अभिमन्यु किंवा मराठी इतिहासात दत्ताजी शिंदे रणागणी पडले होते तेव्हाचा व हा प्रसग यांत विशेष अतर नाही. ‘ लोळावे मांडीवरी ’ अशीच अभिमन्यु, दत्ताजी व देवप्रसाद याची वये होती. दत्ताजीने सागितलें की, ‘ बचेगे तो औरभी लढेंगे. ’ त्याहीवर ताण करणारे देवप्रसादाचें हे उत्तर आहे. अभिमन्यूचे बाबतीत झालेल्या अधर्मयुद्धाचा सूड उगाविण्यास ‘ कर्तुमकर्तुमन्यथाकर्तुम् ’ शक्ति असलेला त्याचा मामा श्रीकृष्ण व ‘ झाले बहु होतिल बहु आहेतहि बहु, परतु यासम हा ’ अशा पराक्रमाचा धनुर्धारी पिता असे दोघे समर्थ होते. शिष्याचा अपमान भरून काढण्यासाठीही त्याचे प्रतापी बधु महादजी होतेच. पण देवप्रसाद मात्र अतृप्त इच्छेने–निराशेने – दु:खाने व असहायतेने विव्हळत स्वर्गी गेला!

अशा कितीतरी वीरशोकरसपर प्रसगानी ह्या हल्ल्याला महत्त्वाचे स्वरूप प्राप्त करून दिले आहे.

— २ —

‘ शस्त्रागार–आक्रमण ’ म्हणून जो खटला चितगाग येथे गेले आठदहा महिने चालू आहे, त्यात एकदर हजर आरोपी ३५ आहेत. त्याची नावे खालीलप्रमाणे:––

( १ ) अनतलाल गुलाबसिंग, ( २ ) धीरेंद्रलाल दस्तीदार, ( ३ ) फणीद्रलाल नदी, ( ४ ) सुबोधचद्र राय, ( ५ ) सुबोध विश्वास, ( ६ ) श्रीपति चौधरी, ( ७ ) सहाय्यराम दास, ( ८ ) नित्यपाद प्रमथभूषण, ( ९ ) सुबोधकुमार चौधरी, ( १० ) अश्विनीकुमार चैाधरी, ( ११ ) सुखेंदुविकास दस्तीदार, ( १२ ) बाळ हरेंद्र, ( १३ ) विजयकुमार सेन, ( १४ ) शातिभूषण नाग, ( १५ ) फकीरचद सेन, ( १६ ) अर्धेंदुशेखर गुह, ( १७ ) नदलाल गुलाबसिंग, (१८) मधुसूदन महीमचद्र, (१९) रणधीर जयतकुमार, ( २० ) ननिगोपाळ चद्रकुमार, ( २१ ) गुलाबसिंग रामबक्षसिंग, ( २२ ) आशुतोष विपिनचद्र, ( २३ ) मलिनविकास जगबधु, ( २४ ) जोगेद्र



सरकारी पोलिसाचे शस्त्रागार–चितगाग

ऊर्फ मनागुप्त, ( २५ ) रजनलाल सेन, ( २६ ) लालमोहन अखिलचद्र, ( २७ ) अनिलबधु दीनबधु, ( २८ ) अनिलकुमार रक्षित, ( २९ ) सुबोधचद्र महेद्रचद्र, ( ३० ) सुकुमार, ( ३१ ) सुबोधचद्र मित्र, ( ३२ ) सौरिंद्रदत्त, ( ३३ ) लोकनाथ बाळ, ( ३४ ) गणेश घोस व ( ३५ ) आनद गुप्त.

आता या ३५ जणाची थोडक्यात माहिती दिली पाहिजे. सर्व बडखोराचा पुड पुढारी म्हणून अनतलाल ( १ ) समजला जातो. लोकनाथ ( ३३ ) व गणेश ( ३४ ) हे त्याचे डावेउजवे हात म्हणता येतील. गुलाबसिग ( २१ ) ह्याचे दोन्ही पुत्र अनत ( १ ) व नदलाल ( २ ) ह्या खटल्यात गुतले असल्यामुळे बापाने मुलाच्या कृत्याकडे कानाडोळा केला किंवा मूक समति दर्शविली म्हणूनच बहुधा त्यालाही या खटल्यात गोवलें आहे. सरकारी वकिलाचे म्हणणे असे की, गुलाबसिगास आपल्या दोन्ही मुलाची कारस्थाने पूर्णपणे ठाऊक होती. आणि अशा गुन्ह्याविषयी त्याने पोलिसाना खबर दिली नाही किंवा त्यापासून मुलाना परावृत्तही केले नाही म्हणून तो गुन्हेगार ठरतो. तसेंच जोगेद्र गुप्त ( २४ ) व रजनलाल सेन ( २५ ) ह्या दोघाची मुले ह्या कटात होती व त्याना बापाची फूस असावी, अशाच आरोपावरून दोघाना कटात गोवले आहे. कर्णफुली नदी ओलाडून गेलेल्या सहा आरोपीत ह्या दोघाचे पुत्र होते. मृत्युशय्येवर असतानासुद्धा 'मला मि. लोमन याना गोळी घालावयाची आहे,' असें बोलणारा देवप्रसाद हा जोगेंद्र गुप्त ( २४ ) याचाच मुलगा होय! तसेंच त्या वेळी जीं चार प्रेते मिळाली, त्यात रजतसेन याचे एक होते. तो रजनलाल ( २५ ) याचा मुलगा. गुलाबसिग ( २१ ) व रजनलाल (२५) हे दोघे वकील आहेत.

एकदर १९ वीर मृत्युमुखी पडले. त्याच्यापैकी अकरा जणाचीं प्रेते जलालाबाद टेकडीवर सापडली. कर्णफुली नदाच्या पैलतीरी समीरपुराजवळ जें समरयुद्ध झालें व चार प्रेतें व दोन मृत्युपथीं लागलेले जखमी पोलिसाच्या हातीं लागले, ते सहा इसमः—

१ स्वदेश राय, २ मनरजनसेन, ३ देवप्रसाद गुप्त, ४ रजनसेन, ५ मोतीलाल, ६ अर्धेदु दस्तीदार.

यापैकी अर्धेंदु व देवप्रसाद जखमी असताना पोलिसाच्या हाती लागले. बाकीच्या चौघानी आत्महत्या केली अथवा ते पोलिसाच्या गोळ्यांस बळी पडले, ते समजण्यास मार्ग नाही.

वरच्या आरोपीच्या यादीपैकी लोकनाथ ( ३३ ), गणेश ( ३४ ) व आनद (३५) ह्या तिघाना पोलिसाधिपति टेगार्ट यानी चद्रनगर येथे (फ्रेंच हद्दीत ) पकडले. ह्या बाबतीत सरकारी पोलिसानी आतरराष्ट्रीय कायद्याचा व फ्रेंच कायद्याचाही भग केलेला दिसत असून याबद्दल त्याना जाब कोणीच विचारला नसावा असे वाटते! शिवाय, तेथून तिघाना पकडून आणल्या-नंतर वाटेत त्याचे अमानुष व अनन्वित हाल करण्यात आल्यामुळेच, टेगार्ट याचेवर कलकत्त्यास दोनदा गोळी झाडण्यात आली होती असे म्हणतात. जलालाबाद टेकडीवरील लढाई, समीरपुराजवळची चकमक, फेणी स्टेशन-वरचा चमत्कार आणि चद्रनगरची धरपकड हे पाच अध्याय चितगाग-शस्त्रागार–आक्रमण–पुराणात अत्यत महत्त्वाचे, चित्ताकर्षक व रोमाचकारी म्हणून गणले जातील.

या खटल्यात एकदर ३०१ साक्षीदार सरकारतर्फे दिले असून, आता फक्त २५ जणाच्याच साक्षी व्हावयाच्या उरल्या आहेत. त्यानतर दोन्ही तर्फेच्या वकिलाची भापणे व निर्णय. सेशन कमिट करण्याची भानगड असल्या प्रकारच्या खटल्यात नेहमी असते. परतु सरकारने कार्यसौकर्यासाठी तिरगी न्यायाधीशांचें एक त्रिकूट नेमून सव्यापसव्याचा हा प्रकार टाळला आहे. एक रायबहादूर, दुसरे खानबहादूर असे डाव्याउजव्या बाजूस बसणारे दोन न्यायाधीश एका गौरवर्णियाच्या जोडीस देऊन तिघाचे ट्रिब्यूनल नेमले आहे. त्याच्या पुढेच खटला चालत असतो. सरकारपक्षीय वकिलाची कमतरता असणार कशी? आरोपीचा बचाव करण्यासाठी कलकत्त्याचे एक नामांकित बॅरिस्टर श्रीयुत शिरीष बोस येथे येऊन राहिले आहेत. शिवाय श्री. घोसळ व इतर पाच वकील त्याच्या मदतीस असतात. प्रथमतः बोस हे सर्वच आरोपीच्या वतीने काम चालवीत. पण मध्यतरी आरोपीना नग्न करून झाडा घेण्याची प्रथा जेव्हा अधिकाऱ्यानी अमलात आणली, तेव्हा मात्र अनत ( १ ), लोकनाथ ( ३३ ) व गणेश ( ३४ ) यांनी आपण स्वतःच आपली बाजू माडणार अस-ल्याचे सागितले, व त्याप्रमाणे साक्षीदाराची फेरतपासणी सुद्धा त्यानी केली.

हे शस्त्रागारावरील आक्रमण होऊन वर्ष तर होऊन गेलेच, पण सरकारच्या मनात क्रांतिकारकाच्या पराक्रमामुळे दहशत बसली आहे, ती कायमचीच! आज चितगागला एका लष्करी ठाण्याचे स्वरूप प्राप्त झालेलें दिसते, तर आठ दिवसापूर्वी लष्करी वस्तीत तुरळक इतर नागरिक जाऊन राहिले आहेत असे वाटत असे. प्रत्यक्ष कायद्याने –लष्करी कायदा पुकारला नव्हता तरी –लष्करी अधिकारी, गुरख्याच्या पलटणी, मिलिटरी पोलिस वगैरे बडेजाव असा झोकात होता की, सरकारचे धावे किती दणाणले आहे याची त्यावरून उत्कृष्ट कल्पना येई. ठिकठिकाणी नाक्यानाक्यावर गुरखे सगीन रोखून उभे दिसत. साहेबाच्या बगल्याभोवती तर, मोगलाई जनानखान्यापुढे असतो तसा, खासा कडक बदोबस्त असे. रस्त्यावर टेपरवारी नाकी उभारण्यात येऊन, खिळे मारलेले लाकडी ओंडके आडवे टाकून ठेवले होते. हेतु हा की, कोणी चपळाईने पळून जाऊ लागला तर अडखळून अथवा पायात खिळा घुसून तो अडकून पडावा. तार ऑफिस, टेलिफोन, बगला, पोस्ट, बँक इत्यादिकाकडे रक्षकाचा भरणा जास्त असावयाचाच. करफ्यू ऑर्डर पुकारण्यात आली. रात्रीच्या गाड्या खासा वटहुकूम काढून लवकर सोडण्याची व्यवस्था झाली. लष्करी सशस्त्र पोलिस सारखे टेहाळणी घालू लागले. व त्याच्या विरुद्ध तक्रार करण्यासाठी सवड नसल्याने रस्त्यावरून हिंडणाराची मात्र कठिण अवस्था होई.

गुरख्यानी तर अगदी भडावून सोडले! जेथे पहावे तेथे गुरखा दिसे! रात्री आठापुढे कोणास घराबाहेर पडतां येईना किंवा कोठे जमून गप्पा मारता येईनात. उच्च टेकड्यावरील घरे लष्करी अधिकाऱ्याच्या ताब्यात गेली. आजूबाजूच्या टेकड्यावर फौज व बदुकाही जमवून ठेवल्या. रात्रंदिवस अशी ही नाकेबदी झालेली कशासाठी, म्हणून किंचित् अतस्थ चौकशी केल्यानतर, असे कळले की, गेल्या वर्षी अस्त्रागारावर क्रांतिकारकानी आक्रमण केले, त्यापेक्षा अधिक भीषण स्वरूपाचा तसाच हल्ला लवकरच होणार आहे, अशी सरकारच्या दूर पल्ल्याच्या लांब कानास बातमी लागली होती! अर्थातच लष्करी बदोबस्त कडक झाला तर नवल काय? पण ह्या बातमीत काही तथ्य होते की नाही, याचा सारासारविचार मात्र कोणी केलेला दिसत नाही.

ही बातमी कळताक्षणी आधीच घाबरलेले भित्रे अधिकारी अधिक बावचळल्यासारखे वागू लागले. चालू असलेल्या खटल्यातील अठरावीस इसम फरारी आहेत म्हणून म्हटलेच. ते चितगाग जिल्ह्यांतच आसपास दडून असून खेडवळ लोक त्याना आसरा देतात, अशी अधिकाऱ्याची समजूत झाली. वर्ष होऊन गेले, 'फरारी गुन्हेगारास थारा देऊ नका,' म्हणून जाहीर फर्माने काढली, त्याना पकडून देणारांस बक्षिसाची लालूच दाखविली, दाढीदीक्षिताना बगलेत मारले, तरीही हे मूठभर हिंदु लोक बेइमानपणे वागतात, हे जिल्हाधिकाऱ्यास कसे खपेल? त्यानी वरून हुकूम आणवून लष्करी जादा पोलिस ५२ खेड्यांवर लादले!

त्यातही अशी मेख मारून ठेवली आहे की, मुसलमान रहिवाशाकडून जादा पोलिसाचा खर्च घेतला जाणार नाही! मुसलमानाना माफी देण्यात आली असे म्हणतात. त्याचा अर्थ उघड आहे. खुद्द कलेक्टरशी माझी मुलाखत झाली, त्या वेळी त्यानी स्पष्टच म्हटले की, आरोपी व फरारी देखील एकजात हिंदु आहेत. आसाम-बंगालकडे हिंदुमुसलमान तेढीस विशेष रंग चढतो, तो अशामुळे की, साधारण लोकवस्तीत शेकडा ८५ प्रमाणे मुसलमान असून, सर्व व्यवहार बहुधा त्याचे हाती असतात. शेकडा १५-२० हिंदु असणाऱ्या गावी जादा पोलिसाचा खर्च फक्त हिंदूनीच भरावा, अशा फर्मानाचा अर्थ काय होणार? शिवाय दिवस हे असले — पडत्या धारणीचे. रुपयाचे तांदूळ सहासात आण्यास विकावे लागतात! तेव्हा मोगलाई जिजिया करावरही ताण करणारी ही नवीन करपद्धति आहे की नाही?

जादा पोलिस नुकतेच लादण्यात आले असून, त्यांची बरदास्त राखण्याकरिता खुद्द कलेक्टरांनी आपला दौरा तिकडे काढला होता. मी त्याना भेटलो तो ते दौऱ्यावरून आल्यानंतरच. दौऱ्यावर असताना त्यानी ठिकठिकाणी म्हणे सभा भरविल्या आणि 'फरारी गुन्हेगारांस पकडून द्या' म्हणून आग्रहाने सांगितले. 'पोलिसांजवळ फरारी इसमाचे फोटो दिले आहेत. त्याना थारा देऊ नका. सरकारी नोकराना गुन्हेगार पकडण्यासाठी मदत करा.' अशा आशयाची याचना करणाऱ्या कलेक्टराना काही खेडवळानी अत्यंत स्पष्ट शब्दात पण खडसून जबाब दिला, असे येथील दैनिक 'पांचजन्य' पत्राने प्रसिद्ध केले आहे. कलेक्टरानी 'आम्हास मदत करा' अशी दीनवाणीने

याचना करताच काही ग्रामियानी जिल्हाधिकाऱ्यास म्हटले की, 'तुम्ही लठ्ठ पगार खाता आणि आम्हालाच त्रास देता. तुमच्या अयोग्यतेचा परिणाम आम्ही का सोसावा? त्यापेक्षा तुम्ही ती खुर्ची सोडा व आम्हाला तुमचा पगार द्या. म्हणजे गुन्हेगार आम्ही लगेच पकडून देऊ की नाही पहा!' 'पाचजन्या'त प्रसिद्ध झालेला हा संवाद खरा असावा असे मानण्यास बरीच कारणे आहेत. खुद्द कलेक्टरानी अशा आशयाच्या काही लेखी तक्रारी 'साक्षर' खेडवळाकडून आपणाकडे आल्या, असे कबूल केले आहे.

या सर्व गोष्टीवरून सध्याची चितगागची परिस्थिति लक्षात येईल. लष्करी अधिकारी व चारीपैकी दोन गुरखा पलटणी परतल्या असल्या, तरी बाकीचा बंदोबस्त पूर्वीसारखाच आहे. खटला चालू असल्या वेळचा देखावा पाहून तर संदेहच पडतो की, आरोपी कैदी समजावयाचे अथवा खुद्द न्यायाधीशानाच बंदिस्त मानावयाचे? कारण तिघाही न्यायाधीशाच्या राहत्या घरावर जागता पाहरा आहे. त्याचा कोर्टात येण्याचा व कोर्टातून स्वगृहीं जाण्याचा मार्ग रोज सकाळसंध्याकाळ बदलण्यात येतो. शिवाय, जेव्हा ते कोर्टात येतात, तेव्हा त्याच्यापुढे बंदूक रोखलेल्या २०-२५ गुरख्यानी भरलेली एक मोटार लॉरी असते! मध्यतरी न्यायाधीश भरलेली मोटारगाडी आणि मागेही तशीच २०-२५ गुरख्यानी भरलेली, दुसरी उघडी लॉरी,—असा बंदोबस्त, इतकी काळजी व इतकी व्यवस्था ठेवल्यास त्या न्यायाधीशाच्या केसाना तरी धक्का लागण्याची शक्यता उरते कोठे? श्रीकृष्णाने रुक्मिणीला पळवून नेऊ नये, म्हणून अंबा-पूजनासाठी तिला पाठविताना, रुक्मीने जी व्यवस्था राखली तिचे वर्णन खुद्द रुक्मिणीनेच असे केले आहे की, 'स्वसखी, धात्री, जननी, विप्र स्त्री मंडळी न तीं पेटी!' तशापैकीच मोटारीत घालून नेलेल्या या 'माणका'ची स्थिति होती. रुक्मिणीस साभाळणाऱ्या मंडळीशी ती मोकळेपणाने बोलू तरी शकत असे. पण ह्या न्यायासनस्थाना आपसात तरी बोलता येते की नाही, याची शंकाच वाटते. मग यात खरा कैदी कोण? आणि कैद्यांत व न्यायाधीशात फरक तरी कसला?

आरोपीना कोर्टात आणतात, तेव्हाचा देखावा तर औरच असतो. तुरुंगापासून कोर्टापर्यंतचा सर्व रस्ता दुतर्फा गुरख्यानी गुफलेला असतो.

आरोपींना कोर्टांत ११॥ वाजता यावयाचे तर १०॥ पासूनच गुरखे रस्त्यावर डांबले जातात. त्या रस्त्याने इतर कोणासच येऊंजाऊं देत नाहीत. मग आरोपींना पोलिस बंदोबस्तात आणतात. ते सर्व गाणी म्हणत आनंदाने जातात. कारण सर्वच जण १३ ते २८ च्या आतले, एका गावी राहणारे, एकत्र खेळलेले, एकत्र काम केलेले यामुळे त्यांच्या चेहऱ्यावर आनंद व समाधान यांची जी छटा दिसते, ती मोटारीतून येणाऱ्या न्यायाधीशाच्याही मुद्रेवर नसते! आरोपी कोर्टातून परत जाण्यापूर्वी एक तास पुनः गुरख्यांना कवाईत करावा लागतेच.

कोर्टांत मात्र वेगळा प्रकार आहे. फक्त दहा प्रेक्षकांनाच आवारात जाता येते. तेव्हा सुद्धा झाडा अगदी करून घेतात. लेखी परवानगी, पास, पोलिसाची तपासणी वगैरे सर्व चालतेच. पण ३५ आरोपी असताना १० च प्रेक्षकांना आत घ्यावयाचे, हा न्याय कोठला? न्यायालये ही सार्वजनिक असल्याने तेथे जाण्यास खरे म्हटले तर कोणासच मज्जाव नसावा. पण न्यायमंदिरातच जर अन्याय होऊं लागला, तर मग न्याय तरी कोठे मिळावा? असा प्रकार प्रेक्षकांचे बाबतीतच होतो असे नाही. निमसरकारी किंवा पाऊणसरकारी ठरलेल्या असोशिएटेड प्रेसच्या खास बातमीदाराचीही अशी तपासणी घेण्याचा प्रयत्न सरकारी अधिकाऱ्यांनी केला. तेव्हा त्याने तर कोर्टांत जाणेच नाकारले!

अशी परिस्थिति इतरेजनांच्या बाबतींत आहे. मग खुद्द आरोपींचे किती हाल होत असतील? सर्कशीतील वाघसिंहांना तरी अधिक मोकळीक मिळते असे म्हणता येईल. आरोपींचा पिंजरा, त्याचे दुहेरी आवरण, आजूबाजूला कडेकोट बंदोबस्त वगैरे पाहून असे वाटते की, व्याघ्रसिंहांपेक्षा सहस्रपट क्रूर व भयंकर अशी ही नवींच जनावरे सरकारने कोठून तरी महत्प्रयासाने मिळविली असावीत! त्यांना रोज नग्न करून झाडा घेतात! आणि या सर्व जबरदस्त तयारीचे कारण असे सांगण्यांत येते की, तुरुंगात कांही खणण्याचे काम चालू असता जेथे हे शस्त्रागारावरील आक्रमण करणारे आरोपी ठेवले आहेत, तेथेच जमिनीत पुरलेली कांही रिव्हॉल्व्हर्स व गोळ्या सरकारी कामगारांना सापडल्या. आज जवळजवळ वर्षभर हे आरोपी तेथे तुरुंगात आहेत. कडक पहाऱ्यातून ही हत्यारे आत गेली कशी आणि गेल्यानंतर जमिनीत

गाडली कोणी व केव्हा? त्याचे उत्तर कसेही दिले तरी अधिकाऱ्यावरच शितोडे येतात. तेव्हा कित्येक पुढाऱ्याचे म्हणणे असे की, जनतेवर जुलूम करण्यास काही तरी कारण मिळावे म्हणून मुद्दाम उकरून काढलेले हे नाटक असावे.

ते काहीही असो, चितगाग जिल्ह्यातील व खुद्द शहरातीलही जनता आज फार विवचनेत पडली आहे, हे मात्र खरे. सरकारी लष्करी दिमाखाने किंवा गुरख्याच्या अस्तित्वाने लोक डरत नाहीत, हे तर स्पष्टच झाले आहे. खेडवळही हालअपेष्टास भितात असे नव्हे. पण जादा पोलिसाचा खर्च सोसावयाचा कसा? सर्व सोंगे घेता येतात पण दामाजीपताचे सोंग आणता येत नाही, त्याची वाट काय? हीच विवचना सर्वांचे मनात घोळत आहे. चितगागवासियाकडे कोणाचेच लक्ष नाही, म्हणून त्याना पराकाष्ठेचे वाईट वाटत आहे. महात्माजींना व सरदार पटेलाना तार करून इकडे बोलावण्याचा त्यानी निश्चय केला आहे. पण कार्यबाहुल्यामुळे त्याना इकडे पाहण्यास वेळ कसा होणार? कराची कॉंग्रेसमध्ये इकडील गुन्हेगारावर सरकारी अधिकाऱ्यानी जे अनन्वित जुल्म केले, त्याविषयी कोरडा निषेध प्रकट करणारा ठराव माडण्यासही महात्माजींनी व सरदार वल्लभभाईनी परवानगी दिली नाही, हे तेथे असणाऱ्या सर्वांस ठाऊक आहे. त्याच्याकडून या बाबतीत आता तरी काय मदत होणार आहे?

---

## — ३ —

चित्त आकर्षून घेऊन मनाला आल्हाद देणारे ग्राम म्हणून चित्तग्राम हे नांव पूर्वी चितगागला होते तें कधीपासून? नतर त्याचे नाव मोगल अमदानीत बदलले ते केव्हा आणि तेथील एकदर वातावरण अथवा परिस्थिति अशा 'बडखोरी'स अनुकूल कशी निघाली? गाव तरी कितीसे मोठे आहे? व्यापार कसला चालतो? हे 'बडखोर' लपूनछपून राहू शकले कसे? इत्यादि अनेक प्रश्न मनात येतात. एखाद्या भूगोलाच्या पुस्तकावरून किंवा इतिहासाच्या टाचणावरून ही माहिती पुरवितांही येईल. परतु प्रस्तुत काली हे नीरस प्रकरण मध्येच हवे कशाला? शस्त्रागार-आक्रमण-पुराणच

पुढे चालवावयाचे, तर आता त्यात आरोपी म्हणून सापडलेल्याची थोडीशी माहिती दिली पाहिजे.

‘ अनत ’ हा त्यातला पुढारी म्हटला तर काही जुन्या पिढीच्या वाचकाना नाशिकची आठवण व्हावयाची. आणि मौज कशी आहे पहा की, अनताच्या जोडीला नाशिकाप्रमाणे ‘ गणेश ’ही चितगागला आहेच! मात्र इतर साथीदारात बरीचशी मडळी वेगळी आहेत. ‘ अनत ’ हा तर अगदी तरणाबाड पोर–नुकतीच ( गद्धे )पचविशी उलटलेला एक जवान. त्याची शक्ति म्हणजे खरोखरच अचाट. अफझुलखान ‘ डोंगरातील चुवा ’ पकडून आणण्यासाठी विजापुराहून निघाला, तेव्हा त्याची ‘ कीरत ’ अशी होती की, पहार वाकवून तिचे तो कडे करीत असे! हाच पराक्रम अनताचा होता, असे सरकारतर्फेच्या वकिलानी कोर्टापुढे सागितले आहे. अफझुलखानाच्या अजस्र व दाडग्या आहाराला जसे थोडे शाहिरी तिखटमीठ व गोधळी मसाला असण्याचा सभव, तसाच पहारीच्याही बाबतीत असावा असे वाटते.

पण तशी बात अनताची नव्हे खुद्द सरकारी वकिलाने खटला सुरू करताना जे थोडेसे ‘ मगलाचरण ’ केले व नादी म्हटली, तीत अनताच्या पराक्रमाचा असाच उल्लेख आहे. त्या वकिलाना तर शाहिराचे पक्तीत बसविता येत नाही ना? लोकनाथ बाळ म्हणजे खरोखर मारुतीच तो! चालती मोटार मागे खेचून धरून थाबविण्याइतकी प्रचड शक्ति त्या बाळाची! चितगागला किंवा त्या शहराच्या आसपास ह्या दोन मल्लाची कीर्ति पसरण्यास मग वेळ का लागावा? दोघेही प्रख्यात तालिमबाज म्हणून लोकविश्रुत झाले व त्यानी ठिकठिकाणी तालीम करण्याचे आखाडे काढले. अशा प्रकारे देशातील होतकरू व तरुण मडळी या बडखोराच्या कच्छपी लागण्यास सुरुवात झाली म्हणून सरकारी वकिलानी सागितले.

परतु तालीमखाने किंवा व्यायामशाळा काढणे हा कोठल्याही कायद्याने गुन्हा ठरत नाही. इतकेच काय, पण अशा व्यायामशाळेचे विद्यार्थी कसले ज्ञान सपादन करतात, हे पाहण्यासाठी कित्येक वेळी सरकारी अधिकाऱ्यास सुद्धा निमत्रण असे आणि त्याप्रमाणे ते अधिकारी ते पाहण्यास जात व खूष होत. अनताच्या हालचाली गुप्तपणे वेगळ्या असत व तो स्वयसेवक दल उभारून त्याना कवाईत शिकवी, लाठी फिरविणे वगैरे लष्करी काम सुद्धा

त्यात असे आणि वेळोवेळी परिषदा भरत तेव्हा प्रमुख भाग घेऊन ज्वल जहाल भाषणे करविण्याचा व करण्याचा त्याचा उपक्रम असे, अशा आशयाच्या तक्रारी सरकारी वकिलांनी आपल्या भाषणात पुढे मांडल्या आहेत.

पण सरकारी साक्षीपुराव्यांत खटल्याविषयी बऱ्याच गोष्टी बाहेर आलेल्या आहेत की, त्यामुळे सरकारवरच बाजू पुष्कळ शेकण्याचा संभव आहे. अनंता चळवळ्या होता, तो स्वयंसेवकांना लष्करी कवाईत शिकवी, त्यांच्यापुढे जहाल भाषणे घडवून आणी, ह्या आरोपाखेरीज युवकपरिषदा भरवून तेथे मारामारी करणे, राजद्रोही कायद्याविरुद्ध कायदेभंग करण्याचा आग्रह धरणे, व शेवटी सरकारच्या मनात दहशत बसेल असा सशस्त्र हल्ला करण्यास सर्वांना तयार करणे असेही आरोप अनंतावर करण्यात आले आहेत. डिसेंबर १९२३ मध्ये चितगांग येथे रेल्वेची रोकड घेऊन जात असता ती लुटण्यात आली. भर दिवसा हा प्रकार घडला, तरी त्यात आरोपी कोण होते हे कळेना! सुमारे साडेपाच महिन्यांनी यात अनंताचे अंग असावे म्हणून त्याला कलकत्त्यास पकडून चितगांगला आणण्यात आले. पण ज्या पोलिस अधिकाऱ्याने अनंताला पकडून चितगांगला आणिले त्याचा चितगांगमध्ये लगेच खून पडला. पुढे अनंत निर्दोषी ठरला व म्हणून सुटला, ही गोष्ट लक्षात ठेवण्यासारखी आहे.

एवढ्यानेच थांबले नाही. बंगाली 'सोटेशाही वरवटा' जो निघाला त्याने वाटेल त्या 'अनिष्ट' इसमास विनाचौकशी मनास येईल तितका काळ डांबून ठेवण्याची मुभा बंगाली अधिकाऱ्यास मिळाली. आणि शेकडो बंगपुत्र 'डांबिस्त' ( डिटेन्यू ) म्हणून कारावासात खितपत पडले! अनंत व त्याचे चारपाच सवंगडी-लोकनाथ, गणेश वगैरे त्यात होतेच. पण खैर ही की, १९२८ च्या सुरवातीस त्यांना छोट्या कैदेतून काढून सबंध हिंदुस्थानएवढा विस्तार असलेल्या मोठ्या तुरुंगात मोकळे सोडले. मात्र मागे सारखे शुक्लकाष्ठ लावून ठेवले. ही सर्व मंडळी धोका देणारी आहेत, त्यांचेवर सारखी पाळत ठेवली पाहिजे, असे सरकारी चार-पट्टूनीं ठरविले; आणि त्याप्रमाणे एकदर सुमारे दोन डझन हेरांची सहा मंडळीवर देखरेख ठेवण्यासाठी नेमणूक झाली. कामाचे महत्त्व जाणून शिपाई गडी ( कॉन्स्टेबल ) या टेहळणीसाठी मुद्दाम नेमला नाही, बऱ्या अधिकाऱ्याची योजना केली व

चितगागसारख्या छोट्या शहरात सहा इसमांवर चोवीस तास पहारा ठेवण्यात आला.

अनताच्या व त्याच्या अनुयायाची खलबते कसली चालत, हे पोलिसांनाही प्रथम प्रथम समजले नाही. चोवीस तास पहारा ठेवून हे पोलिस काय करीत होते तेही उमगण्यास मार्ग नाही. एवढे मात्र खरे की, कलकत्याच्या हेराध्यक्षाकडून बरचेवर गुप्त सूचना येत व ह्या सहा 'भयकर' इसमांवर विशेष कडक नजर ठेवण्यात येई. शेवटी कलकत्त्याचे काम चितगांगला राहूनच करण्याकरिता तेथील पोलिसाधिपतीस जास्ती मदतनीस देऊन अधिक अधिकार देण्यात आले. 'इटेलिजन्स ब्रॅच' म्हणजे 'माहिती खाते' चितगागमध्ये ठाणे देऊन बसले! मध्यतरी अनताच्या फदास काही तरुण मुले लागून त्यांनी शिक्षणक्रम सोडला, हे पाहून जिल्हाधिकाऱ्यानी अशा विद्यार्थ्यांच्या पालकास भेटून स्नेहीभावनेची सूचना केली: 'अनताच्या नादी आपल्या मुलांना लागू देऊ नका.' अशाच आशयाचा तो कर्णमत्र होता.

पण ही गोष्ट अनताला कळताच तो बेधडक त्या गोऱ्या अधिकाऱ्याच्या कचेरीत जाऊन भेटला व 'माझी बदनामी का केलीत?' असा रोखठोक जबाब यौवनी ओद्धत्यात त्याने विचारला. साहेब जरासे चपापलेच. 'मी तुझ्या वर्तणुकीविषयी बोललो नाही. मी फक्त त्याना असा सल्ला दिला.' पण अशा समर्थनास अनत पुरून उरणारा होता. 'हे तरी तुम्ही कां सागितले? त्यामुळे गेरसमज माजला. माझी वर्तणूक सशयास्पद वाटत असली तर मला तसे स्पष्ट सागा. पाठीमागे काही तरी बोलू नका.' असे त्याने अधिकाऱ्याना सांगितले व गैरसमज दूर करण्यासाठी पुनः त्या पालकाना भेटा, असे बजावले.

इकडे दोडदोन वर्षाच्या अवधीत व्यायामशाळेचे काम जोराने चालूच होते. अनताचे साथीदार मोटारहाक्याचे शिक्षण घेत. खाकी कपडे लष्करी पद्धतीचे शिवून घेऊन ते घालून ऐटीने ते कवाईत करीत. कोठे तरी त्यांची गोलदाजीची तालीम चालू असावी, असेही वाटले. कारण एका मुसलमान बाईने त्यासबधी थोडीशी माहिती पोलिसास दिली होती. शिवाय स्फोटक द्रव्ये तयार करताना अपघात होऊन एकदोघांना जखमा झाल्या व त्यांना उघडपणे इस्पितळांत उपचारासाठी नेलेही. रात्रीअपरात्री ही जवान मडळी

कोठे तरी फिरण्यास जात, असेंही कळलें! पुढे तर पोलिसांच्या दूरदृष्टीच्या लांब कानांना अशी बातमी लागली की, हल्ला करण्यासाठी ह्या कपूने शस्त्रें जमविलीं, स्फोटक द्रव्ये तयार करण्याची तयारी केली आणि द्रव्यही गोळा केलें! लगेच २४ हेरांच्या ऐवजी ३० जणांची योजना झाली. कडक बंदोबस्तांत भर पडली आणि टेहळणीस रंग चढला! पोलिस खात्यांतील वरिष्ठ-कनिष्ठांनीही या सर्व गोष्टी कबूल केल्या आहेत; पण एकाही चाणाक्षाला झडती घेण्याची अथवा कोणाला अटक करण्याची बुद्धि कशी झाली नाही?

ह्या सर्व प्रकार समजल्यानंतर, भाविक गावकरी वेगळेंच कारण देत असत, त्यांत सत्य आहे असे वाटू लागतें. चितगांगवासियाचें प्रथमपासून म्हणणे असें की, बाल श्रीकृष्णाला घेऊन मथुरेच्या कारावासांतून नद निघण्याचे सुमारास तेथील पहारेकऱ्यांस जशी मोहिनी पडली, तशीच अनंताच्या कर्तबगारीने पोलिसास भुरळ पाडली. कारण चितगागसारख्या छोट्या शहरांत आपल्या पाळतीवर कोणी आहे की नाही हे अगदी अजागळास सुद्धा एकदोन दिवसांत उमगून येईल. मग अनंतासारखा धूर्त इसम इकडे दुर्लक्ष कसा करील? शिवाय शस्त्रागारावर आक्रमण करणे म्हणजे ' ब्रिज ' खेळण्याप्रमाणे दोन मिनिटांत ठरणारा बेत नव्हे. त्यासाठी किती तरी महिन्यांची तयारी प्रथमपासून चाललेली असली पाहिजे, हे उघड आहे. रात्री साडेदहाच्या सुमारास सशस्त्र लोक मोटारीतून हल्ला करण्यासाठी जातात ही बातमी चोवीस तास पहारा ठेवणाऱ्या तीस टेहळ्यांस जर कळू शकली नाही तर मग त्यांनी टेहळणी ठेवली तरी कशावर? अशाच प्रकारचे अनेक प्रश्न उपस्थित करून चित्तग्रामवासी वर सांगितल्याप्रमाणे अनुमान काढतात. अनताला दैवी अंश मानण्यापर्यंतही त्यांची मजल गेली आहे.

हा अनंत पोलिसांच्या कचाटीत सापडला कसा हेंही कित्येकांना कोडें वाटे; पण पोलिसांनी त्याला पकडून देणारास पांच हजार रुपयांचें बक्षिस लावलें असतांही तो कोणास 'गावला' नाही. शेवटी एके दिवशी कलकत्त्यास बंगाल पोलिसांच्या मुख्याधिकाऱ्यास अनताने पत्र लिहून '××× तारखेस ×× वाजतां मी आपणांस भेटण्यास येत आहें, पकडण्याची व्यवस्था करावी.' असें कळविलें व त्या पत्राच्या नकला चितगांगच्या जिल्हाधिकाऱ्यां-

कडेही पाठविल्या. आणि ठरलेल्या दिवशी ठराविक वेळी अनत कलकत्त्यास मि. लोमन याचे पुढे उपस्थित झाला! त्याला पश्चात्ताप मुळीच झालेला नव्हता किंवा तो निराश देखील दिसत नसे. 'मला लपूनछपून राहण्याची पुष्कळ सोय असताना सुद्धा मी आपण होऊन तुमचे स्वाधीन होतो, याचें कारण स्पष्ट आहे' असे त्याने लिहिले.

स्पष्ट कारण हेच की, जी मडळी या खटल्यात आरोपी म्हणून पकडली ती १६ ते २८ वर्षांच्या आतलीच होती. त्याना धाकदपटशा दाखवून किंवा त्याना नाही नाही त्या थापा देऊन त्याचेकडून बित्तबातमी काढण्याचा प्रयत्न कसून करण्यात आला. चारपांच जणानी कबुली जबाब देखील लिहून दिले! मात्र एकही 'शकर' माफीचा साक्षीदार निघाला नाही. आपल्या सहचाऱ्यानी हालअपेष्टात रहावे व आपण मात्र बाहेर असावे, हे अनताला सहन न होऊनच तो पोलिसाच्या स्वाधीन झाला असावा. शिवाय अनत आरोपीच्या कपूत जाताच ज्या चारपाचजणानी कबुली जबाब दिले होते ते लगेच परत घेतले व पोलिसाना तोडघशी पाडल्याप्रमाणे केले!

कोर्टापुढे अनत व इतर आरोपी आपले म्हणणे सादर करतील तेव्हा पुष्कळ गोष्टीचा उलगडा होईल. मुख्यतः हल्ला करण्याचा या तरुणाचा उद्देश समजेल. कारण पोलिसाचे हाती सापडण्यापेक्षा आत्महत्या करण्यात त्याचे हेतु खात्रीने वेगळे असले पाहिजेत. ते कळल्यास आधुनिक वग-युवकांची मनोभूमि कशा प्रकारे नागरली आहे व तीत कोणते पीक येते आणि अन्यत्र येते त्यापेक्षा त्यात वैशिष्ट्य काय, ह्या सर्वत्र गोष्टीवर बराच प्रकाश पडण्याचा सभव आहे. खटल्याचे काम सपेपर्यंत वाट पाहण्यापलीकडे त्याला दुसरा उपाय नाही. खटल्यात बाहेर आलेल्या सरकारी व्यवस्थेतील छिद्राचा परामर्ष सुद्धा आता घेता येत नाही, म्हणून थोडे सबूरीने घ्यावे हेच बरे.

